[ काव्येतिहास-संग्रहांतील. ]

# महाराष्ट्र-कवि-वर्य-मोरोपंत-कृत

## कविता

भाग २ रा.

हा ग्रंथ

जनार्दन बाळाजी मोडक बी. ए.

यांनीं

यथामति शुद्ध करून टीपांसह छापण्याकरितां तयार केला.

तो

पुणें येथें "ज्ञानप्रकाश" छापखान्यांत छापिला.

शके १८०९.

# MORO PANT'S POEMS

## PART II

Edited with Explanatary notes

BY

JANARDAN BALAJI MODAK B. A.

POONA:

*Printed at the "Dnyan Prakash" Press,*

1887

## सूचना.

शुद्धिपत्रांत दाखविलेल्या चुका प्रथम दुरुस्त करून मग वाचकांनीं हा ग्रंथ वाचण्यास आरंभ करावा अशी विनंति आहे.

ग्रंथ-प्रकाशक.

# मोरोपंती कविता.

## भाग २ रा.

### अनुक्रमणिका.

मोरोपंतकविकृत

# कुशलवोपाख्यान. §

गणपति गुरु गुह[1] गौरी गिरिशें[2] गंगा गुणाढ्य[3] गीर्देवी[4] ॥
यांसि नमुनि रामात्मज कुशलवचरितामृतासि संसेवी ॥ १ ॥
श्रीमद्राघव तो त्यजी वसुमतीकन्येसि[5] निंदाभयें
वाल्मीकिद्विजनायकाश्रमपदीं राहे महीजा[6] स्वयें ॥
तेजस्वी यम जन्मले सुत तिहीं यज्ञाश्व नेला तथा
युद्धीं तात हि जिंकिला अशि वरा गावी मनोज्ञा[7] कथा ॥ २ ॥
तातादेशें[8] करुनि विपिनीं[9] राघवें वास[10] केला
तेथें चौर्यें दशमुख हरी मेदिनीकन्यकेला[11] ॥
सुग्रीवाख्य प्लवगपतिशीं[12] सख्य साधूनि वाळी
त्याचा भ्राता वधुनि विशिखें[13] दाविली त्या दिवाळी ॥ ३ ॥
पश्चाद्राम दशाननासि ससुतामात्यासि[14] युद्धीं वधी
दे लंकेसि बिभीषणाप्रति धरा सिध्व्र्कसोमावधी[15] ॥
*स्वाहेशास्यविशुद्ध मैथिलसुता संयुक्त रम्याकृती
साकेतासि[16] सुपुष्पकीं[17] मग सुखें बैसोनि आला कृती ॥ ४ ॥
जे सुग्रीव बिभीषणांगदमरुत्पुत्रादि[18] आले सुखें
सेनासंयुत जानकीपतिगुणस्तोमासि[19] गाती मुखें ॥

---

§ हें प्रकरण पंतांचे पंढरपूर येथील वंशज मयूरपंडित यांजकडून आम्हांस मिळालें. या प्रकरणाविषयीं पंत नामरसायनांत असें ह्मणतात कीः—

जैमिनिकृताश्वमेध स्थित कुशलवचरित वर्णिलें आहे ॥
बा हे रीति पहावी मज तों वाटे सुधानदी वाहे ॥ १०६ ॥

या वरून नामरसायनापूर्वी हा ग्रंथ पंतांनीं केला हें स्पष्ट आहे. बृहद्दशमाचे २५ अध्याय ( ५५–७९ ) जसे अनेक वृत्तबद्ध पंतांनीं रचिले आहेत तद्वतच या ग्रंथाचे तेरा ही अध्याय अनेक वृत्तांनीं बांधिले आहेत.

१ गुह=कार्तिकेय. २ गिरीश=शिव. ३ गुणाढ्य=गुणयुक्त. ४ गी=सरस्वती. ५ वसुमतीकन्या=भूसुता ( सीता. ) ६ महीजा=भूकन्या ( सीता. ) ७ मनोज्ञ=रम्य. ८ तातादेश=बापाची आज्ञा. ९ विपिन=अरण्य. १० वास=राहणें. ११ मेदिनीकन्या=भूसुता. १२ प्लवगपति=वानरस्वामी. १३ विशिख=बाण. १४ अमात्य=प्रधान. १५ अर्कसोमावधी=यावच्चंद्रदिवाकर. * स्वाहेश=अग्नि १६ साकेत=अयोध्या. १७ पुष्पक=रावणाचें विमान. १८ मरुत्पुत्र=वायुसुत मारुती. १९ स्तोम=समूह.

श्रीरामागमनप्रहृष्ट सकळायोध्या पुढें धांवली
पानीयांसि[20] जशी तृषार्त सुरभी[21] तैशी क्षणें पावली ॥ ५ ॥
गेल्यापासुनियां चतुर्दश समा[22] कष्टी चि जाला वनीं
सीतालक्ष्मणयुक्त राघव असे भावूनियां तो मनीं ॥
क्ष्मादेवें[23] कृपापयोधरें[24] तदा त्याचा पुरोधा[25] मुनी
आशीर्वादमिषें सुधेसि[26] भगवान् वर्षे पुढें जाउनीं ॥ ६ ॥
कैकेयीसुत वल्कलाजिन[27,28]जटाधारी प्रधाना सवें
सामोरा रघुनायकाप्रति पुढें गेला प्रभूतोत्सवें[29] ॥
जाला सन्नत[30] राघवेंद्रचरणीं प्रेमें समालिंगिला
तत्प्रेमाश्रुकणें भिजे रघुवरें जेव्हां शिरीं हुंगिला ॥ ७ ॥
जाला तो नगरीं प्रविष्ट सकळक्ष्मानाथचूडामणी[31]
लोकांच्या हृदयांबुजीं[32] बहु दिसां आनंद ही त्या क्षणीं ॥
कौशल्या घननादशत्रुजननी[33] कांतारवासप्रदा[34]
कैकेयी हि रघूत्तमें नमुनियां केली प्रमोदास्पदा[35] ॥ ८ ॥
कौशल्या मलिना कृशा स्वतनयाश्लेषें[36] तदा हर्षली
आनंदाश्रुकरूनि राघव शिरीं हुंगूनियां वर्षली
पूर्वीच्या परि विघ्न होइल असें मानूनियां क्षिप्र[37] ती
कोणातें हि न पूसतां करि जणों राज्याभिषेकाप्रती ॥ ९ ॥
हा अच्छेद्य अभेद्य नंदन तुझा अक्लेद्य[38] वसे असे
मातें संकथिती वसिष्ठमुख हे भूदेव मिथ्या कसे ॥
जालासि प्रखरेषुभिन्नतनु[39] तूं बोलोनि ऐसें करें
स्पर्शी लक्ष्मण राम ही स्वहृदयीं आलिंगुनी लेंकरें ॥ १० ॥
श्वश्रूतें[40] क्षितिजा नमी तव तिहीं आलिंगिली आदरें
कौशल्या मग ते वदे सुचुबुकीं[41] स्पर्शोनि तीतें करें ॥

---

२० पानीय=पाणी. २१ सुरभी=गाय. २२ समा=वर्षे. २३ क्ष्मादेव=भूदेव (ब्राह्मण). २४ कृपापयोधर=दयामेघ. २५ पुरोधा=पुरोहित. २६ सुधा=अमृत. २७ वल्कल=झाडाची साल. २८ अजिन=हरिणाचें कातडें. २९ प्रभूतोत्सव=पुष्कळ आनंद. ३० सन्नत=नम्र. ३१ क्ष्मानाथचूडामणि=पृथ्वीपतिश्रेष्ठ. ३२ अंबुज=कमल. ३३ घननाद शत्रुजननी=इंद्राजिताचा शत्रु लक्ष्मण त्याची माता सुमित्रा. ३४ कांतार=अरण्य. ३५ प्रमोदास्पदा=आनंदयुक्त. ३६ आश्लेष=आलिंगन. ३७ क्षिप्र=लवकर. ३८ अक्लेद्य=न भिजणारा. ३९ प्रखरेषुभिन्नतनु=तीक्ष्ण बाणांनीं विद्ध आहे शरीर ज्याचें तो. ४० श्वश्रू=सासू. ४१ चुबुक=हनुवटी.

रामाशीं चिरकाळ सर्वसुखसंपूर्णा स्वपत्या रहा
पातिव्रत्यबळें तुझ्याचि तरला दुःखाब्धि[42]ला वत्स हा ॥ ११ ॥
असे तूं रघुवंशभूषणमणी स्तुत्या सतींच्या गणीं ।
चारित्रासि तुझ्या सुरेंद्ररमणी[43] गाती सुखें स्वांगणीं ॥
त्वत्कोपें चि दशास्य दुर्मति कथाशेष[44] त्रिलोकांत या ।
आला कोण असा असे त्रिभुवनीं मारावयाला तया ॥ १२ ॥
कौशल्या या परी ते प्रमुदितहृदया[45] बोलिली मैथिलीला[46] ।
वर्णी हर्षे करूनी स्फुरदधरमुखें रामसौमित्रिलीला ॥
केला राज्याभिषेक क्षितिसुरतिलकें[47] श्रीवासठें स्वतोषें ।
विप्रांचे संघ तेव्हां परम शुभदिनीं गर्जती मंत्रघोषें ॥ १३ ॥
राज्यातें अज[48] तो करीत असतां जाले दरिद्री धनी ।
रोगी रोगविहीन बालिश[49] रत ज्ञानाचिया साधनीं ॥
गाई त्या घटदोहनी[50] बहुरसा सस्यावृता[51] मेदिनी[52] ।
यूपस्तंभ[53]समन्विता हि सरयू लोकत्रयाल्हादिनी[54] ॥ १४ ॥
दिव्यस्वादुफळाढ्य भूरुह[55]लता संशोभती पुष्पिता ।
आत्मापत्यमृतिप्रति क्षितितळीं पाहे न मातापिता ॥
वंध्या लब्धबहुप्रजा सकल ही वर्ण स्वधर्मी रत ।
श्रीरामाख्य सुधेसि कर्णचषकें[56] पीती सुखें संतत ॥ १५ ॥
पापातें न वसावया स्थळ दिसे कोण श्रमाला पुसे ।
नाहीं आश्रय यास्तव क्षितितळीं चिंता सचिंता[57] वसे ॥
विघ्नातें बहु विघ्न होति रुसली भीति त्रिलोकी बरी ।
साकेतीं रघुनाथ सानुज[58]सुहृद्राज्यासि जेव्हां करी ॥ १६ ॥
जैमिनिकृतभारतगत हयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
हा पहिला अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ १७ ॥
इति श्रीकुशलवोपाख्याने मयूरेश्वरकृतौ प्रथमोध्यायः ॥ १ ॥

---

४२ अब्धि=सागर. ४३ सुरेंद्ररमणी=अप्सरा. ४४ कथाशेष=कथा मात्र शेष राहिली आहे ज्याची असा म्हणजे मृत. ४५ मुदितहृदया=सानंदहृदया. ४६ मैथिली=मैथिलाची ( जनकाची ) कन्या सीता. ४७ क्षितिसुरतिलक=ब्राह्मणश्रेष्ठ. ४८ अज=जन्मरहित असा जो तो ( परमेश्वर ). ४९ बालिश=मूर्ख. ५० घटदोहनी=घागरभर दूध देणाऱ्या. ५१ सस्यावृत्ता=धान्यानें व्याप्त. ५२ मेदिनी=भू. ५३ यूपस्तंभ=यज्ञस्तंभ. ५४ लोकत्रयाल्हादिनी=त्रैलोक्यास आनंद देणारी. ५५ भूरुह=वृक्ष. ५६ चषक=पातळ पदार्थ पिण्याचा पेला. ५७ सचिंता=दुःखी. ५८ अनुज=धाकटा भाऊ.

नव सहस्र समा क्रमिल्या भल्या । प्रकृति त्या सुख फार चि लाभल्या ॥
नृपतितें वश नित्य असे प्रजा । रघुवरासि परंतु नसे प्रजा ॥ १ ॥
मोठ्या काळें करुनि मग ती गर्भिणी होय रामा ।
रामातें ते बहु सुख करी पांडुवक्त्राभिरामा ॥
ज्याची दृष्टि स्वसुतवदनप्रेक्षणातें भुकेली ।
केली स्त्रीशीं दशरथसुतें त्या चतुर्मास केली ॥ २ ॥
तदनंतर रघुकुलवर पाहे स्वप्नांत पांचवे मासीं ॥
प्रातःकाळीं सांगे करुनि नमस्कार तें गुरुपाशीं ॥ ३ ॥
गंगातीरीं जनकतनया त्यागिली देवरानें ।
शोकग्रस्ता घडिघडि रडे फार उच्चस्वरानें ॥
कोमेलेसें वदन सुटला मूर्धजांचा कलाप ।
दीना वाणी करि परि परी काननांतीं विलाप ॥ ४ ॥
अशि जनकनृपसुतेची स्वप्नांतीं पाहिली अवस्था मी ॥
मज सुख तिळ नच वाटे चिंतेनें व्यापिलें मन स्वामी ॥ ५ ॥
ऐसें भाषण रामाचें ऐकोनि ऋषिसत्तम ॥
बोलता जाहला त्याशीं हरिता शिष्यहृत्तम ॥ ६ ॥
श्रीरामा जलदश्यामा देवर्षिनिकरप्रिया ॥
गर्भशांत्यर्थ सीतेची कर पुंसवनक्रिया ॥ ७ ॥
कृष्णपक्ष सरे तावत्करावें विप्रतर्पण ॥
इहामुत्र हि कल्याण देतें होय द्विजार्पण ॥ ८ ॥
नृपति तदा नमुनि करें कुशासनातें ॥
कुलगुरुच्या करि बहु मान्य शासनातें ॥
हरिजिदरिप्रति हरिसैन्यराजें राजा ।
मग जनकक्षितिपतिच्या ह्मणे घरा जा ॥ ९ ॥
जनकनृपवरासि सांग आदौ नमन करूनि मदीय वंदनातें ॥

---

५९ समा=वर्षे. ६० प्रकृति=प्रजा. ६१ प्रजा=संतति. ६२ रामा=स्त्री. ६३ पांडुवक्त्राभिरामा=गरोदरपणामुळें फिकट तोंड झाल्यानें रम्य दिसणारी. ६४ केली=क्रीडा. ६५ देवर=दीर. ६६ मूर्धज=केस. ६७ कलाप=समूह. ६८ कानन=अरण्य. ६९ विलाप=शोक. ७० हृत्तम= मनांतील शंका ( अज्ञान ). ७१ जलदश्याम=मेघश्याम. ७२ निकर=समूह. ७३ पुंसवनक्रिया=संस्कार विशेष. ७४ इह=एथें. ७५. अमुत्र=परलोकीं. ७६ कुशासन=दर्भांचे आसनावर बसणारा ( वसिष्ठ ). ७७ हरिजिदरी=इंद्रजिताचा शत्रु लक्ष्मण. ७८ हरिसैन्यराज=वानरसैन्य नायक सुग्रीव.

मग वद तव दर्शनैकवांछा बहुत असे अजसूनुनंदनातें[७९] ॥ १० ॥
धरुनि बहुतशी विनम्र मुद्रा । कुशिकसुतासि[८०] महत्तपःसमुद्रा ॥
विनवुनि बहुपुण्य संघराशी[८१] । ऋषिजन वेष्टित आणिजे घरासी ॥ ११ ॥
आशि दशवदनेभसिंहवाणी[८२] । परिसुनि लक्ष्मणवीर बद्धपाणी[८३] ॥
म्हणुनि बहु बरें सुबुद्धिखाणी । सजनक कौशिक विप्र शीघ्र आणी ॥ १२ ॥
नमन करुनि लक्ष्मण स्वहातें । मृदु चि वदे सुरवंद्यविग्रहातें[८४] ॥
सजनक मुनि येतसे पुराला । झडकरि पूजुनि आणिजे घराला ॥ १३ ॥
करुनि अनुजवाक्य मान्य राम । त्वरित उठे त्रिजगन्मनोभिराम[८५] ॥
ऋषि जनयुत जाय त्या समोर । प्रमुदित[८६] चित्त जसा घनास मोर ॥ १४ ॥
नमुनि करुनि पूजन स्वहातें हरि मुनिच्या प्रभु तो पथश्रमाला ॥
विनवुनि बहु पुण्यसंग्रहातें प्रमुदित[८७] घेउनि ये निजाश्रमाला ॥ १५ ॥
मग कुलगुरु सर्व विद्वसिष्ठ । प्रभृति महीसुर[८८] कौशिकादि शिष्ट ॥
करुनि सुखि महर्षिसत्तमात । प्रभु करि पुंसवनासि तो समाप्त ॥ १६ ॥

तदनंतर गंधाढ्य[८९] दिव्यकेलिगृहांतरीं[९०] ॥
कोणा एका दिशीं रात्रीं तोषवूनि मधूत्तरीं ॥ १७ ॥
घेउनि निज अंकावरि जनकसुता गर्भिणी नवी रमणी ॥
तीस पुसे लंकावरकाल[९१] क्षितिपाल सर्व वीरमणी ॥ १८ ॥
कृशांगि पांडुराननें प्रजाफलोद्भवे लते ।
त्रपा[९२] त्यजूनि सांग जे मनीं स्पृहा[९३] असेल ते ॥
विदेहराजनंदिनि प्रिये पवित्रमानसे ॥
तुला अदेय वस्तु राज्यमंडळांत या नसे ॥ १९ ॥
म्हणे श्रीरामरमणी रमणीयवपुर्धरा[९४] ॥
धराकन्या जगत्पद्मा पद्माक्षी कंबुकंधरा[९५] ॥ २० ॥

---

७९ अजसूनुनंदन=अज राजाचा पुत्र दशरथ त्याचा पुत्र राम. ८० कुशिकसुत=विश्वामित्र. ८१ संघ=समूह. ८२ दशवदनेभ सिंह=रावणरूपी हत्तीचा सिंह ( राम ). ८३ बद्धपाणी=जोडिले आहत हात ज्यानें असा. ८४ सुरवंद्यविग्रह=देवांना वंद्य आहे विग्रह ( शरीर ) ज्याचा असा ( राम ) ८५ अभिराम=रम्य. ८६ प्रमुदित= आनंदित. ८७ या श्लोकांत पहिला व तिसरा आणि दुसरा व चवथा या पादांतीं यमक आहे. अशीं उदाहरणें या ग्रंथांत कांहीं आहेत. ८८ महीसुर=भूदेव ( ब्राह्मण ). ८९ गंधाढ्य=सुवासयुक्त. ९० दिव्य केलिगृह=उत्तम रंगमहाल. ९१ लंकावरकाल=लंकापतिशत्रु. ९२ त्रपा=लाज. ९३. स्पृहा=इच्छा. ९४ रमणीयवपुर्धरा=सुंदर शरीर आहे जीचें अशी. ९५ कंबुकंधरा=शंखा सारखी बारीक आहे मान जीची.

ऐकावें मुनिवदनोद्गत[९६]श्रुतीचें । सध्वान[९७] श्रमहर सर्वसंसृतीचें[९८] ॥
देखाव्या मृगकुलसंकुला[९९] विशाला । विप्रांच्या परम पवित्र पर्णशाला ॥ २१ ॥
देखाव्या ऋषिवनिता भल्या कुलीना । निर्लोभा निजहृदयेशभक्तिलीना[१००] ॥
नीवारच्छद[१]फलकंद[२]नीर[३]मूळें । सेवूनि प्रमुदित ज्या समाधिमूळें ॥ २२ ॥
देखावी सुरतटिनी[४] लसत्तरंगा[५] । पापौघश्रमशमनी शिवांतरंगा ॥
जे वाहे सलिलमिषें सुधाचि सारी । आलोकें[६] करुन चि जन्ममृत्यु सारी ॥ २३ ॥
जनकनृपवरनंदिनीचा[७] असा ऐकतां दोहद[८] ॥
करुनि सरस हास्य तीतें म्हणे शर्मसंदोहद[९] ॥
उदधिउडुप[१०] हायनें[११] त्वां जन्हीं सेविलें दंडक ॥
तरि हि न तव तृप्ति चित्तीं कशी काय हा दंडक[१२] ॥ २४ ॥
जा सकाळीं वरारोहे[१३] देखायास्तव पावनें[१४] ॥
शांतसत्वगणाकीर्णें गंगातीरतपोवनें ॥ २५ ॥
ऐसें ह्मणोनि रघुवंशावतंस[१५] मग सीतेसवें प्रमुदित ॥
केलिगृहीं[१६] जडितमंचीं निजे स्वजनरक्षार्थ जो समुदित[१७] ॥
निद्रा तदा नयनमार्गें करून चि शरीरांतरीं प्रसरली ॥
राहोनियां प्रहर दोन स्वयें च मग सोडूनि दूर सरली ॥ २६ ॥
मग निशिचर[१८] चार[१९] प्राज्ञ विश्वासराशी ॥
नमन करुनि रात्रौ श्रीअयोध्यावरासी ॥
म्हणति मरणजन्मच्छेदका भूसुतापा[२०] ॥
जन सकळ हि गातो त्वत्सुकीर्तिप्रतापा ॥ २७ ॥
पृथक् पृथक् चारजनाननें अशी । लोकश्रुती ऐकुनियां तदा वशी[२१] ॥
तयांस आज्ञा मग मर्त्यदेवें[२२] दे । त्यांतील एका सह तो असें वदे ॥ २८ ॥
माझें वा मम भार्येचें बंधूचें जरि दुष्कृत ॥
जालें असेल तुजला प्रकृतीच्या[२३] मुखें श्रुत ॥ २९ ॥

---

९६ श्रुति=वेद. ९७ ध्वान=ध्वनि. ९८ संसृती=संसार. ९९ संकुल=व्याप्त. १०० निजहृदयेशभक्तिलीना=आपल्या नवऱ्याचे ठायीं भक्ति आहे ज्यांची अशा (पतिव्रता) १ छद=पान. २ कंद=कांदा. ३ नीर=पाणी. ४ सुरतटिनी=देवनदी (गंगा). ५ तरंग=लाटा. ६ आलोक=दर्शन. ७ नंदिनी=कन्या. ८ दोहद=डोहळा. ९ शर्म संदोहद=सुख समूह देणारा. १० उदधि उडुप=१४ (उदधि=४ उडुप=१). ११ हायनें=वर्ष. १२ दंडक=रीति मार्ग. १३ वरारोहा=उत्तम आहेत आरोह (श्रोणि) जीचे ती. १४ पावन=पवित्र. १५ अवतंस=शिरोभूषण. १६ केलि=क्रीडा. १७ समुदित=उद्युक्त, तयार. १८ निशिचर=रात्रीस फिरणारे. १९ चार=हेर. २० भूसुताप=पृथ्वी कन्यापति (राम). २१ वशी=वश केलीं आहेत इंद्रियें ज्यानें. २२ मर्त्यदेव=राजा. २३ प्रकृति=प्रजा.

तरि सत्य वदें चारा कैशी स्थिति असे जनीं ॥
दंडापासुनि भीतीतें कदापि न धरीं मनीं ॥ ३० ॥
ऐसें ऐकोनि नमुनीं चार तो राघवा प्रति ॥
कथिता जाहला ज्यातें ऐका त्यातें चि संप्रति ॥ ३१ ॥
काचित्[24] खळरजकाची[25] गृहिणी[26] कलहार्तमानसा होती ॥
न विचारुनी धवातें[27] पळोनि गेली पितृक्षयीं[28] होती ॥ ३२ ॥
अनुचित जाणुनि कन्या जामातृगृहासि आणिली तातें ॥
हातीं देता जाला त्यातें जोडूनियां स्वहातातें ॥ ३३ ॥
बहुविध सांत्वन केलें परि तत्क्रोधाग्नि लेश न विजाला ॥
रोषारुणदृक्[29] दष्टाधर[30] ऐसें रजक बोलता जाला ॥ ३४ ॥
पुनरपि दशवदनसदनें[31] गता घरीं नांदवीतसे रामा[32] ॥
तो काय मी ह्मणवुनी बाहु उभारूनियां वदे रामा ॥ ३५ ॥
राजा म्हणवुनि सरलें त्यातें परि मी तसें कदा न करीं ॥
आयकिलें इतुकें हें बोलत होता असें सुहृन्निकरीं[33] ॥ ३६ ॥
स्वर्गंगेच्या[34] सलिलीं[35] आयकिला पाहिला नसे पंक[36] ॥
त्रिजगद्गेयचरित्रा[37] तद्वत्कैचा तुला असे पंक[38] ॥ ३७ ॥
सकृदुच्चारणमात्रें[39] तरती दुरितार्णवीं[40] महापापी ॥
निरत शिव हि मग तव गुणसुधेसि जन कोण कीं न बापा पी ॥ ३८ ॥
पितृवचन सत्य केलें खळ वधिले त्रिदशविप्र[41] तोषविले ॥
निजगुण मुक्तादामें[42] दिव्यस्त्रीकंबुकंठ[43] भूषविले ॥ ३९ ॥
जन दुर्वार तथापि स्वैर सुधापानमत्त बोलतसे ॥
सकल कलुषित तिमिररवि[44] प्रामाण्य चि युक्त हे हि बोल तसे ॥ ४० ॥
ऐसें ऐकोनियां राम चिंतेला मानसीं धरी ॥
लोकापवादवित्रस्त[45] विचारातें मनीं करी ॥ ४१ ॥

---

२४ काचित्=कोणी एक. २५ खळरजक=दुष्ट परीट. २६ गृहिणी=बायको. २७ धव=नवरा. २८ क्षय=घर. २९ रोषारुणदृक्=रागानें लाल झाले आहेत डोळे ज्याचे असा. ३० दष्टाधर चावीत आहे खालचा ओंठ जो असा. ३१ सदन=घर. ३२ रामा=बायको. ३३ सुहृन्निकर=इष्टजनसमूह. ३४ स्वर्गंगा=आकाशगंगा. ३५ सलिल=पाणी. ३६ पंक=चिखल. ३७ त्रिजगद्गेयचरित्र=त्रैलोक्यांत गाण्यास योग्य आहे चरित्र ज्याचें असा. ३८ पंक=पाप. ३९ सकृत=एकदा. ४० दुरितार्णव=पापसमुद्र. ४१ त्रिदश=देव. ४२ मुक्तादाम=मोत्यांचा हार. ४३ दिव्य स्त्री कंबु कंठ=अप्सरांचे शंखासारखे बारीक कंठ. ४४ सकल कलुषित तिमिररवि=सर्व पातकरूपी अंधकाराचा सूर्य. ४५ वित्रस्त=भ्यालेला.

जाली वन्हिमुखीं शुद्धि तथापि जन निंदिती ॥
टाकावी कीं न टाकावी हे शुद्ध[४६]चरिता सती ॥ ४२ ॥
कैशी हे त्यागावी सद्वृत्ता साधुसंमता प्र[४७]मदा ॥
श्रोत्रीय[४८]मुखें जैशी त्याज्या स्वाचारपद्धती न कदा ॥ ४३ ॥
त्यागीन अवश्य इला विप्र जसे कलियुगीं निज श्रुतिला ॥
ऐसें हृदयीं चिंती वारंवार स्मरोनि साश्रु तिला ॥ ४४ ॥
जलजल[४९]सद्रम्यमुखी नव नवनीतापरीस मृदुला हे ॥
शिव शिव मजविण भीरु न वनवसति दुःखभोगणें लाहे ॥ ४५ ॥
एवं चिंता व्याकुल दीनास्य[५०] तो वदे निजे हाले ॥
सेवार्थ भरत लक्ष्मण शत्रुघ्न तया समीप ते आले ॥ ४६ ॥
अति दीन मानसातें रामातें पाहातां चि ते सुमती ॥
शत्रुघ्न भरत लक्ष्मण परस्पर उ[५१]पांशु या परी वदती ॥ ४७ ॥
जाला उशीर यास्तव आला कीं कोप रामचंद्राला ॥
दानें द्विजांसि न दिलीं हें गमलें कीं क्रियावितंद्रा[५२]ला ॥ ४८ ॥
एवं दुःखाकुल ते वंदुनि म्हणती पवित्र वृत्तातें ॥
कां न सुखविशी आम्हां भृत्यांतें त्वत्पदस्थचित्तातें ॥ ४९ ॥
ऐसें वदोनि वंदिति ते सारे रामपादपद्मातें ॥
भक्तमयूरेश्वरकृतिचित्ताच्या केलिसद्मा[५३]तें ॥ ५० ॥
जैमिनिकृत भारतगत हयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
हा दुसरा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ५१ ॥
इति श्रीकुशलवोपाख्याने मयूरेश्वरकृतौ द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

---

अथ भरतप्रभृति निजानुजांसि सारें । कळवितसे निशि कथिलें जसें स्वचारें ॥
चरण रजें करुन चि नाशिता अघातें । स्वमत असें कथित असे तदा तिघातें ॥ १ ॥
श्रुतीतें निंदितो जैसा पाखंडी पापभाजन ॥
रक्षोगृहीतां[५४] यासाठीं मैथिलीतें तसा जन ॥ २ ॥
योगी जैसा त्यजितो संसारभयास्तव स्वममतेला ॥
अपवाद भयास्तव मी कीर्तिप्रतिपालनार्थ सीतेला ॥ ३ ॥

---

४६ शुद्धचरिता=शुद्ध चरित्र जीचें. ४७ प्रमदा=स्त्री. ४८ श्रोत्रिय=ब्राह्मण. ४९ जलजल सद्रम्य मुखी=कमलासारखें शोभिवंत आहे मुख जीचें अशी. ५० आस्यु=मुख. ५१ उपांशु=हळुच. ५२ वितंद्र=आळस रहित. ५३ केलिसद्म=क्रीडागृह. ५४ रक्षोगृहीता=राक्षसानें नेलेली.

ऐसें आकर्णितां त्यांच्या नीरें[५५] नेत्रांतुनी गळे ॥
रोमांच उठले देहीं दुःखानें दाटले गळे ॥ ४ ॥
पुसूनियां शोकपाणी पाणि[५६] जोडूनियां नयें ॥
रामा पुढें दीनवाणी वाणी भरत हे स्वयें ॥ ५ ॥
अंत्यजसदनापासुनि पूर्वी जे आणिली बळें गाय ॥
संसर्गपातकास्तव पुनरपि ते धेनु टाकिजे काय ॥ ६ ॥
शुद्धि दिली वन्हिमुखीं प्रविशवुनीयां विशंक निज काय ॥
त्या दिव्याचें रामा स्मरण नसे सांग आज तुज काय ॥ ७ ॥
जाला ज्या मानवाला मरणद [५७]वनितापुत्रवित्तादिशोक ॥
त्याला नाहीं च कांहीं बुधजन ह्मणती पुण्यलभ्योच्चलोक ॥
सीता हे सून माझी सुविमळचरिता या मुळें देवलोकीं ॥
रे वत्सा वर्ततों मी प्रमुदित मजला ऊर्ध्व नेत्रें विलोकीं ॥ ८ ॥
एवं सदैव गगनीं विमानगत तात बोलिला वदनें ॥
त्याचें स्मरण करावें रामा त्वां ज्ञानिलोकत्दत्सदनें ॥ ९ ॥
स्मरण करीं पूर्वी जें वदला व्योमस्थ[५८] *देवसंघात ॥
करुणाब्धे सीते सह न करावा आत्मकीर्तिचा घात ॥ १० ॥
एवं वदोनि भरतें केलें रामासि वंदन ॥
जाला अश्रुजलभ्रष्ट त्दृदयालिप्तचंदन ॥ ११ ॥
ऐकोनि ऐसें वदे जानकीजानी[५९] । लोकापवादें चि होते यशोहानी ॥
ज्याच्या नसे कीर्तिचा जाहला नाश । त्याला न मारावया दक्ष कीनाश[६०] ॥ १२ ॥
मेले हरिश्चंद्रवेन्यादि जे संत । ते या जनामाजि आहेत जीवंत ॥
ज्या बंधुयोषित्सुता ही यशोभंग । स्वप्नांतरीं ही तयासी नसो संग ॥ १३ ॥
कित्येकांही देहदानें रक्षिलें स्वयशोधन ॥
म्हणोनि सीतात्यागें मी करितों कीर्तिशोधन ॥ १४ ॥
म्या वांचावें असें चित्तीं । असेल तुझिया जरी ॥
सीतात्यागनिषेधार्थ शब्द बोलों नकों तरी ॥ १५ ॥
सौमित्रि क्रोधतप्ता क्षितिपातिसि म्हणे प्रार्थना ऐक रामा ॥
मिथ्या लोकापवादें करुनि विकलुषा त्वां त्यजावी न रामा[६१] ॥
म्लेच्छांहीं निंदिजेते श्रुति म्हणवुनियां काय ते विप्रलोकीं ॥
टाकावी हें विचारें करुनि बुधपते शास्त्रनेत्रें विलोकीं ॥ १६ ॥

५५ नीर=पाणी. ५६ पाणी=हात. ५७ वनिता=स्त्री. ५८ व्योम=आकाश. ५९ जानकीजानी=सीतापति ( राम ). ६० कीनाश=यम. ६१ रामा=स्त्री. * देवसमूह.

सांग मला हे सत्य तूं दोषज्ञांचा राय ॥
स्त्रीकलहास्तव पंडितें माय त्यजावी काय ॥ १७ ॥
शत्रुघ्नें ही वहु विनविला राम सामप्रकारें ॥
तें ही जालें विपिनें[६२]रुदितासारिखें व्यर्थ सारें ॥
[६३]अप्रस्तावीं विफळ चि असे काम ऐसें चि आहे ॥
मेघा[६४]पायीं न तिळभरि ही नीरें[६५] सारंगें[६६] लाहे ॥ १८ ॥
सीतात्यागाद्विजप[६७]जननीं वाढला दुःखसिंधू ॥
शोकाश्रूंहीं भिजविति तदा भूमितें रामबंधू ॥
कन्यात्यागश्रवणजनितक्लेश मूर्छेसि गेली ॥
शिपोनीयां ह्मणवुनि जणों जीवनें[६८] शांत केली ॥ १९ ॥
स्वबंधु करिताति हे करुण मंजु[६९] शब्दें स्तव ॥
कलंक परि लागतो निजकुळासि सीतेस्तव ॥
असा करुनियां बरा दृढ विचार लंकापाति- ॥
कुळांतक असें वदे काठिन कीं श्रुती कांपती ॥ २० ॥
अपवादभयास्तव मी स्वतनूतें ही तुम्हांसि हे देखा ॥
त्यागिन सहसा मग या सीतेचा कायसा असे लेखा[७०] ॥ २१ ॥
रघुपतिमुखें कैकेयीचा सुत श्रवणीं अशीं ॥
कठिन वचनें स्वांतोद्वेगप्रदें शिरलीं जशीं ॥
हळु हळु रडे गेलें सर्व स्वधैर्य तदा लया ॥
अनुजयुत तो जाता जाला त्यजूनि तदालया ॥ २२ ॥
दुःखाभिभूत[७१] नृप जाणोनि शिंपित धरे[७२]तें स्वनेत्रकमळें ॥
होता निबद्धकर सौमित्रि पूजित दृगब्जें[७३] तदंघ्रि[७४]कमळें ॥
जो न स्वनाम[७५]रसपानाभिलाषपरलोकव्रजासि भव[७६] दे ॥
तो लक्ष्मणासि नयनाहीं विलोकुनि असें भूमिवल्लभ वदे ॥ २३ ॥
मम शब्द करूनि मान्य टाकीं । क्षितिकन्येप्रति जान्हवीतटाकीं ॥

---

६२ विपिनरुदितासारखें=अरण्यरुदितासारखें ह्म० व्यर्थ. ६३ अप्रस्ताव=अयोग्य प्रसंग. ६४ मेघापाय=मेघ नाहींसे होणें ह्म० शरदृतु लागणें. ६५ नीर=पाणी. ६६ सारंग=पक्षिविशेष. ६७ सीतात्यागद्विजपजननीं=सीतेचा त्याग हाच चंद्र त्याचे उत्पत्तीनें. ६८ जीवन=पाणी. ६९ मंजु=गोड. ७० लेखा=हिशेब. ७१ अभिभूत=पराजित, व्याप्त. ७२ धरा=भू. ७३ दृगब्ज=नेत्रकमल. ७४ अंघ्रि=पाद. ७५ स्वनाम रसपानाभिलाष परलोकव्रज=आपलें नाम हाच रस तो पिण्याच्या इच्छेविषयीं तत्पर जे लोक त्यांचा समूह. ७६ भव=संसार, जन्ममरण.

अथवा स्वकरें चि मार मातें । जरि सीतेस्तव पावसी श्रमातें ॥ २४ ॥
भागीरथीच्या चि तटाकरानीं । टाकीं तुला मी नमितों करांनीं ॥
सीतापरित्यागज दोष मातें । असो नसो तूज गुणोत्तमातें ॥ २५ ॥
अशि परिसुनि वाणी बंधुला हात जोडी
अवनत मुखपद्में दीर्घ निश्वास सोडी ॥
तुरग सह रथातें आणवी सूतहातें
पुसुनि गुरुसि गेला क्षिप्र सीतागृहातें ॥ २६ ॥
उतरुनि रथावरुनि जाला । विनत क्ष्मातनयापदांबुजाला ॥
मग तोषविलें तयास तीनें । पुसुनि स्वागत आदरें सतीनें ॥ २७ ॥
लक्ष्मणागमनकारणास ती । तत्क्षणीं च समजे महासती ॥
रावणप्रमुखराक्षसांतदा । देवरीं सह असें वदे तदा ॥ २८ ॥
सौमित्रे म्यां विनोदें करुनि निशि जगत्कामकल्पद्रुमातें ।
रामातें याचिलें जें रघुकुलतिलकें अर्पिलें तें चि मातें ॥
ऐसें मानीत होतें परि निज हृदयीं कीं खरें होत नाहीं ॥
यावत्सस्यंदनींतें तुज न निरखिलें आपुल्या लोचनांहीं ॥ २९ ॥
जाहालासि हरिजिच्छमना तूं । रामशब्द सहकारीं वसंत ॥
बोलिलें वचन सिद्धिसि नेती । सत्यसंध मनुसंभव संत ॥ ३० ॥
बोलोनि ऐसें द्रविणें दुकूलें । घे देवराच्या स्वमतानुकूलें ॥
श्रेयोभिवृद्ध्यर्थ ह्मणे अजा ती । पूजीन हस्तें सवधू द्विजाती ॥ ३१ ॥
स्वर्णाच्या मणिचित्रता स्वपतिच्या वंदूनियां पादुका ।
सीता ठेवितसे रथीं मुनिमनोरत्नांचिया संदुका ॥
तो धन्य क्षितिपाल मैथिल जनीं लोकत्रयाल्हादिनी ।
ऐशी कांतपदांबुजैकनिरता ज्याची सती नंदिनी[९०] ॥ ३२ ॥
सुरद्विरदगामिनी जनकनंदिनी क्षिप्र ती ।
निघे मग पुसावया त्त्हृदयनाथमाते प्रती ॥
स्वभालगतकुंकुमांकित करुनि तीचीं पदें ।
असें वदतसे मुखें निजवरप्रमोदास्पदें ॥ ३३ ॥

---

७७ अवनत=नम्र. ७८ क्ष्मातनया=भूकन्या (सीता). ७९ अंबुज=कमल. ८० देवर=दीर. ८१ स्यंदन=रथ. ८२ हरिजिच्छमन=इंद्रजितास मारणारा. ८३ सहकार=आंब्याचा वृक्ष. ८४ सत्यसंध=सत्यप्रतिज्ञ. ८५ मनुसंभव=मनूपासून झालेले. ८६ द्रविणें=द्रव्यें. ८७ दुकूलें=वस्त्रें. ८८ सवधू=सस्त्रीक. ८९ संदुका=पेटया. ९० नंदिनी=कन्या. ९१ द्विरद=गज.

मज दोहद जाहला असे कीं । निरखावें नयनें सुरापगेला[12] ॥
सगरात्मजदोषपंक जीच्या । जलयोगें सकल क्षयासि गेला ॥ ३४ ॥
सुरमानवनागलोककांता । बहु माहात्म्य जिचें सदैव गाती ॥
जरि होइल आपुली अनुज्ञा । तरि पाहीन सुखें सुरापगा ती ॥ ३५ ॥
नेला जयानें हरिजित्[13] क्षयाला । तो अग्रजाज्ञेस्तव मत्क्षयाला[14] ॥
करावया पूर्ण मनोरथातें । आला असे घेउनियां रथातें ॥ ३६ ॥
ते ह्मणे तिजला नवीन शिरीषपुष्प सुकोमले ।
म हा गमनें चि हे तव पाद पल्लव कोमले ॥
जासि सांग कशी वनाप्रति वृक्ष कंटक तीव्र ते ।
वक्त्रकांति सुकेल होइल ओष्ठ शुष्क पतिव्रते ॥ ३७ ॥
कौसल्येची स्नेहसद्रत्नखाणी । वाणी ऐशी आयके रामराणी ॥
पाणी तीतें जोडुनी लोकगीता[15] । सीता बोले भारती[16] हे विनीता[17] ॥३८॥
मम वर वनवासीं कंटकध्वंसकारी ।
मरण जलधिमग्न स्वप्लवंगांसि[18] तारी ॥
विमलगुणसुधेचा[19] सिंधु हा रामराजा ।
अनुदिन जपतां का ओष्ट वाळेल माजा ॥ ३९ ॥
असे भवत्कृपा छत्र छाया मन्मस्तकीं सदा ॥
कसे क्लेशार्ककिरण स्पर्शतील मला वदा ॥ ४० ॥
पीती स्वकर्णांजलिहीं एवं वागमृता सत्या ॥
देती आशीर्वादयुक्त आज्ञा [100]पाथेय तीस त्या ॥ ४१ ॥
कैकेयी रामजननी सुमित्रा या तिघी सती ॥
कृतप्रदक्षिणा वंदी पुसे मग निघे सती ॥ ४२ ॥
श्वशूत्तमांघ्रिसारसा[1] । स्मरे प्रहृष्टमानसा ॥
सौनिया रथावरी । प्रयाण तूर्ण[2] ते करी ॥ ४३ ॥
जैमिनिकृत भारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
हा तिसरा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ४४ ॥
इति श्रीकुशलवोपाख्याने मयूरेश्वरकृतौ तृतीयोध्यायः

---

१२ सुरापगा=भागीरथी. १३ हरिजित्=इंद्रजित्. १४ क्षय=गृह. १५ गीता=स्तुता. १६ भारती=वाणी. १७ विनीता=नम्र. १८ प्लवंग=वानर. १९ सुधा=अमृत. १०० पाथेय=शिदोरी, फराळाचें सामान. १ अंघ्रिसारस=पदकमल. २ तूर्ण=सत्वर

वना प्रति [1]विनागसा दवडिली [2]धरानंदिनी
ह्मणूनि बहु दुःखिता स्वपट[3]स्वनाक्रंदिनी ॥
निवारित असे तदा सकरुणा अयोध्या सती
समीरणचलांशुकध्व[4]जकरें जणो तीस ती ॥ १ ॥
मार्गीं चालत असतां दीरासह ते बसोनि रम्य रथीं ॥
ऐशा दुश्चिन्हातें पाहे [5]क्षितिकन्यका अरण्यपथीं ॥ २ ॥
पुढें येउनियां [6]भीमा बोले [7]वागशिवा [8]शिवा ॥
लवे लोचन ही तीचें त्या काळीं उजवें जवें* ॥ ३ ॥
धांवती मार्ग लंघूनी मृगांचीं व्याकुळें कुळें ॥
पाहुनी दुर्निमित्तांतें ह्मणे दीरास ती सती ॥ ४ ॥
दुश्चिन्हांतें स्वनेत्रांहीं [9]रक्षोवृंदापहा पहा ॥
भयसंसूचका [10]भल्लू रडते [11]भैरवें [12]रवें ॥ ५ ॥
[13]गोमायु आणिक मृगें रडताति वाटे । व्यापूनि यास्तव मला भय फार वाटे ॥
लोकैकपालक मदीय मनोविसावा । श्रीराम बंधु सह नित्य सुखी असवा ॥ ६ ॥
[14]जनस्थानीं आले [15]खरमुखमहाराक्षस रणीं
तयांतें दावी जो [16]शमननगरद्वारसरणी ॥
उदार [17]प्रत्यर्थीप्रति शरघनाच्या [18]वितरणीं
असो तद्बाहूंचें बळ [19]खळबळध्वांततरणी ॥ ७ ॥
साक्षात्पातकमूर्ति रावण [20]जगत्तोषांबुजाचा करी
पाषाणीं [21]जलराशि बांधुनि तया [22]काळातिथी जो करी ॥

---

१ विनागसा=निरपराधी. २ धरानंदिनी=भूकन्या (सीता). ३ स्वपटहस्वनाक्रंदिनी=आपल्या ठायीं वाजणारे जे नगारे (पटह) त्यांच्या शब्दानें (स्वन) रडणारी (आक्रंदिनी) ह्मणजे नगरांत वाजणाऱ्या नगाऱ्यांचा ध्वनि हेंच अयोध्येचें रडणें होतें. ४ समीरणचलांशुकध्वजकरें=वाऱ्यानें हालणारें जें ध्वजाचें फडकें तोच हात त्यानें. ५ क्षितिकन्या=भूकन्या. ६ भीमा=भयंकर. ७ अशिवा वाक्=अशुभ वाणी. ८ शिवा=कोल्ही. *जवें=वेगानें. ९ रक्षोवृंदापहा=हे राक्षससमूहहंत्या. १० भल्लु=कोल्ही. ११ भैरव=भयंकर. १२ रव=शब्द. १३ गोमायु=कोल्हा. १४ जनस्थान=नाशिक क्षेत्र. १५ खर=राक्षस विशेष. १६ शमननगरद्वारसरणी=यमाच्या नगराच्या द्वाराचा रस्ता. १७ प्रत्यर्थी=शत्रु. १८ वितरण=दान. १९ खळबळध्वांततरणी=दुष्टांचें बळ हाच कोणी अंधकार तो नाश करणारा सूर्य. २० जगत्तोषांबुजाचा करी=जगताचा संतोष हेंच कमळ त्याचा करी (गज) म्हणजे नाश कर्ता. २१ जलराशि=समुद्र. २२. काळातिथी करी=यमाचा पाहुणा करी, ह्मणजे ठार मारी.

विद्याश्रीमदमद्यमूढहृदयस्वर्द्विण्मरुद्वासुकी[२३]
माझा प्राणसखा निरंतर असो श्रीरामराजा सुखी ॥ ८ ॥
एवं गौतमदार[२४]तारणधनुर्भंगादिलीलांस ती
मार्गातें क्रमितां स्मरोनि पतिला कल्याण भाकी सती ॥
सर्वांचा हि असा च दंडक[२५] असे प्रीतिप्रकर्षा[२६]स्तव
होतो व्यर्थ चि नित्य इष्टविरहें चित्तांत चिंतोद्भव ॥ ९ ॥
नेत्रांहीं अवलोकुनी स्मृतिभवें द्विण्मौलि[२७]मालाकृती
चिंताकुंचितचित्तवृत्तिस पहा माते ह्मणे तो कृती ॥
हे हंसस्वरभाषिणी तुजकडे पद्मेक्षणें[२८] पाहते
स्वर्गंगा[२९] लहरी[३०]भुजा उचलुनी भेटावया वाहते ॥ १० ॥
फलपुष्पपल्लवभरें लवले । तरुराज तूज करिती नमनें ॥
विहगारवें[३१] कुशल हे पुसती । सुख फार यांस हि तवागमनें ॥ ११ ॥
सकरुणहृदये पवित्र केलें । अवचित देउनि दर्शन स्वरानीं ॥
ह्मणवुनि मधुपांगना[३२] प्रहर्षे । तव गुण वर्णिति मंजुळ स्वरांनीं ॥ १२ ॥
आली कीं बहु दिवसीं स्वकानना[३३]तें । देखाया दशमुखजिन्मनोभिरामा[३४] ॥
या येती क्षितिपति[पत्नि] शुभ्रवर्णा । सामोऱ्या ह्मणुनि तुला मराळरामा[३५] ॥ १३ ॥
ऐकोनियां देवरभारती[३६]तें । संतोष झाला मग फार तीतें ॥
विलोकितां त्या अमरापगे[३७]ला । संताप तीचा विलया[३८]स गेला ॥ १४ ॥
सीतेसि पाहतां हर्षे । देवी गौरपयोधरा[३९]
गंगावलोकनें तोषे । देवी[४०] गौरपयोधरा ॥ १५ ॥
तरणि[४२]वर बसुनि झडकर तरणिकुलवरक्ष्माभृदनुकूला[४३] ॥

---

२३ विद्याश्रीमदमद्यमूढहृदयस्वर्द्विण्मरुद्वासुकी=विद्या व वैभव यां पासून उत्पन्न होणारा जो गर्व तेंच मद्य; त्या मद्यानें भुलून गेलें आहे अंतःकरण ज्यांचें असे जे देवांचे शत्रु राक्षस तो च कोणी वायु; त्या वायूचा नाश करणारा सर्प (वासुकी) म्हणजे राक्षसहंता. २४ गौतमदार=गौतमस्त्री अहल्या. २५ दंडक=रीति. २६ प्रीतिप्रकर्ष=प्रेमाचा अतिशय. २७ द्विण्मौलि=द्विट् + मौलि=शत्रुशीर्ष. २८ पद्मेक्षणें=कमलरूपी डोळ्यानें. २९ स्वर्गंगा=आकाशगंगा, भागीरथी. ३० लहरी=लाटा. ३१ विहगारव=पक्ष्यांचा शब्द. ३२ मधुपांगना=मधु + प + अंगना=भ्रमरी. ३३ कानन=रान. ३४ दशमुखजिन्मनोभिरामा=रावणाला जिंकणारा जो राम त्याचें मन रंजविणारी (सीता) ३५ मराळरामा=हंसस्त्रिया ३६ देवरभारती=दिराची वाणी. ३७ अमरापगा=देवनदी. ३८ विलय=नाश. ३९ गौरपयोधरा=पांढरें आहे पाणी जींत अशी गंगा. ४० देवी=राणी (सीता). ४१ गौरपयोधरा=गोरे आहेत स्तन जीचे अशी सीता. ४२ तरणि=नौका. ४३ तरणिकुलवरक्ष्माभृदनुकूला=सूर्यवंशश्रेष्ठराजाची स्त्री.

देवरतिकर[४४]नदीच्या देवर सह जाय शीघ्र परकूला[४५] ॥ १६ ॥
करूनियां मज्जन[४६] विश्वपावनीं[४७] । वनीं[४८] प्रवेशे मग जानकी वनीं ॥
सचिंत पाहे मग देवरास ती । सती ह्मणे आश्रम कां न दीसती ॥ १७ ॥
शार्दूल[४९]पंचमुख[५०]ऋक्ष[५१]वृका[५२]दिसेना । पादोत्थधूलिपटलें दिनकृ[५३]द्दिसेना ॥
पंचास्यदारितगजेंद्रशिरोविमुक्ता[५४] । सर्वत्र भूमिवर त्या दिसताति मुक्ता[५५] ॥ १८ ॥
सिंहाहतद्विरद[५६]शोणितसिक्त[५७] पृथ्वी । तद्दंतसंघ[५८]पटला बहुसाल वाटे ॥
शुभ्रप्रसून[५९]मयदामविभूषितांगी । स्त्री रक्तचंदनविलेपितमूर्ति वाटे ॥ १९ ॥
शार्दूलहस्तगतकंठ[६०]मृगांगनांची । वाणी भयास्तव जणों शिरते स्वकानीं ॥
निर्दग्धभूमिरुह[६१] हे नयनीं विलोकीं । क्रूरद्विजिह्व[६२]गणफूत्कृतिपावकांनीं[६३] ॥ २० ॥
घनरवांतकरा[६४] खणतो पहा । वनबिडाल[६५] महीस कसें वनीं ॥
बहु भयंकर कर्कश हे महा । परम सस्पृह[६६] मूषक[६७]सेवनीं ॥ २१ ॥
दावग्रस्तवनोत्थधूमनिकरीं[६८] पक्षी न ते दीसती
निर्दग्धांडशिशुप्रलापनरवें[६९] आहतसे भासती ॥
पंचास्याहतसांद्रकज्जलनिभ[७०]स्तंबेरमां[७१]चीं शवें
मातें दूरुनि गंडशैल[७२] गमती संदेहबुध्द्युद्भवें ॥ २२ ॥
क्षमासमाना क्षांत्यर्थीरूपी प्रत्यक्ष मास सा ॥
न दीसती कां आजूनि पुण्यनीरनदी सती ॥ २३ ॥
होमधूमारुणाकर्णशोणाब्जच्छदलोचना[७३] ॥
न दीसती अजुनि कां साध्वी संतापमोचना ॥ २४ ॥

---

४४ देवरतिकर=देवांस आवडणारी. ४५ कूल=तीर. ४६ मज्जन=स्नान. ४७ विश्वपावन=सर्वांस पवित्र करणारें. ४८ वन=उदक. ४९ शार्दूल=वाघ. ५० पंचमुख=सिंह. ५१ ऋक्ष=रीस, अस्वल. ५२ वृक=लांडगा. ५३ दिनकृत्=सूर्य. ५४ शिरोविमुक्ता=डोक्यापासून पडलेल्या. ५५ मुक्ता=मोत्यें. ५६ द्विरद=हत्ती. ५७ शोणितसिक्त=रक्तानें शिंपलेली. ५८ संघ=समूह. ५९ प्रसूनमयदाम=फुलांची माळ. ६० शार्दूलहस्तगतकंठ=वाघाच्या हातीं सांपडला आहे कंठ ज्यांचा अशा. ६१ निर्दग्धभूमिरुह=जळलेले वृक्ष. ६२ द्विजिव्ह=साप. ६३ पावक=अग्नि. ६४ घनरवांतकर=मेघनाद ( इंद्रजित ) याचा नाश करणारा ( लक्ष्मण ) ६५ बिडाल=मांजर. ६६ सस्पृह=उत्सुक. ६७ मूषक=उंदीर. ६८ दावग्रस्तवनोत्थधूमनिकरीं=वणव्यानें ग्रासलेल्या वनापासून उत्पन्न होणाऱ्या धुराच्या समूहांत. ६९ निर्दग्धांडशिशुप्रलापनरवें=जळलेल्या आंडयांतील पिलांच्या आरडण्याच्या शब्दानें. ७० कज्जलनिभ=काजळासारखें काळे. ७१ स्तंबेरम=हत्ती. ७२ गंडशैल=भूकंपादिकानें तुटून वेगळा झालेला डोंगराचा मोठा तुकडा. ७३ होमधूमारुणाकर्णशोणाब्जच्छदलोचना=होमाच्या धुरानें लाल झाले आहेत तांबडया कमलाच्या पाकळीसारखे दीर्घ नेत्र ज्यांचे अशा.

ब्रह्मचारी दंडमौंजी[७४]हरिणाजिन[७५]मंडित ॥
न दीसती कां अद्यापि सद्विद्यासक्त पंडित २५ ॥
आम्नायप्रतिपाद्यधर्मसरणीपांथ[७६] प्रसन्नाकृती
संसारांबुनिधानपानकरणीं[७७] कुंभात्मजन्मे[७८] कृती ॥
शापानुग्रहदक्ष[७९] कां न दिसती भूदेव[८०] अद्यापि ते
चिंता लक्ष्मण सर्विणी ह्मणुनियां तोषामृतातें पिते ॥ २६ ॥
रघुवीरपदाब्जसेवनातें । करुनी अंतर धांवलें वनातें ॥
अशि मी अविवेकलब्धपापा । सुकृती लोक कसा दिसेल बापा ॥ २७ ॥
पवित्राश्रमवासी ते पवित्रासि च दीसती ॥
लक्षीजे तो न नेत्रांहीं कौशिकीपद्मिनीपती[८१] ॥ २८ ॥
प्रजावती[८२]ची अशि दीन वाणी । आणी दिराच्या नयनांसि पाणी ॥
असें वदे रावणपुत्रहंता । संतापसंतप्तमनोनियंता[८३] ॥ २९ ॥
ते पावनाश्रम पहा दिसतालि दूर । व्योमासि[८४] चुंबित असे द्विजहोमधूर ॥
जावे इतःपर हळूहळु धूमराजी[८५] । लक्ष्मी करूनि दिसते विर्जितांबरा[८६] जी ॥ ३० ॥
लोकप्रवादें त्यजिलें वनांतीं । तुला जगद्वंद्यपदें वरानें[८७] ॥
प्रशोकबाष्पाकुलकंधरानें[८८] । सांगीतलें हें तिस देवरानें ॥ ३१ ॥
मातर्नमस्ते क्षमस्वापराधी न । मानी मला सर्वथा मी पराधीन ॥
बोलोनि हें नम्र झाला रडे फार । अस्त्रालि[८९] ते मौक्तिकांचा जणों हार ॥ ३२ ॥
ऐसें ऐकोनि वाणीतें शोकें दीर्घ स्वरें रडे ॥
मूर्छावातविनिर्धूता[९०] सीतारंभा[९१] धरे पडे ॥ ३३ ॥
करूनि वामहस्ताचें छत्र शक्राजिदंतकें[९२] ॥
सांशुकातें[९३] दक्षिणातें[९४] करी सत्तालवृंतक[९५] ॥ ३४ ॥
तिच्या तनुसि शिंपुनी स्वनयनोदकें लेखनी

---

७४ मौञ्जी=मुंज नामक गवताची दोरी. ७५ अजिन=कातडें. ७६ आम्नायप्रतिपाद्यधर्मसरणीपांथ=वेदप्रोक्त धर्ममार्ग आचरणारे. ७७ संसारांबुनिधान-पान-करण=संसाररूपी सागराचें प्राशन करणें. ७८ कुंभात्मजन्मे=अगस्त्य. ७९ दक्ष=प्रवीण ८० भूदेव=ब्राह्मण. ८१ पद्मिनीपति=सूर्य. ८२ प्रजावती=भावजय. ८३ नियंता=नियमन करणारा. ८४ व्योम=आकाश. ८५ राजी=पंक्ती. ८६ विजितांबरा=जिंकिलें आहे आकाश जीनें. ८७ वर=पति. ८८ प्रशोकबाष्पाकुलकंधर=शोकामुळें आलेल्या अश्रूंनीं दाटला आहे कंठ ज्याचा असा. ८९ अस्त्रालि=अश्रुपंक्ति. ९० मूर्च्छावातविनिर्धूता=मूर्छारूपी वायूनें कांपविलेली. ९१ रंभा=केळ. ९२ शक्रजिदंतक=इंद्रजिताचा शत्रु (लक्ष्मण) ९३ सांशुक=वस्त्रासहित. ९४ दक्षिण=उजवा (वाम=डावा). ९५ सत्तालवृंत=ताडाचा उत्तम पंखा.

ह्मणे तव जळो त्रिवे सुविषमाक्षरांची खनी ॥
असेल घडली जरी रघुवरांघ्रिसेवा मला
प्रशोकभरमूर्छिता त्वरित हे उठो कोमला ॥ ३५ ॥

अंतर्बहिःस्थित रघूत्तमसूनु धाके । प्राणासि धैर्य तिळमात्र न होय जाया ॥
मोहांधकारपतिता विधिच्या विपाकें । नेत्रें हळू च उघडी रघुवीरजाया ॥ ३६ ॥

निघूनियां कश्मलसिंधुच्या कडे । पाहे दिराच्या मुखनीरजाकडे ॥
बोले मला त्यागुनि काननीं कसा । जाशील वत्सा स्वपुरासि लोकसा ॥ ३७ ॥

मदर्थ स्नेहानें सदयहृदया त्वां निजकरें
जनस्थानीं केलीं छदनसदनें त्वत्सुखकरें ॥
फलें पुष्पें मूळें प्रतिदिवस आणूनि सुरसें
वनातें ही केलें श्रम न गणुनी स्वात्मघरसें ॥ ३८ ॥

आतां मदर्थ वद कोण तशा विशाळा । येथें करील तुजवांचुनि पर्णशाळा ॥
जातोसि टाकुनि कसा मज एकलीला । हा दारुणा परमपापविपाककीला ॥ ३९ ॥

पूर्वीं पुढें सतत रक्षित राम होता । काळानळीं सुरसपत्नघृतासि होता ॥
मागें तसा चि मज मानुनियां सुमित्रा । केलें चि रक्षण सदैव हि तूं सुमित्रा ॥ ४० ॥

माथां रत्नकिरीट कुंडलयुग श्रोत्रीं विराजे बरें
बाहू अंगदभूषणें विलसती सन्मध्य पीतांबरें ॥
कंठीं मौक्तिकहार चंदनउटी अंगीं घनश्यामला
ऐसी राघवमूर्ति यावर कधीं भेटेल वत्सा मला ॥ ४१ ॥

सांद्रानंदसुधानिधि स्मितजितप्रद्युम्नराकापती
ज्यातें पाहुनि देवलोकवनिता कामज्वरें कांपती ॥
कस्तूरीतिलकाभिराम ममतन्नेत्रैकविश्राम तें
रम्य श्मश्रुल राघवानन कधीं भेटेल वत्सा मतें ॥ ४२ ॥

अंतर्बहिर्भवरवित्रि स्वकरें सदा ही । मिथ्या प्रपंच पथिकास नरास दाही ॥
तत्तापसंततिस जो स्मरणेंच नाशी । रामांघ्रि देइल कधीं सुख लोचनांसी ॥ ४२ ॥

सीते सीते म्हणवुनि वनीं शोधितां नित्य मातें
जो आलिंगी युगभुजयुगीं घट्ट वल्लीद्रुमातें ॥

---

९६ अंघ्रि=पाय. ९७ विपाक=परिणाम. ९८ कश्मलसिंधु=मूर्च्छासागर. ९९ नीरज=कमल. १०० छदनसदन=पर्णशाळा. १ सपत्नघृत=शत्रुरूपी तूप. २ होता=होम करणारा. ३ सुमित्रा=लक्ष्मणमाता. ४ सुमित्रा=हे लक्ष्मणा. ५ सांद्रानंदसुधानिधि=अत्यानंदरूप अमृताचा ठेवा. ६ स्मितजितप्रद्युम्नराकापती=हास्यानें जिंकिला आहे मदन व चंद्र ज्यानें. ७ अभिराम=सुंदर. ८ श्मश्रुल=केसाळ. ९ भवरवि=संसाररूपी सूर्य. १० कर=किरण. ११ दाही=जाळी.

मत्प्राप्त्यर्थ द्विजवर सख्या मुख्य भर्ता जगाचा ॥
पूर्वी झाला विरहविमना[12] मित्र शाखामृगांचा[13] ॥ ४४ ॥
जाणोनियां क्षिप्र[14] मदाशयाला[15] । म्हणे धरावें प्रमदाशयाला[16] ॥
नेऊनि पूर्वी मम तातपूतें । केला धनुर्भंग नितांत पूतें ॥ ४५ ॥
मद्विधिकलशभवानें[17] रामकृपासिंधु[18] शोषिला सारा
आतां मज शफरीलीं[19] कैंचा अन्यत्र वांसरा[20] थारा ॥ ४६ ॥
स्वभ्रातृघातोद्यमभीषणातें[21] । व्यापार हा योग्य बिभीषणातें ॥
वत्सा तुझी केवळ नम्र मुद्रा । कां धाडिलें तूज दयासमुद्रा ॥ ४७ ॥
त्यजावया मज जनहीन काननातें । प्रयोजिला अदय सुकंठें[22] कां न नाथें
कुकर्म हें विहित तया वलीमुखाला[23] । तुझ्या मलीमसरुचि[24] पावली मुखाला ॥ ४८ ॥
श्वश्रूजनांसि[25] माझें नमन निवेदूनि सर्व विदितनया[26]
स्मरण धरूनि सांगावा निरोप हा त्यांस पंक्तिरथतनया[27] ॥ ४९ ॥
ध्यानें क्षणें करुनियां त्वदयाख्यधामीं[28] । पायांसि लक्षित असें तुमच्या सदा मी
प्रत्यक्ष लागुनि परी मम मस्तकाला । देतील यावर कधीं न कळे सुखाला ॥ ५० ॥
हृत्कायवाक्कर्मजदोष[29] मातें । नसे कसें हें कळलें वराला
सत्वक्षयें पातक अन्यथा मी । न वाहतें हीन कलेवराला[30] ॥ ५१ ॥
आहें मी सत्वसंपन्ना[31] कृपात्याग नका करूं
असाधु अथवा साधु परंत्वत्याज्य[32] लेंकरूं ॥ ५२ ॥
अपराधवियुक्ता मी परि मज त्यजिलें वनांत भूमिवरें
बुध म्हणाति दैव दुस्त्यज तें आलें प्रत्ययासि[33] आजि बरें ॥ ५३ ॥
सांगुनि असें दिराला निरोप हा पाठवी क्षितिवराला[34]
दृढ करुनि हृदय कानें तो ऐकावा समस्त रसिकानें ॥ ५४ ॥

---

१२ विरहविमना=वियोगानें व्याकुळ झालें आहे मन ज्याचें असा. १३ शाखामृग=वानर. १४ क्षिप्र=सत्वर. १५ मदाशय=माझें मनोगत. १६ प्रमदाशय=स्त्रीचा हात. १७ मद्विधिकलशभव=( मद् + विधि + कल + भव ) माझें नशीब हाच एक अगस्त्य मुनी. १८ सिंधु=समुद्र. १९ शफरी=मत्स्यी. २० वांसरा=हे वत्सा. २१ स्वभ्रातृघातोद्यमभीषण=( स्व+भ्रातृ+घात+उद्यम+भीषण ) आपल्या भावाचा घात करण्याचा उद्योग केल्यामुळें झाला आहे भयंकर जो. २२ सुकंठ=सुग्रीव. २३ वलीमुख=वानर. २४ मलीमसरुचि=( मलीमस+रुचि ) काळिमा. २५ श्वश्रूजन=सासवा. २६ विदितनय=( विदित+नय ) माहित आहे नीति ज्याला असा. २७ पंक्तिरथतनय=( पंक्तिरथ+तनय ) दशरथ पुत्र. २८ हृदयाख्यधाम=हृदयरूपी गृह. २९ हृत्कायवाक्कर्मज=मानसिक, कायिक, व वाचिक कर्मांपासून उद्भवणारा. ३० कलेवर=शरीर. ३१ सत्वसंपन्ना=गर्भिणी.(सत्व=गर्भ) ३२ परंत्वत्याज्य=परंतु+( अत्याज्य ) परंतु टाकण्यास अयोग्य. ३३ प्रत्यय=अनुभव. ३४ क्षितिवर=राजा.

दोषघ्न सेव्य सुचरित्रसुधैकसिंधो[35]। सर्वैकवंद्य नृपसत्तम दीनबंधो
कां त्यागिलें मज वनीं करुणांबुवाहा[36]। त्वद्विप्रयोगें[37] बहु दारुण राघवा हा ॥ ५५ ॥
त्वत्पादपद्मभजनाविण भारभूतें । या जीवितें करुनि केवळ भार भूतें ॥
टाकूं जरि त्वरित निंद्य कलेवराला । विघ्नस्वरूप तव वीर्यनिषेक[38] झाला ॥ ५६ ॥
वियोगभीतिस्तव विग्रहातें[39]। न लाविला चंदनलेप हातें
मध्यें नदी पर्वत वृक्ष लक्ष । जाऊनि झालासि कसा अलक्ष[40] ॥ ५७ ॥
प्रसूति झाल्यावरि देहनाथा । करीन मी तीव्र तपः प्रयोगा
जन्मांतरीं होऊनियां तुझी स्त्री । जेणें न पावें क्षण विप्रयोगा ॥ ५८ ॥
स्वहृदय अशनिहुनि[41] कठिन हें तथ्य [illegible] या क्षणीं मला कळलें
विरहघनपतनविदलित[42] आजुनि शतचूर्ण होइना जळलें ॥ ५९ ॥
अंतर्वत्नी[43] पत्नी त्यजिली त्वां जेवि पांसुला[44] रामा[45]
हें काय विहित तुझिया कुळास शीळास[46] पंडिता रामा ॥ ६० ॥
त्वत्पादनीररुहलंपट[47] चित्त माझें । त्याणें हि आजि मजला त्यजिलें सखाजें
होतां स्वदैव विपरीत निजाप्तमित्रें। होतानि केवळ चि हेतु विना अमित्रें[48]॥ ६१ ॥
निरोप हा सांगुनि देवराला[49] । सीता तयाला मग दे वराला
म्हणे तुतें क्षेम[50] असो अशातें । सदा सुबुद्धे बहु पाव शातें[51] ॥ ६२ ॥
एवं कथावा रघुनंदनातें । निरोप हा सांगुनि वंदनातें
कळेल जैसें तुजला कृपाळा । जाऊनि तैसें विनवीं नृपाळा ॥ ६३ ॥
ओकें[52]आत्मधनस्त्रीतें । ओकें[53] मानूनि मानसें
तोकें[54]वद्रोदन तदा । तो करी ऐकतां असें ॥ ६४ ॥
विपिनीं[55] वनदेवता सदा । तुज रक्षून न दुःख हो कदा ॥
मृदु बोलुनियां असें तिला । नमुनी लक्ष्मण वीर चालला ॥ ६५ ॥
अयोध्येला जातां त्यजुनि तिजला तो बहु रडे ॥
तनू नेली कष्टें परि मन तयाचें न मुरडे ॥
जसा वत्स स्वांबाविरहभवतापें[56] तळमळे
तसा हा ही ज्याचें वदन रडतां केवळ मळे ॥ ६६ ॥

---

३५ सुचरित्रसुधैकसिंधो=उत्तमचारित्ररूपी अमृताचा ठेवा. ३६ अंबुवाह=मेघ. ३७ विप्रयोग=वियोग. ३८ वीर्यनिषेक=रेतः सिंचन (गर्भ) ३९ विग्रह=शरीर. ४० अलक्ष =अदृश्य. ४१ अशनि=वज्र. ४२ विरहघनपतनविदलित=( विरह+घन+पतन+विदलित ) विरहरूपी घणाच्या घावानें फोडलेला. ४३ अंतर्वत्नी=गर्भिणी. ४४ पांसुला=जारिणी. ४५ रामा=स्त्री. ४६ शील=स्वभाव. ४७ पादनीररुह=पदकमल. ४८ अमित्रें=शत्रु. ४९ देवर=दीर. ५० क्षेम=कुशल. ५१ शातें=सुखाला ( श=सुख ). ५२ ओक=घर. ५३ ओक =वमन. ५४ तोक=बालक. ५५ विपिन=वन. ५६ स्वांबाविरहभवताप=आपल्या मातेच्या वियोगापासून होणारें दुःख ( स्व + अंबा+विरह+भव+ताप ).

नयनागोचर देवर झाल्यावर ती पडे धरेवरती ॥
तळमळ करि पळभरि कळ न पडे करपद तिला न आंवरती ॥ ६७ ॥
जनहीन वनस्थानीं दीना जनकनंदिनी ॥
राजरामा[57] रजोरिक्ता[58] रुचिराक्षी[59] रवें रडे ॥ ६८ ॥
झाला दिसेना असा जे क्षणीं दीर गेला तिचा तीस सोडूनियां धीर ॥
हृच्छोकवल्मीकभूकश्मलव्याळ[60] चावे धरी घट्ट मातेसि[61] तत्काळ ॥ ६९ ॥
गळती समान नयनें गळती लपनें[62] न येति धड आलपनें[63] ॥
निजविग्रहासि[64] उठवी निजवी जनकात्मजा स्मरतसे जनका ॥ ७० ॥
शोक लास्य[65] करी हृदंगणिं[66] कंठ केवळ शोकला
कोमलानन पूर्णचंद्र तिचा तदा बहु कोमला ॥
कां पती रुसला ह्मणे सकळेंद्रियें बहु कांपती
भार तीस निजांग होय वदे अशी मग भारती[67] ॥ ७१ ॥
जनकाची मी कन्या रघुपतिची स्त्री त्रिविष्टपीं[68] मान्या ॥
तदपि अशी मदवस्था शिव शिव लिहिलेंसि काय कमळस्था[69] ॥ ७२ ॥
येईल लक्ष्मण फिरोनि न दूर गेला
मद्दुर्यलोक[70]विषयीं च विनोद[71] केला ॥
कीं स्वप्न हा क्षणिक दुःख सुखप्रदाता
किंवा स्वकर्मफळ भोगवितो विधाता ॥ ७३ ॥
रघुकुळतिळक मेदिनीपाळका[72] ॥
सुहृदयपदका पापपंकोदका[73] ॥
सुहृदालिकमला[74] नीरदश्यामला[75] ॥
अतुलभुजबळा[76] भग्नरक्षोबळा[77] ॥ ७४ ॥

---

५७ राजरामा=राजाची स्त्री अथवा उत्तम स्त्री. ५८ रजोरिक्ता=रजोगुणरहित. ५९ रुचिराक्षी=सुंदर आहेत डोळे जीचे अशी. ६० हृच्छोकवल्मीकभूकश्मलव्याळ=(हृत्+शोक+वल्मीक+भू+कश्मल+व्याल) हृदयांतील शोक हेंच वारूळ त्यापासून उत्पन्न झालेला मूर्च्छारूपी साप. ६१ माता=आई[पृथ्वी]. ६२ लपनें=मुख. ६३ आलपनें=भाषण. ६४ विग्रह=शरीर. ६५ लास्य=नाचणें. ६६ हृदंगण=हृदयरूपी अंगण. ६७ भारती=वाणी ६८ त्रिविष्टप=त्रिजगत्. ६९ कमलस्था=हे ब्रम्ह्या. ७० लोक= पहाणें. ७१ विनोद=थट्टामस्करी. ७२ मेदिनीपाळ=राजा. ७३ पापपंकोदक=पापरूपी चिखल धुवून टाकणारें उदक. ७४ सुहृदलिकमल=सुहृद्रूपी भ्रमरांस कमलासारखा. ७५ नीरद=मेघ. ७६ अतुळभुजबळ=अतुल भुजांचें बल ज्याच्या असा. ७७ भग्नरक्षोबल=भग्न केलें आहे राक्षसांचें बळ ज्यानें असा.

प्रवर्तोनियां सर्वथा आग्रहातें । त्यजावें जरी येक्षणीं विग्रहातें ॥
तरी भ्रूणहत्ये मूळें उग्र हातें । करील स्वयें धर्म तो विग्रहातें ॥ ७५ ॥
तोषधनाचे तस्कर त्या सीतेचे असे विलाप वनीं ॥
शिरले जेव्हां सत्वर दुःखप्रद ते चढोनियां पवनीं ॥ ७६ ॥
शुक पिक सकल कलकलस्वरें करुनि भोंवतीं च आरडती ॥
विविधपतगनिकररवच्छलें करुनि भूमिभूलता रडती ॥ ७७ ॥
टाकुनि नाट्यरसातें धांवुनि आले तिच्या समीप शिखी[१०] ॥
शिंपुनि निज नेत्रजळें ह्मणति सतीचा विझो प्रकोपशिखी[११] ॥ ७८ ॥
शिंपिति नेत्रजळांहीं स्वल्प शिवति भूमि धांवतां हरिणें ॥
स्वदुहितृशुगग्नितप्ता क्षिति ह्मणवुनि पोळती जणों चरणें ॥ ७९ ॥
शीतळकमलजळांहीं वर्षति तीच्या तनूवरि भ्रमरी ॥
निजवालधिचमरांहीं वीजिति तिस किंकरीपरी चमरी ॥ ८० ॥
सुमदालसा जलार्द्रा ज्यांच्या सजळें करीं शिरीं कमळें ॥
ऐशा करिणी सेविति तिस कर्णव्यजनमारुतें विमळें ॥ ८१ ॥
उदकस्थखगगणांहीं धांवुनि ते शिंपिली जलकणांहीं ॥
करिति शकुंतद्विजवर पक्षच्छायेसि शीघ्र तीजवर ॥ ८२ ॥
झालें हंसांचें कुळ तें व्याकुळ तेथ जानकी शोकें ॥
ज्यांच्या मुखनयनांहुनि गळति मृणाळें जळें तदवलोकें ॥ ८३ ॥
पंचास्य व्याघ्र ऋक्षप्रभृतिवनचरें केवळ क्रूर सत्वें[१००] ।
तीं ही तत्काळ झालीं सकरुणहृदयें भूसुताशुद्धसत्वें ॥
जें सन्मार्गप्रचारें करूनाचि असतें संग्रहीं पुण्य हो तें ।
सर्व व्यापन्महीध्रप्रशमनविषयीं वज्रवद्दक्ष होतें ॥ ८४ ॥
कुश कंटक गोक्षूर संचरणीं । चरणीं क्षतदस्थ मुखें शिवतां ॥
शिवति परि भूपतिची रमणी । रमणीयपदांसि जपे पतिच्या ॥ ८५ ॥

---

७८ भ्रूणहत्या=गर्भहत्या. ७९ धर्म=यमधर्म. ८० विग्रह=अवरूप, शिक्षा. ८१ तोषधनाचे तस्कर=संतोषरूपी द्रव्य लुटणारे म्हणजे दुःख उत्पन्न करणारे. ८२ पवन=वायु. ८३ शुक=पोपट. ८४ पिक=कोकिल. ८५ पतग=पक्षी. ८६ निकर=समूह. ८७ रव=ध्वनि. ८८ छल=मिष. ८९ नाट्य=नृत्य. ९० शिखी=मोर. ९१ शिखी=अग्नि. ९२ शुगग्नि=शोकरूपी अग्नि [ शुच्+अग्नि ]. ९३ वालधिचमर=[ वालधि+चमर ] पुच्छरूपी चंवरी. ९४ किंकरी=दासी. ९५ चमरी=हरिणी विशेष. ९६ करीं=सोंडेंत. ९७ उदकस्थखगगण=पाण्यांतील पक्ष्यांचा समूह. ९८ द्विजवर=पक्षिश्रेष्ठ. ९९ मृणाल=कमळांचा देंठ. १०० प्रभृति=आदि. १ सत्वें=श्वापदें. २ सर्वव्यापन्महीध्रप्रशमन=[ सर्व+वि+आपत्+महीध्र+प्रशमन ] सर्व विपत्तिरूप पर्वताचा नाश. ३ वज्रवद्दक्ष=वज्रासारखा प्रवीण. ४ कुश=दर्भ. ५ गोक्षूर=गोखरू( सराटे)

निजजननी क्षिति हे ही क्षितिजा[६] जाणूनियां असें नातें ॥
आलिंगुनि समजाविति ह्मणवुनि धूलिस्वसा[७] जणों तीतें ॥ ८६ ॥
हृद्गत मी परि कांहीं इच्या श्रमाचा नव्हे चि परिहार ॥
ह्मणुनि जणों अश्रूतें गाळी मुक्ताफळच्छळें हार ॥ ८७ ॥
संगें घेवुनि वेदशास्त्रनिपुण छात्रांसि[८] त्या काननीं[९] ।
यूपार्थ[१०] भ्रमतां क्रतुस्तव[११] विलापातें तिच्या ऐकुनी ॥
साक्षाद्भस्मजटाभृदीश्वर[१२] जणों मूर्ती जगत्पावनी
आला तेथ दयानिधान भगवान् वाल्मीकिनामा मुनी ॥ ८८ ॥
जैमिनिकृत भारतगत हयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
हा चवथा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ८९ ॥

---

समीप येऊनि कलेवराशी[१३] । पाहे तदा त्यासि कळे वराशी[१४] ॥
जेणें न राहे श्रमभार[१५] तीचा । केला मृदूपक्रम भारतीचा[१६] ॥ १ ॥
वत्से काय तवाभिधान[१७] रडसी कां काननीं निर्जनीं ।
कोणाच्या सुकृतैकनीरनिधिच्या[१८] वंशांत झाली जनी[१९] ॥
कोण त्वत्पति टाकिलें अकरुणें आणोनि येथें तुला
कोणीं सर्व हि सांग तूं मज निज क्लेशाचिया हेतुला[२०] ॥ २ ॥
वाणीतें ऐकतां तीचें चित्त संतोष पावलें
बोले वंदूनि शिरसा[२१] मुनिचीं दिव्य पावलें ॥ ३ ॥
महामुने मैथिल[२२] तात माझा । मन्नाम सीता पति राम राजा ॥
भूवल्लभाज्ञाप्रियमंदिरानें[२३] । आणूनि येथें त्यजिलें दिरानें ॥ ४ ॥
ऐसें ऐकूनि वाल्मीकि वदता जाहला मुखें ॥
आकर्णावें[२४] रसज्ञांहीं स्वस्थ होऊनियां सुखें ॥ ५ ॥
सर्वज्ञानिजनासि संमत[२५] असा श्रीमैथिल त्वत्पिता
वत्से तूं हि पतिव्रताजनशिरोभूता जगत्पूजिता ॥

---

६ क्षितिजा=भूकन्या. ७ धूलिस्वसा धूलिरूपी बहिणी. ८ छात्र=शिष्य. ९ कानन=वन. १० यूप=यज्ञस्तंभ. ११ क्रतु=यज्ञ. १२ भस्मजटाभृदीश्वर=भस्म व जटा धारण करणारा महादेव. १३ कलेवर=शरीर. १४ वराशी=( वरा+अशी ) श्रेष्ठाशी. १५ भार=ओझें. १६ भारती=वाणी. १७ अभिधान=नांव. १८ नीरनिधि=सागर. १९ जनी=जन्म. २० हेतु=कारण २१ शिरसा=मस्तकानें. २२ मैथिल=जनकराजा. २३ भूवल्लभाज्ञाप्रियमंदिर=राजाच्या आज्ञेचें आवडतें घर असा लक्ष्मण ( भू+वल्लभ+आज्ञा+प्रियमंदिर ). २४ आकर्णावें=ऐकावें. २५ संमत=मान्य.

माझा केवळ तो सखा दशरथ क्षोणीश[२६]चूडामणी
या वेळेसि कशी न होशिल दयापात्र क्षितिस्वामिणी ॥ ६ ॥
केलें दुष्कर देवकार्य सकल क्ष्मादेव[२७] केले सुखी
न्यायें भूपति पाळितो निजजनक्लेशाटवीचा[२८] शिखी ॥
माझा क्रोध तथापि मैथिलसुते आहे चि रामावरी
दोषावांचुनि टाकिली अकरुणें सत्वोदरी सुंदरी ॥ ७ ॥
रिपुयमयमपुत्रप्राप्तिला[२९] पावसी ते ।
करितिल सुख तूतें टाकि चिंतेसि सीते ॥
मुलि उठ चल माझ्या पुण्यपुंजाश्रमाला
शिव शिव बहु रानीं पावलीस श्रमाला ॥ ८ ॥
मदाश्रमपदाश्रितस्थिरचरास हि व्यापदा ।
कदापि न शिवे सुखी विगतवैर सारे सदा ॥
उदास हृदयीं न हो द्विजवधूसुता[३०] शर्मदा[३१] ।
न दाबितिल भिन्नता तुज महानुकंपास्पदा[३२] ॥ ९ ॥
होइल सुखप्रसूति अपत्यसंस्कारविधि हि भृतनये ॥
वत्से मदाश्रमाला मानुनियां स्वगुरुचें[३३] निकेतन[३४] ये ॥ ९ ॥
एवं तदां ऐकतां विप्रवाणीस। झाला महा तोष काकुत्स्थराणीस[३५] ॥
चित्तीं ह्मणे हा मुनि स्तुत्य विश्वास[३६]। ठेवी तयाच्या पदीं घट्ट विश्वास॥१०॥
पुशी अवनिजा[३७] निजाश्रुसलिलालिला[३८] सुविकळा कळानिधिमुखी[३९] ॥
उठूनि नमुनी मुनीस मगती गती करि तदा तदाश्रमपदा ॥ ११ ॥
सद्विद्यासक्तशिष्यव्रजतनयसुतास्त्रीयुत[४०] ब्रह्ममाला[४१] ॥
सामोऱ्या तीस आल्या परिसुनि सहसा रामरामागमाला[४२] ॥

---

२६ क्षोणीशचूडामणि=( क्षोणी+ईश+चूडा+मणि ) राजश्रेष्ठ. २७ क्ष्मादेव=( क्ष्मा+देव ) =भूदेव ( ब्राह्मण ). २८ क्लेशाटवीचा शिखी=क्लेशरूपी अरण्याचा अग्नि. म्ह० क्लेशहारक. २९ रिपुयमयमपुत्रप्राप्ति= रिपु+यम+यम+पुत्र+प्राप्ति ) शत्रूंचा नाश करणारे अशा जुळ्या पुत्रांचा लाभ. ३० द्विजवधुसुता=ब्राह्मणस्त्रियांच्या मुली. ३१ शर्मदा=सुखदा. ३२ अनुकंपास्पद=दयाळू ( अनुकंपा+आस्पद ). ३३ स्वगुरु=स्वपिता. ३४ निकेतन=घर. ३५ काकुत्स्थराणी=रामाची राणी. ३६ विश्व=सर्व. ३७ अवनिजा=भूमिजा ( सीता ). ३८ निजाश्रुसलिलालि=( निज+अश्रु+सलिल+आली ) आपल्या अश्रूंच्या उदकाची पंक्ति. ३९ कळानिधिमुखी=चंद्र ( कळानिधि ) मुखी. ४० सद्विद्यासक्तशिष्यव्रजतनयसुतास्त्रीयुत=( सत्+विद्या +आसक्त +शिष्य +व्रज+तनय+सुता+स्त्री+युत ) उत्तम विद्येच्या ठायीं आसक्त असा शिष्यांचा समुदाय, पुत्र, कन्या व स्त्रिया यांहींसह वर्तमान. ४१ ब्रह्ममाला=ब्राह्मणसमूह. ४२ रामरामागम=( राम + रामा+आगम ) रामाच्या स्त्रीचें येणें.

आशीर्वादामृतानें मुनिवरघन[४३] ते तीवरी वर्षती तें ।
पाहूनि ब्राह्मणांचें सदयपण महा जाहला हर्ष तीतें ॥ १२ ॥

ह्मणति ऋषिस्त्री हातें स्पर्श करुनियां तदीय देहातें ॥
आह्मी सर्व तवाश्रित आलिस तूं आपुल्या चि गेहातें ॥ १३ ॥

फार तूं श्रमलीस हिंस्रगणा[४४]चिया भवनीं वनीं ।
दुःखभीतिसमयावरि क्षिति क्षितिकन्यके न मनीं मनीं[४५] ॥
प्रार्थिली असि पूजिली मग तापसीनिकरें करें ॥
अर्पिलीं तिस कंदमूळफळें मुनिप्रवरें वरें ॥ १४ ॥

मग शिष्यप्रकरानें[४६] पावूनि वाल्मीकिच्या निदेशाला[४७]
निर्मुनियां स्वकरानें दिधली भूनंदिनीस दलशाला[४८] ॥ १५ ॥

पूजी राघवपादुकांप्रति नमी वाल्मीकिला ते सती ।
सेवी तद्वदनोद्गतोत्तमकथापीयूष[४९]धारेस ती ॥
सिंपी श्रीतुलसीवनासि तमसा विश्वंभराकारणें
अर्पी वेंचुनियां सुमांसि[५०] मुनिच्या देवार्चनाकारणें ॥ १६ ॥

वन्याहारपरा कृशा सुमलिना संवीतवल्कांबरा[५१] ।
कांतध्यानधरा सदैव तमसास्नानैकबद्धादरा[५२] ॥
ऐसी रामवियोगतप्तहृदया सीता मुनींद्राश्रमीं ।
कल्पव्यायतवासरासि[५३] परम क्लेशें करूनि क्रमी ॥ १७ ॥

गर्भाचे नव मास पुण्यविपिनीं संपूर्ण झाल्यावरी ।
वृद्धस्त्रीसमुपासितां जसि महा सिध्यासिता शांकरी ॥
सल्लग्नग्रहयुङ्निशीथ[५५]समयीं[५४] पुत्रद्वयातें सुखें
वैदेही प्रसवे सती प्रमुदिता गीतासि गाती मुखें[५६] ॥ १८ ॥

---

४३ मुनिवरघन=ऋषिश्रेष्ठरूपी मेघ. ४४ हिंस्रगण=श्वापदसमूह. ४५ न मनीं मनीं=मनांत मानूं नको. ४६ प्रकर=समूह. ४७ निदेश=आज्ञा. ४८ दलशाला=पर्णशाला. ४९ पीयूष=अमृत. ५० सुम=फूल. ५१ संवीतवल्कांबरा=नेसली आहे झाडांच्या साली हींच वस्त्रे जी ( संवीत + वल्क + अंबर ). ५२ तमसास्नानैकबद्धादरा=तमसानामक नदींत स्नान करण्याची हौस आहे जिला अशी. ५३ कल्पव्यायतवासर=कल्पासारखे लांब म्ह० मोठे दिवस ( कल्प + व्यायत + वासर). ५४ सल्लग्नग्रहयुङ्निशीथसमयीं=सत् + लग्न+ग्रह+युज् + निशीथ+समयीं ) उत्तम लग्न व ग्रह यांहीं युक्त अशा मध्यरात्रीच्या काळीं. बालकाच्या जन्मसमयीं राशिचक्राचा जो भाग क्षितिजास लागलेला असतो म्हणजे जी रास उगवत असते तिला लग्न म्हणतात. ५५ निशीथ=मध्यरात्र. ५६ मुखें=तोंडानें.

शोभे प्रदक्षिणार्चिः[57] स्वधेश[58] होतां सती प्रसूता हे
झाल्या विमला काष्ठा[59] शीतळ सौरभ[60] सदागती[61] वाहे ॥ १९ ॥
द्युतिकर[62]पुत्रयुगाला[63] यदा प्रसवली विदेहकुलभूषा ॥
मूर्धांस[64] पर्णशाळा वाटे तेजःसमूहमंजूषा[65] ॥ २० ॥
ज्या दल[66]शालेमध्यें होता श्रुतिशास्त्रतत्वलीन मुनी ॥
तेथें धांवत जाउनि बद्धांजलि शिष्य बोलती नमुनी ॥ २१ ॥
ब्रह्मन् भवत्प्रसादें सीता व्याली किशोर[67]युगलाला ॥
त्याच्या तेजः प्रसरें दीपाचा गर्व सर्व हि गळाला ॥ २२ ॥
भास्करविधू[68] म्हणावे तरि तापकलंक[69]संवियोजित कीं ॥
दिसताति साधुचिन्हें सामुद्रिकशास्त्रसंमतें जितकीं ॥ २३ ॥
कुशल वचन ऐकतां चि ऐसें कुशलवमुष्टिधर[70] द्विजेंद्र गेला ॥
रुचिरवदनबालकद्वयाच्या रुचिरव*संग्रहणें प्रहृष्ट झाला ॥ २४ ॥
होते जे कर[71]पंकजीं कुशलव क्ष्मानिर्जरें[72] रक्षिले ।
त्यांहीं ते शिशु मंत्रपूततमसापाथःकणें[73] प्रोक्षिले ॥
नामें तीं च सुजातकर्मसमयीं चित्तांतरीं भाविलीं ।
बाराव्या दिवसांत नामकरणीं अत्यादरें ठेविलीं ॥ २५ ॥
द्वादशाब्दीं कुमारांचीं केलीं मौंजीनिबंधनें ॥
तपः[74]शिखिमुखक्षिप्तस्वपूतवपुरिंधनें ॥ २६ ॥
मागोन आणवि तदा जो वसिष्ठमुनिच्या नंदिनीप्रति[75] मुनी ;
प्रार्थी कवींद्र तिस पूजूनि विप्रजनसंभोजनार्थ नमुनी ॥
त्या कामधेनुतनूपासुन दिव्य विविधान्नें बहू प्रकटलीं ॥
तत्सेवनें विपिन[76]वासिद्विजेंद्ररसनाग्रें मुखांत नटलीं ॥ २७ ॥

---

५७ प्रदक्षिणार्चिः=उजवेकडे वळत आहे ज्वाला ज्याची असा (प्रदक्षिण+अर्चिः) ५८ स्वधेश=(स्वधा+ईश) स्वधेचा पति अग्नि. ५९ काष्ठा=दिशा. ६० सौरभ=सुवासिक. ६१ सदागती=वायु. ६२ द्युतिकर=तेजस्वी. ६३ युग=जोडी. ६४ मूर्धांस=स्त्रियांस. ६५ मंजूषा=पेटी. ६६ दलशाला=पर्णशाला. ६७ किशोर=बालक. ६८ भास्कर-विधू=सूर्यचंद्र. ६९ कलंक=डाग. ७० कुशलवमुष्टिधर=(कुश+लव+मुष्टि+धर) दर्भ व लव्हाळे हातीं धरणारा म्ह० ब्राह्मण. ७१ पंकज=कमल. ७२ क्ष्मानिर्जर=भूदेव (ब्राम्हण) ७३ मंत्रपूततमसापाथःकणें=(मंत्र+पूत+तमसा+पाथ+कणें) मंत्रांनीं पवित्र केलेल्या तमसा नामक नदीच्या पाण्याच्या बिंदूनें. ७४ तपःशिखिमुखक्षिप्तस्वपूतवपुरिंधन=तपोरूपी अग्नीच्या मुखांत स्वशरीररूपी समिध टाकिली आहे ज्यानें असा म्हणजे तपस्वी. ७५ नंदिनी=कामधेनूची कन्या. ७६ विपिन=अरण्य. * रुचिरव=कांति व शब्द.

विधृतचतुःषष्टिकला[७७] मुक्ताहारा मनोहरा विमला ॥
वरिति चतुर्दश विद्या स्वयंवरवधू तयांस मग सकळा ॥ २८ ॥
अध्यापिली[७८] मुनीनें त्यांतें रामायणाभिधा[७९] स्वकृती[८०] ॥
गाती वीणातालस्वरमिश्रितमंजु[८१] ते कुमार कृती ॥ २९ ॥
कुशलवगानावसरीं[८२] गीतरसें मृगकुळें न तीं चरती ॥
अष्टौ सात्विक भाव श्रोतृगणीं एकदां चि संचरती ॥ ३० ॥
लवकुशगानावसरीं तच्छ्रवणें भुजगलोचनें[८३] निवती ॥
शून्या होय सुधर्मा[८४] पवनाचे दार[८५] फार मानवती ॥ ३१ ॥
कोणी कृपाण[८६] कोणी सुचर्म[८७] कोणी समर्पिले बाण ॥
कोणी किरीट कोणी कार्मुक[८८] कोणीं दिलें तनुत्राण[८९] ॥ ३२ ॥
एवं त्यांच्या गानें झाला नाहीं कधीं चमत्कार ॥
कोणीं पण विप्रांहीं केला नाहीं तयांसि सत्कार ॥ ३३ ॥
दुष्टहृत्पद्मसारातें[९०] पीती त्यांचे शिलीमुख[९१] ॥
सज्जनांच्या पदांभोजीं[९२] हे चि होती शिलीमुख[९३] ॥ ३४ ॥
एवं वाल्मीकिसेवानिरत कुशलव स्वप्रसूच्या[९४] सतीच्या ।
आज्ञेतें सेवनातें क्षण हि न चळती साधु जैसे श्रुतीच्या ॥
वन्याहारी परंतु प्रमुदित चि सदा ते महाधैर्यसिंधू ।
भिन्ना मूर्ती च त्यांच्या न मन निवसती यापरी दोघ बंधू ॥ ३५ ॥
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
अध्याय पांचवा हा श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ३६ ॥

---

साकेतीं[१] श्रीवसिष्ठप्रभृतिमुनिंस[२] तो राम सन्मार्गचारी ।
क्षाळावा ब्रह्महत्यामळ सुकृतजळें कोणत्या हें विचारी ॥

---

७७ विधृतचतुःषष्टिकला=धारण केल्या आहेत ६४ कला ज्यांहीं. ७८ अध्यापिली=शिकविली. ७९ रामायणाभिधा=रामायणनांवाची. ८० स्वकृती=स्वतः रचिलेला ग्रंथ. ८१ मंजु=मधुर. ८२ अवसर=समय. ८३ भुजगलोचन=सर्पांचे डोळे म्हणजे कान (सर्पांचे डोळे व कान एकच आहेत म्हणून त्याला चक्षुःश्रवा म्हणतात.) ८४ सुधर्मा=देवांची सभा. ८५ पवनाचे दार=वायूची स्त्री[?] ८६ कृपाण=तरवार. ८७ सुचर्म=चांगली ढाल. ८८ कार्मुक=धनुष्य. ८९ तनुत्राण=चिलखत. ९० दुष्टहृत्पद्मसार=दुष्टांच्या हृदयरूपी कमलांतील मध (दुष्ट+हृत्+पद्म+सार.) ९१ शिलीमुख=बाण–पक्षीं भ्रमर. ९२ पदांभोज=पदकमल. ९३ शिलीमुख=भ्रमर. ९४ प्रसू=माता. १ साकेत=अयोध्या. २ वसिष्ठप्रभृति=वसिष्ठादि.

ते लंकेशांतका[3]ला द्विजवर म्हणती हे जगच्छक्र[4] तूतें ।
नाहीं दुःसाध्य कांहीं पण कर विधिवद्वाजिराज[5]क्रतूतें ॥ १ ॥
आम्ना[6]याच्या मतें स्त्रीरहित नर नव्हे यज्ञकर्माधिकारी ।
जाला या हेतु साठीं कनकजनक[7]जाकांत तो ताटकारी ॥
दीक्षास्वीकार केला मुनिजनवचनप्रेरितें विश्वतातें ।
योजूनि त्राण[8]कर्मीं मख[9]हयपतिच्या त्या सुमित्रा[10]सुतातें ॥ २ ॥
कौसल्या एकवीरा तदुदरभव जो राम काकुत्स्थ वीर ।
हा तन्मुक्ताश्व यातें धरू समरबळी ज्यासि होईल धीर ॥
एवं सौवर्णपत्रीं लिहुनि रघुवरें बांधिलें वाजिभाळीं ।
सोडी विध्युक्त त्यातें निजकरकमळें पूजुनी साधु काळीं ॥ ३ ॥
अक्षौहिणीत्रयपति व्यथि[11]तारिनारी । शत्रूघ्न सत्वर निघे तुरगानुसारी ॥
सोत्साहसैनिककरा[12]हतपीनभेरी। ध्वान प्रतीपनृपतोष[13]धनापहारी ॥ ४ ॥

शत्रुघ्नध्वजिनीपदाहतरजःस्तोम[14] स्वयें अंबरीं ।
त्या यात्रा[15]समयीं उडोनि शिरला नीरात्मबिंबांतरीं ॥
झाला चिक्कण[16]पंक घट्ट जडला स्वच्छेंदुदेहास तो ।
धौतस्फाटिकभांडकज्जल तसा आजूनि हा दीसतो ॥ ५ ॥
वाजीच्या मुखफेन[17]घर्मसलिलें दंतिव्रजा[18]च्या मदें ।
झाला पंकिल मार्ग पत्ति[19]सें पदें होती विलंबप्रदें ॥
नानावाद्यनिनाद सज्जनमनःश्रोत्रांसि झाला सुधा ।
दुष्टांच्या तर चित्तमोहकरणीं व्यालास्यजन्मा सुधा ॥ ६ ॥

---

३ लंकेशांतक=राम. ४ जगच्छक्र=जगदिंद्र ( हे राजा ). ५ वाजिराजक्रतु=अश्वमेध. ६ आम्नाय=वेद. ७ कनकजनकजाकांत=सोन्याच्या सीतेचा पति. ८ त्राण=रक्षण. ९ मख=यज्ञ. १० सुमित्रासुत=शत्रुघ्न ( श्लोक ४था पहा ). लक्ष्मण व शत्रुघ्न असे सुमित्रेचे दोन पुत्र होते. ११ व्यथितारिनारी=दुःख दिलें आहे शत्रूंच्या स्त्रियांस ज्यानें असा. ( व्यथित + अरि + नारी ). १२ सोत्साह सैनिक कराहत पीन भेरी ध्वान=उत्साहयुक्त अशा शिपायांनीं आपल्या हातांनीं वाजविलेल्या मोठ्या नगाऱ्याचा ध्वनि ( स + उत्साह+सैनिक+कर+आहत+पीन+भेरी+ध्वान ). १३ तोषधनापहारी=संतोषरूपी धन नाहींसं करणारा ह्म० भीति उत्पन्न करणारा. १४ शत्रुघ्न ध्वजिनी पदाहत रजस्तोम=शत्रुघ्नाच्या सैन्याच्या पायांनीं तुडवलेल्या धुरळ्याचा समूह ( शत्रु+घ्न+ध्वजिनी+पद+आहत+रजः+स्तोम ). १५ यात्रा=गमन सैन्याचें ( कुच ) १६ चिक्कण पंक=चिकट चिखल. १७ फेन घर्म सलिल=फेंस व घामाचें पाणी. ( फेन+घर्म+सलिल ). १८ दंतिव्रज=हत्तींचा समूह. १९ पत्ति=पायदळ.

रत्नस्वर्णविभूषिता गजघटाघंटारणन्नूपुरा[20] ।
वाजिस्यंदनवाहना शुभयशोहास्या सुवाद्यस्वरा ॥
नानाभूपशिरःकिरीटमणिदीपा हा रिपुघ्नाप्रती[21] ।
ओंवाळूनि अनेक मानववर श्री घट्ट आलिंगिती ॥ ७ ॥
संगरीं मखवाजिहरधराधिपव्रज मर्दिला ।
तच्चितभसितें[22] बहु पूजणार कपर्दिला[23] ॥
जो तृणानन भूप तो न दिनेशसूनु[24]करीं दिला ।
आत्मनामगतार्थ[25] बहु पराक्रमें प्रतिपादिला ॥ ८ ॥
महा मानी होते परि पत्नि भवें दास्यपर ते ।
पर स्वांगें जाले मग विजयि ये शत्रुघ्न परते ॥
कविश्रीवल्मीकप्रभवमुनिसंस्थानवसुधा[26] ।
पथीं झाली सेनानयननिकरातें[27] नव सुधा[28] ॥ ९ ॥
त्या मुनिवराश्रमाच्या नंदनवनगर्वतस्करोपवनीं[29] ॥
अवनीशवाह[30] शिरला स्वजवें[31] लज्जेसि निर्मिता पवनीं ॥ १० ॥
त्या गहनींच्या[32] दूर्वा मरकतमणिपुंजदीप्तिच्या[33] सवती ॥
हरिच्या[34] हरिति मनातें तरुणनराच्या जशा विलासवती[35] ॥ ११ ॥
वनरक्षणार्थ तेथें करवाली[36] विप्रपुत्रगणशाली[37] ॥
होता लव वीर जसा ग्रहसंधानप्रयुक्त करमाली* ॥ १२ ॥
तेणें वनीं अकस्माद्दूर्वांकुरसेवनानुरक्त हरी[34] ॥
अवलोकितां चि त्याची श्री तन्मानससरोरुहासि[38] हरी[39] ॥ १३ ॥

---

२० गजघटाघंटारणन्नूपुरा=गज समुदायांच्या घंटा हींच खुळखुळणारीं नूपुरें आहेत जीचीं. ( गज+घटा+घंटा+रणत्+नूपुर ). २१ रिपुघ्न=शत्रुघ्न. २२ भसित=भस्म. २३ कपर्दी=शिव. २४ दिनेशसूनु=सूर्यपुत्र यम. २५ आत्मनामगतार्थ=आपल्या नांवांत असणारा अर्थ. ( शत्रुघ्न शब्दाचा अर्थ शत्रूंस मारणारा असा आहे ). २६ कविश्रीवल्मीक प्रभव मुनि संस्थान वसुधा=विद्वान वाल्मीकमुनीची राहण्याची जागा ( कवि + श्री + वल्मीक+ प्रभव +मुनि+संस्थान+वसुधा ). २७ सेना नयन निकर=सेनेच्या डोळयांचा समूह. ( सेना+ नयन+निकर ). २८ सुधा=अमृत.. ( वसुधा सुधा झाली म्हणजे वाल्मीकीची जागा पाहून सैन्यास आनंद झाला! ) २९ नंदनवनगर्वतस्करोपवन=नंदन वनाचा गर्वहरण करणारें उपवन. ३० अवनीशवाह=राजाचा घोडा ( अवनि+ईश+वाह ). ३१ जव=वेग. ३२ गहन=वन. ३३ मरकतमणिपुंजदीप्तिच्या सवती=मरकत मण्यांच्या तेजाहून ही अधिक हिरव्या. ३४ हरि=घोडा. ३५ विलासवती=स्त्रिया. ३६ करवाली=ज्याचे हातीं तरवार आहे असा. ३७ शाली=शोभणारा. ३८ सरोरुह=कमल. ३९ हरी=हरण करी. * करमाली=सूर्य.

नंदनवनभ्रमागतशक्राश्वभ्रांत्यधिष्ठित[40]स्वांतें ॥
कांतें वीरश्रीच्या धरिला वाजी लवें रु[41]षाक्रांतें ॥ १४ ॥
[*]हयभालबद्धकांचनदललिखितार्थग्रहप्रदीप्तमदें ॥
कदलीस बांधिला हय कुशानुजें निज करें खळश्रमदें ॥ १५ ॥
कौसल्या एकवीरा मम जननि नव्हे वीरसू काय वंध्या ।
ऐसें बोलोनि केली क्षितिदुहितृ[42]सुतें दृग्द्वयें तुच्छ सं[43]ध्या ॥
तेव्हां मित्रें[44] तयातें ह्मणति हय वृथा बांधिला सोड याला ।
भूपाश्वत्राण[45]कारी दवडतिल तुला श्राद्ध[46]देवालयाला ॥ १६ ॥
एवं सभयसुहृज्जनलपि[47]तातें आयकोनि धीरमणी ॥
तो लव वदे कुलोचित ठेवुनि मतिला द्विषद्बला[48]क्रमणीं ॥ १७ ॥
विप्रस्त्रीकुक्षिजन्मे भयविकळ तुह्मी क्षत्रियादेह[49]भू मी ।
सोडूं वाजीस धाकें तरि मज न हंसे काय हे सर्व भूमी ॥
मृत्युः श्रेयः कथंचिज्जरि हरिकरि[50]तां अर्पिला दुर्जनांहीं ।
लोकांमध्यें परंतु क्षितितनु[51]जानिला लाज होणार नाहीं ॥ १८ ॥
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
हा साहावाध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ १९ ॥

---

अशांत आली चतुरंग सेना । जीच्या रजें भानुसि भू दिसेना ॥
अन्योन्यशब्दग्रहणीं स्वभेरी । वृंदस्वनें जें लटिकें चि भेरी ॥ १ ॥
कोठें हय कोठें हय असें म्हणत धांवले पुढें सा[52]दी ॥
रंभा[53]स्तंभनिबद्धस्वहयासि तदीय दृष्टि आसा[54]दी ॥ २ ॥
निकटस्थ लववयस्य[55]स्तोमातें म्हणति वीर ते कोणी ॥

---

४० नंदनवनभ्रमागतशक्राश्वभ्रांत्यधिष्ठितस्वांत=नंदन वनाचा भास झाल्यामुळें आलेल्या इंद्राच्या घोडयाचा भास झाला आहे ज्याचे मनांत असा. ( नंदन+वन+भ्रम+आगत+शक्र+अश्व+भ्रांति+अधिष्ठित+स्वांत ). ४१ रुषाक्रांत=रागावलेला. ४२ क्षितिदुहितृसुत=भूकन्या सीता तिचा पुत्र लव. ४३ दृग्द्वयें संध्या तुच्छ केली=त्याचे दोन्ही डोळे संध्याकाळच्या लाली पेक्षां लाल दिसूं लागले. ४४ मित्रें=(संस्कृतांत हा शब्द नपुंसक लिंगी आहे). ४५ भूपाश्वत्राणकारी=राजाच्या घोडयाचें रक्षण करणारे. ४६ श्राद्धदेवालय=यमाचें घर. ४७ लपित=भाषण. ४८ द्विषद्बलाक्रमण=शत्रूचें बल मर्दन करणें. ४९ क्षत्रिया देहभू=क्षत्रियेचा पुत्र. ५० हरिकरितां=घोडया साठीं. ५१ क्षिति तनुजनि=भूपुत्री सीता. ५२ सादी=घोडेस्वार. ५३ रंभा=केळ. ५४ आसादी=प्राप्तकरी. ५५ वयस्यस्तोम=मित्र समूह. * घोडयाच्या मस्तकावरील सोनेरी पत्रांतील अर्थ पाहून संतापलेला.

हरिरंभा[५६]संबंधें केली अमरावती तशी क्षोणी ॥ ३ ॥
ऐसें ऐकोनि म्हणती विप्रांचीं त्यांस लेंकरें ॥
हयरत्न लवें वीरें रंभेशीं* बांधिलें करें ॥ ४ ॥
एवं पूर्वाश्रमस्थ[५७]द्विजवचन तिहीं सेविलें स्वात्मकानें ।
हांसोनी वीर तेव्हां म्हणति न कळतां बांधिला अर्भकांनें[५८] ॥
रंभेपासूनि आतां उशिर न करितां रामयज्ञीयवाजी ।
सोडा सोडा अयोध्यानगरगतपथीं चालवा चालवा जी ॥ ५ ॥
धनुर्धरूनियां करीं तुरगमोचनोपक्रमीं[५९] ।
लव त्वरित धांवला विगतविभ्र्मा महा विक्रमी ॥
ह्मणे रणधुरीण[६०] हो धरूनि गर्व निःसार हा ।
वृथा मज न जिंकितां हरिस सोडितां कां रहा ॥ ६ ॥
अशि परिशिली[६१] वाणी त्याची तिहीं जरि त्या क्षणीं ।
तदपि भट[६२] ते झाले सिद्ध स्वघोटक[६३]मोक्षणीं ॥
मग लव तदा त्या वीरांच्या करांसि शरें हरी ।
धरणिधर[६४]पक्षांतें वज्रें करूनि जसा हरी[६५] ॥ ७ ॥
विछिन्नहस्त भट ते म्हणती धरा हो । पाडा किशोर[६६] धरणीवरि हा न राहो ॥
कोपें करूनि मग सैनिक त्या प्रधानीं । एकावरी बहुत वर्षति आयुधांनीं ॥ ८ ॥
न स्पर्शती लवांगाला तीं शस्त्रें देहघातकें ॥
जैसीं श्रीगौतमीतोयस्नातमर्त्यास[६७] पातकें ॥ ९ ॥
त्यांच्या शस्त्रगणासि ओढुनि धनुर्वल्लीस वेगें करें ।
योगी संसृति[६८]बंधनाप्रति तसा छेदी स्वबाणोत्करें[६९] ॥
सादी* पत्ति रथी अनेकपपक[७०] श्रांतोनि भूमंचकीं ।
गृध्रव्रातवितानसावलिस[७१] ते घेती निजेला च कीं ॥ १० ॥
केलें स्यंदन[७२]चूर्ण बाणनिकरें वाजी द्विधा छेदिले ।

---

५६ हरिरंभासंबंध=घोडयाला केळीशीं बांधणें पक्षीं इंद्र व रंभा यांचा संयोग करणें. * रंभा=केळ. ५७ पूर्वाश्रमस्थ=ब्रह्मचारी. ५८ अर्भक=बालक. ५९ तुरगमोचनोपक्रम=घोडा सोडण्यास आरंभ करणें (तुरग+मोचन+उपक्रम). ६०* धुरीण=श्रेष्ठ. ६१ परिशिली=ऐकिली. ६२ भट=योद्धे. ६३ घोटक=घोडा. ६४ धरणिधर=पर्वत. ६५ हरी=इंद्र. ६६ किशोर=बालक. ६७ श्रीगौतमीतोयस्नात मर्त्य=श्री गोदावरी नदीच्या उदकांत स्नान केलेला मनुष्य. ६८ संसृति=संसार. ६९ उत्कर=समूह. * सादी=घोडेस्वार. ७० अनेकपपक=हत्तीवर बसणारे (अनेकप+पक=हस्तिपक). ७१ गृध्रव्रातवितानसावलिस=गिधाडांचा समूह हेंच कोणी एक छत त्याचे सावलींत. ७२ स्यंदन=रथ.

वीरांचे शुभ देह वांटुनि शिवागृध्रादिकांसी[७३] दिले ॥
शुंडादंडविहीन भूमिपतित व्याक्रोशती[७४] ते वारण[७५] ।
कोणाच्या हि शरें करूनि न घडे त्याचें रणीं वारण ॥ ११ ॥
हातीं कोदंड[७६] देहीं दृढ कवच[७७] बरें अक्षयी दोन भाते ।
रक्षोवृंदस्थ[७८] रामस्मृतिस उपजवी जानकीसूनु भा[७९] ते ॥
पांचां पांचां शरांहीं करूनि न हृदयीं भेदिलें कोणत्याला ।
एवं युद्धप्रसंगीं बहु बळ वधिलें वारितो कोण त्याला ॥ १२ ॥
केलें यापरि बालकें निज बळीं शार्दूलविक्रीडित[८०] ।
जाला या करितां रिपुघ्न[८१] परम क्रोधानळें[८२] पीडित ॥
आला बैसुनियां रथीं शरधनुष्पाणी कृपाणी[८३] रणीं ।
त्यातें तिष्ठ[८४] म्हणे स्वकीय मतिला ठेवूनि तन्मारणीं ॥ १३ ॥
शत्रुघ्न क्षितिजासुतें खर शरें भाळीं उरीं ताडिला ।
चारी ही हय वेधिले ध्वज मग च्छेदूनियां पाडिला ॥
होते जे रथचक्ररक्षक भट स्वर्गासि ते धाडिले ।
चापज्या[८५] हरिली शिलीमुख[८६] असे बारा लवें सोडिले ॥ १४ ॥
सज्य करूनि चापातें शत्रुघ्न ह्मणे लवासि सांभाळीं ॥
मग खरनाराचत्रय[८७] खदिरानळनिभ[८८] समर्पिलें भाळीं ॥ १५ ॥

तो तेधवां स्मितजितौषधिपास्य[८९] मानी । त्या सायकासि बिसतंतु[९०]समान मानी ॥
त्यातें ह्मणे लव विगर्वित बाहुसारें । वीरा तुझें बळ दिसे इतुकें चि सारें ॥ १६ ॥

ऐसें बोलुनियां लवें निरखिला शत्रुघ्न रौद्रेक्षणें ।
केला चापतुरंगसारथिरथध्वंसाकुलात्मा क्षणें ॥
तो बोले शरयुक्त कार्मुक करीं घेऊनियां दूसरें ।
जा बाळा तुज जीवदान दिधलें दे पाठ मागें सरें ॥ १७ ॥
ऐसें बोलुनि राघवें* खरशर क्रोधें तदा सोडिला ।

---

७३ शिवागृध्रादि=कोल्ह्या व गिधाडें इत्यादि. ७४ व्याक्रोशती=ओरडती. ७५ वारण=हत्ती. ७६ कोदंड=धनुष्य. ७७ कवच=चिलखत. ७८ रक्षोवृंद=राक्षससमूह. ७९ भा=शोभा. ८० शार्दूलविक्रीडित=वाघाचा खेळ (मारामार, तोडातोड; या शब्दानें या श्लोकाचें वृत्त ही सूचविलें आहे. ८१ रिपुघ्न=शत्रुघ्न. ८२ क्रोधानळ=राग हाच अग्नि. ८३ कृपाणी=ज्याचे हातीं तरवार आहे असा. ८४ तिष्ठ=उभा राहा. ८५ ज्या=दोरी. ८६ शिलीमुख=बाण. ८७ नाराचत्रय=तीन बाण. ८८ खदिरानळनिभ=खइराच्या निखाऱ्यांसारखे तीक्ष्ण. ८९ स्मितजितऔषधिपास्य=हास्यानें जिंकिलेल्या चंद्रासारखें आहे मुख ज्याचें असा (स्मित+जित+औषधिप+आस्य). ९० बिसतंतु=कमळाचा तंतु. * शत्रुघ्न.

तो बाण स्वशिलीमुखें* लवभटें मध्यें द्विधा तोडिला ॥
होता सद्व्रातिमान् अधःपतन तैं जालें चि त्याला परी ।
वादी जे नर कूटसाक्ष[११] वदती तत्पूर्वजांच्या परी ॥ १८ ॥
शत्रुघ्नें दुसरा शिलीमुख तदा बाणासनीं[१२] जोडिला ।
तो ही चापसमेत भूमितनयापुत्रें शरें तोडिला ॥
पूर्वीं ज्या [१३]विशिखें द्विजारि लवणायुः प्राशिलें भूवरी ।
त्यातें त्या च धनुर्लतेप्रति तदा सौमित्रि[१४] हातीं धरी ॥ १९ ॥
सोडी वन्हिनिभाशुगा[१५] प्रति वदे मेलासि रे या क्षणीं ।
तेव्हां बाण अमोघ हें समजला आलोकितां स्वेक्षणीं ॥
यातें अग्रज भंगिता परि नसे मी जानकीच्या महा ।
पातिव्रत्यबळें चि खंडिन ह्मणे आला असो भीम हा ॥ २० ॥
ऐसें वदोनि केले दोन तयाचे निजाशुगें तुकडे ॥
आले तत्पूर्वार्द्ध छिन्नाहिनिभ स्वभंगहेतु कडे ॥ २१ ॥
आधीं चापासि खंडी मग जनकसुतासूनुवक्षस्थळाला ।
त्या काळीं मोहभारें क्षितिवरि सहसा देह त्याचा गळाला ॥
झाली नेत्रांबुजाला रजनि न समजे युद्धभू गेह वा हें ।
त्या बाळाला सचैल स्नपन[१६]चि घडलें शोणितांच्या[१७] प्रवाहें ॥ २२ ॥
आली मृत्युसमा यदा अशि रणीं मूर्च्छा महा मानिला ।
त्या काळीं हतशेषवीरनिकरें[१८] आनंदसा मानिला ॥
भेरींच्या[१९] प्रकरांसि[१००] ताडिति मुखें शंखासि ते फुंकिती ।
त्यांचा हर्ष न सांठवे त्रिभुवनीं तो म्यां वदावा किती ॥ २३ ॥
झाला त्यासि विलोकितां सदय तो शत्रुघ्ननामा कृती ।
शिपा यासि ह्मणे भटांसि दिसतो हा बाळ रामाकृती ॥
छाया वायुजलोपचारित लव स्वस्यंदनीं[१] स्थापिला ।
सेनायुक्त हयासि सोडुनि निजायोध्यापथें चालिला ॥ २४ ॥
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
अध्याय सातवा हा श्रवण करावा गुणज्ञमुख्यांनीं ॥ २५ ॥ ॥ ७ ॥

---

* शिलीमुख=बाण. ११ कूटसाक्ष=खोटी साक्ष. १२ बाणासन=धनुष्य. १३ विशिख=बाण. १४ सौमित्र=सुमित्रेचा पुत्र शत्रुघ्न. १५ वन्हिनिभाशुग=अग्नीसारखा तीक्ष्ण बाण ( वन्हि+निभ + आशुग ). १६ स्नपन=स्नान. १७ शोणित=रक्त. १८ हतशेषवीरनिकर=मरून बाकी राहिलेंले योध्यांचा समूह. १९ भेरी=नगारे. १०० प्रकर=समूह. १ स्यंदन=रथ.

एवं जैसें निघालें कटक धरुनियां मूर्छितातें लवातें ।
तेव्हां त्याचे सखे ते त्यजिति उपवनीं लोचनांभोलवातें[2] ॥
हस्तांपासोन पुस्तें[3] गळति सटासटां धीर गेला तयाला ।
जाती सांगावयाला मग बहुत जवें[4] भूमिकन्यालयीला[5] ॥ १ ॥
म्हणति पृथुक[6] जानकी स्वाश्रमो मध्यदूर्वांकुरासक्त
कश्चिन्[7] नृपाचा हरी[8] पाहिला त्वत्सुतें दिव्यलीलाकरें ॥
नरवरहय हा सख्या यासि बांधों नको यां परी वारिला
फार आह्मीं परी निषेधासि सोडुनियां बद्ध केला करें ॥
प्रबळ कटक तेथ आलें तदा युद्ध आरंभिलें
बाणनिर्भिन्नपत्त्यश्वमातंगवीरांगरक्तोदकें[9] निर्मिल्या वाहिनी[10] ॥
तदुपरि भट एक झाला पुढें तच्छरें मूर्छितातें लवातें
निजस्यंदनीं स्थापुनी स्वात्मदेशाकडे जातसे वाहिनी[11] ॥ २ ॥
हें वर्त्तमान परिसोनि ह्मणे क्षमाजा[12] । गेला असेल जरि धर्म वृथा न माजा ॥
यावत्कुशागमन होय लव स्वहातें । तावत्करू नति[13] न स्वपितामहातें ॥ ३ ॥
अकरुणभटबाणभिन्नवत्सा[14] । तुज विण मी तशी गौ जशी विवत्सा ॥
करुनि खळजनासवें कलीला[15] । अहह[16] मला त्यजिलेंसि एकलीला[17] ॥ ४ ॥
वांछा वृथा धरुनि अन्यमहीपवाहीं[18] । कां त्यागिली स्वतनु दुःखनदीप्रवाहीं ॥
साहूं किती तरि असे बहु दुःखराशी । कां दैव सृष्ट मजला न वधी खरासी ॥ ५ ॥
झालीं जीं उटजांगणीं[19] उमटलीं आतां चि जातां पदें* ।
नानावृक्षलतालवालरचनाकौशल्य हें भाजितें ।
मच्चित्ताप्रति जें करें विरचिलें त्वां पद्मशोभाजितें[20] ॥ ६ ॥
उडुपनिभ त्वद्वदन स्मृतिगत होऊनियां मुला तापवितें ॥
होइल केव्हां शोकक्षितिध्र[21]भेदार्ह जेवि घरितां पवितें[22] ॥ ७ ॥

---

२ लोचनांभोलव=अश्रुलव. ३ पुस्तें=ग्रंथ. ४ जव= ५ भूमिकन्यालय=सीतागृह. ६ पृथुक=बालक. ७ कश्चित् कोणी एक. ८ हरी=घोडा. ९ बाणनिर्भिन्नपत्त्यश्वमातंगवीरांगरक्तोदकें=बाणांनीं विद्ध झालेलें पायदळ, घोडे, हत्ती, व युद्धकर्ते यांच्या रक्तरूपी पाण्यानें (बाण + निर्भिन्न + पत्ति + अश्व + मातंग + वीर + अंग + रक्त + उदकें.) १० वाहिनी=नदी. ११ वाहिनी=सेना. १२ क्षमाजा=सीता. १३ नति=नमस्कार. १४ अकरुणभटबाणभिन्नवत्सा=निर्दय योध्यांच्या बाणांनीं जखमी झालेल्या बाळा ! ( अकरुण+भट+बाण+भिन्न+वत्सा ) १५ कलि=भांडण. १६ अहह=खेदोद्गार. १७ एकली=एकटी. १८ अन्यमहीपवाह=दुसऱ्या राजाचा घोडा. १९ उटज=पर्णशाळा. २० पद्मशोभाजित=कमलाची शोभा जिंकिली आहे ज्यानें असा. २१ क्षितिध्र=पर्वत. २२ पवि=वज्र.
* या श्लोकांत एक चरण कमी आहे.

वाल्मीकि जवळ नाहीं कुश ही गेला असे अरण्यातें ॥
सैनिकचोरापासुनि सोडवितें कोण लवहिरण्यैं[22]तें ॥ ८ ॥
धरूनियां या परि शोकदीक्षा । सीता करी पुत्रपथप्रतीक्षा ॥
वत्सें वियुक्ता जसि होय गृष्टी[23] । तीहूनि ते कोटिगुणें हि कष्टी ॥ ९ ॥
अशांत घेऊन समित्फळांला[25] । आला वनाहूनि कुश क्षयाला[26] ॥
समीप येऊन मनांत तर्क । असा करी मातृदृगब्जअर्क[27] ॥ १० ॥
सकाळ येतां मजशीं दवींला[28] । निवारिलें म्यां स्वमुखें लवाला ॥
पुढें नये क्रुद्ध म्हणोनि काय । तथीं न कीं आजि असे निकाय ॥ ११ ॥
वनीं देहीं दुर्निमित्यें पाहिलीं त्यांसि आठवी ॥
चितानदी विवेकार्ककिरणौघें चि आटवी ॥ १२ ॥
निजोटजांतीं द्विडिभांकुशानें[29] । विलोकिली भूमिसुताकुशानें ॥
स्वपुत्रतापोन्मथितांगवल्ली[30] । जशी अरण्याग्निविमृष्ट मल्ली[31] ॥ १३ ॥
अश्रुप्रवाहस्नपितांगयष्टी । विलोकितां तो कुश होय कष्टी ॥
अर्पूनि मातेप्रति वायुवारी । मूर्छेसि तीच्या अति शीघ्र वारी ॥ १४ ॥
वद रोदनमोहहेतुला । उचिता अंब दशा न हे तुला ॥
तव दुःख न नाशिलें जरी । तरि लोकीं व्यसुता[32] चि साजिरी ॥ १५ ॥
बहु श्रम जाहला तुला । न दिसे यासि जगत्रयीं तुला[33] ॥
तव वक्त्रनिशीनें[34] कोमला । मग तें जीवित ही नको मला ॥ १६ ॥
वाल्मीकिपादांबुजयुग्मलीन । त्वदंघ्रिसेवाकमलालि[35]लीन ॥
कोठें असे तो लव सांग मी न । विलोकिला वेदपयोधिमीनें[36] ॥ १७ ॥
तदुपरि म्हणे सीता स्पर्शोनि त्वत्करपल्लवें ।
तुरग धरिला कोणा एका धरापतिचा लवें ॥
समरसमयीं त्याहीं वक्षस्थळीं दृढ भेदिला ।
धरुनि नगरा नेला दुःखक्षमाध[37] मला दिला ॥ १८ ॥
सदय भगवान् श्रीमान् वाल्मीकि ही जवळी नसे ।

---

२२ हिरण्य=सोनें. २३ गृष्टी=नुकती प्रसूत झालेली गाय. २५ समित्फळें=समिधा व फळें. २६ क्षय=घर. २७ मातृदृगब्जअर्क=आईच्या नेत्र कमळांचा सूर्य म्ह० आनंद दाता. २८ दव=अरण्य. २९ द्विडिभांकुश=शत्रुरूपी हत्तीचा अंकुश म्ह० मर्दनकर्ता. ३० स्वपुत्रतापोन्मथितांगवल्ली=आपल्या पुत्राच्या दुःखानें विव्हल झालें आहे शरीर जीचें. ३१ मल्ली=मालती. ३२ व्यसुता=मरण. ३३ तुला=उपमा. ३४ वक्त्रनिशीन=मुखचंद्र. ३५ अलीन=भ्रमरश्रेष्ठ. ३६ वेदपयोधिमीन=वेदरूपी सागरांतला मासा. ३७ दुःखक्षमाध=दुःख पर्यंत.

तुजविण कुशा आतां जनीं न दुजा दिसे ॥
मम भुज नको छेदूं देवा त्यजीं बहु कोप हा ।
अहह करुणापांगें[38] माते सकृत्[39] तरि तूं पहा ॥ १९ ॥
प्रलापबीज सीतेच्या मुखें आकर्णितां असें ॥
ह्मणे कुश स्वस्थ चित्तें मातः स्वसदनीं असें ॥ २० ॥
त्यातें होऊत शक्रप्रभृतिसुर रणीं साह्य माते तथापि ।
दुष्टातें आहवीं[40] त्या मम निशितें[41] शर व्यापितील प्रतापी ॥
सिंहाशीं काय कोल्हे करितिल समर व्यर्थ चिंता तुला हे ।
जिंकूनि त्वत्सुतातें कवण जय जनीं ब्रह्मगोळांत लाहे ॥ २१ ॥
जननि मज निषंगें[42] चाप वर्मे[43] । त्वरित समर्प किरीट खड्ग[44] चर्मे[45] ॥
लव लवकरि च स्वआश्रमातें । तव सुत आणिल तूं त्यज भ्रमातें ॥ २२ ॥
असे स्वसूनुचे सुशब्द ऐकतां महा सती ।
त्यजूनि शोक लोचनें पुसूनि होय हांसती ॥
किरीटवान्निषंग चर्म वर्म खड्ग चाप ती ।
कुशासि दे दशाननासि मर्दिता जिचा पती ॥ २३ ॥
हा जातों मी ह्मणुनि नमुनी क्ष्मासुतेच्या पदातें ।
जाता झाला रिपुदळ वधूं ओष्ठ चावीत दातें ॥
जैसा सिंहीतनय विदळूं जाय मातंगजातें[46] ।
बाहू तार्डी भय रहित तो क्रूर ही भीति ज्यातें ॥ २४ ॥
तो जाऊनि श्रीरामाची सेना । पाहे चित्तीं भी त्याला भासेना ॥
बोले त्यासी वीरश्रीचा कांत । क्ष्मापुत्रीचा संहर्ता आक्रांत ॥ २५ ॥
उभे उभे हो भट युद्धकामी । आलों असें हो कुश नाम हा मी ॥
मला पराभूत जरी कराल । ममानुजातासि[47] तरी हराल ॥ २६ ॥
असेल सामर्थ्य तरी च चापीं । मौर्वीसि[48] जोडा विशिखांसि[49] सोडा ॥
नसेल सामर्थ्य तथापि सारे । हस्तासि जोडा मम बंधु सोडा ॥ २७ ॥
पृथ्वीवरि चापातें स्वशिरातें तर्‍ही [ तुह्मी ] लववा ॥
तुह्मी द्रुत सोडावा निज जीवितकाम तो लव वा ॥ २८ ॥
एवं प्रोद्दाम शब्द ग्रहण करुनियां त्यांस तो काळ वाटे ।

---

३८ अपांग=कटाक्ष. ३९ सकृत्=एकदां. ४० आहव=युद्ध. ४१ निशित=तीक्ष्ण. ४२ निषंग=भाता. ४३ वर्म=कवच. ४४ खड्ग=तरवार. ४५ चर्म=ढाल. ४६ मातंगज=हत्ती. ४७ ममानुजात=माझा धाकटा भाऊ. ४८ मौर्वी=दोरी. ४९ विशिख=बाण.

उद्यद्वायूत्थधूलिव्रज[५०] तिमिरसम व्योम[५१]गर्भांत दाटे ॥
वातोद्धूत प्रभूत ध्वज खणखणती शीर्ण झाल्या पताका ।
झालें शांत क्षणें तें रज मग शमनीं ऱ्हेषितें आणि हाका ॥ २९ ॥
तेव्हां शत्रुघ्न सेनापतिस मग म्हणे तूं निवारीं कुशातें ।
सेनाव्यूहास मी ही दृढतर रचितों आज रक्षूं यशातें ॥
तें ऐकूनी वदे तो बळरमण[५२] शिशो तिष्ठ तिष्ठेति गर्वें ।
अर्पी दिग्बाण[५३] ज्यांचीं खरतर वदनें आततें सर्व पर्वें ॥ ३० ॥
तेव्हां त्याच्या शरांचें कुशळ कुश शरें भूतळीं चूर्ण पाडी ।
पार्ष्णिग्राहाश्वसूता प्रति [illegible]पति तो मृत्युलोकासि धाडी ॥
चापांग[५४]त्राणतूणी[५५]असिरथवरकिरीटादिकांतें स्वबाणें ।
छेदूनि क्रोधरक्तेक्षण मग घडवी त्यासि नाका[५६]सि जाणें ॥ ३१ ॥
हा हा शब्द तदा बळीं प्रगटला तद्बंधु* नागाभिधा ।
क्रोधोग्रेक्षण हस्तिमस्तकग तो आला द्विषत्सन्निधा ॥
क्षेपी शक्तिस तत्क्षणीं कुश करी तीचें शरें वारण ।
क्रूरेषुप्रकरें[५७] करें करुनियां छिन्नांघ्रि तद्वारण[५८] ॥ ३२ ॥
नागा[५९]पासुनि नाग भूमि उतरे हस्तीं गदेला धरी ।
तीतें तत्करपंकजा सहित तो पाडी शरें भूवरी ॥
त्याचा वाम हि चक्रयुक् शय[६०] शरें तोडी तदा तो पदें ।
येतां धांवत पादयुग्म हि हरी बाणद्वयें तापदें ॥ ३३ ॥
धूलीधूसरशोणितार्द्रतनु तो चित्तांत कोपें कढे ।
धांवे राहु जसा रविप्रति तसा क्ष्मायोनिपुत्रा[६१]कडे ॥
तद्वीर्यें बहु तोषला कुश करी स्वांतीं तयाचास्तव ।
छेदी तीव्र शरें शिरासि मखहा घे मुंड माळेस्तव ॥ ३४ ॥
एवं मारुनियां तयासि मग तो शत्रुघ्नसेनेप्रती ।
छेदी तीक्ष्ण शरें तदा म्हणति ते कल्पांत कीं संप्रति ॥
पादाताश्वतुरंगपर्वतनिभे[६२]भ क्ष्मातळीं लोळती ।
सद्यः शोणितपानतत्परशिवा[६३]गृध्राननें पोळती ॥ ३५ ॥

---

५० उद्यद्वायूत्थधूलिव्रज=वाहाणाऱ्या वाऱ्यानें उठविलेला जो धुरळा त्याच्या समूह ५१ व्योम=आकाश. ५२ बळरमण=सेनापति. ५३ दिग्बाण=दहा बाण. ५४ अंगत्राण=चिलखत. ५५ तूणासि=भाता व तरवार. ५६ नाक=स्वर्ग. ५७ इषुप्रकर=बाणसमूह. ५८ तद्वारण=त्याचा हत्ती. ५९ नाग=हत्ती. ६० शय=हात. ६१ क्ष्मायोनिपुत्र=कुश. ६२ इभ=हत्ती. ६३ शिवा=कोल्हो. * सेनापतीचा भाऊ.

जे होते मदमत्तवारणशिरीं जे अश्वपृष्ठावरी ।
जे कार्त्तस्वर[६४]रत्नभूषितरथीं जैसे विमानांतरीं ॥
तद्बाणाहत ते अधःपतनभाक् झाले महा संगरीं ।
जो कन्याद्रविणें स्वजीवन करी तत्पूर्वजांचे परी ॥ ३६ ॥
एवं त्यांचें सैन्य तेव्हां कुशानें । केलें तीक्ष्णद्विण्महेभांकुशानें[६५] ॥
लोकांमध्यें वेदशास्त्रोक्त धर्में । होती क्षीण क्षिप्र[६६] तैसीं कुकर्में ॥ ३७ ॥
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
अध्याय आठवा हा श्रवण करावा कवींद्रमुख्यांनीं ॥ ३८ ॥

---

शत्रुघ्न क्रुद्ध तेव्हां नवशरनिकरें शत्रुला क्षिप्र ताडी ।
तो त्याचें तद्रथाचें रज[६७] अनिल[६८]करें स्वर्गलोकासि धाडी ॥
सौमित्रि[६९]च्या हृदब्जीं[७०] क्षत करुनि रथोपस्थदेशीं च पाडी ।
तत्सेनामांसखंडें बक[७१]करट[७२]शिवागृध्रयूथांसि[७३] वाडी ॥ १ ॥
त्या काळीं बहुत चि तत्करें गळाले । जे होते मग हतशेष ते पळाले ॥
दैवानें लव हि तदा विमोह जाला । आलिंगन नमन करून अग्रजाला ॥ २ ॥
बंधो त्वां बहु अनवद्य[७४] कर्म केलें । दुष्टाचें कटक बरें क्षयासि नेलें ॥
त्वद्योगें लव हि न शत्रुभीति मातें । तूं आज्ञा कर धरितों तुरंगमातें ॥ ३ ॥
आज्ञा होतां सीतापुत्राची हातें । वृक्षीं बांधी श्रीरामाच्या वाहातें ॥
युद्धाकांक्षी वाय्वग्नीसे ते बंधू । एके जागीं झाले शौर्याचे सिंधू ॥ ४ ॥
गेले जे हतशेष सैनिक तिहीं साकेत[७५] आसादिलें ।
स्व स्वांतीं म्हणती अहो बहु बरें सत्कार्य हें साधिलें ॥
झाले सावध यज्ञमंडपमहाद्वारासि ते पावले ।
तद्दृग्भृंग[७६] रघूत्तमांघ्रि[७७]कमलामोदा[७८]र्थिसे पावले ॥ ५ ॥
मेखळारुरु[७९]चर्मपिप्पलदंडशृंगसभाजित[८०] ।
स्वर्णभूतनयासमन्वित भूमिदेवसभाजित ॥
होमधूमविलोहितेक्षण[८१] सानुकंप[८२]निरीक्षित ।

---

६४ कार्तस्वर=सोनें. ६५ द्विण्महेभांकुश=शत्रुरूपी महाहत्तीचा अंकुश म्ह० मर्दनकर्ता. ६६ क्षिप्र=तात्काळ. ६७ रज=धूळ. ६८ अनिल=वारा. ६९ सौमित्रि=शत्रुघ्न. ७० हृदब्ज=हृदयकमळ. ७१ बक=बगळा. ७२ करट=कावळा. ७३ यूथ=कळप, समूह. ७४ अनवद्य=अनिंद्य, स्तुत्य. ७५ साकेत=अयोध्या. ७६ तद्दृग्भृंग=त्यांचे डोळे हेच भृंग. ७७ अंघ्रि=पाद. ७८ आमोद=सुवास. ७९ रुरु=हरिण. ८० सभाजित=युक्त. ८१ लोहित=लाल. ८२ सानुकंप=सकृप.

प्रेक्षिला भरताद्युपासितपाद राघव दीक्षित ॥ ६ ॥
ते सारे नमुनि म्हणति पूर्ण कामा । श्रीरामा रघुतिलका पवित्रनामा ॥
त्वद्वाजी क्षितिवर हिंडतां तयाला । पूजूनी सकळ हि लोक पूत झाला ॥७॥
धरिला तुरंग ज्यांहीं रविनंदनलोकमार्ग ही त्यांहीं ॥
एवं स्वामी पाहीं विजय चि झाला तव प्रतापांहीं ॥ ८ ॥
एवं तो हय रक्षिला नृपजनें शत्रुघ्न वाखाणिला ।
वाल्मीक्याश्रमसन्निध त्वदनुजें वीरेश्वरें आणिला ॥
कोणेक द्विजबाळ विघ्न करिता झाला पथीं त्या प्रती ।
येतां जिंकुनिया तदग्रज तुझा आला महादुर्मती ॥ ९ ॥
तेणें सानुज सैन्यपाळ वधिला शत्रुघ्न ही ताडिला ।
तत्स्पर्धी बहु तीक्ष्णबाणनिकरें निर्जीव तो पाडिला ॥
केलें त्या शिशुनें असें तव बळीं शार्दूलविक्रीडित ।
आलों त्वच्चरणा समीप नृपते तत्साध्वसें पीडित ॥ १० ॥
परिसुनि म्हणे त्यांतें सीतापति भ्रमलां कसें ।
शिव शिव पिशाचाविष्टोक्तासमान मला दिसे ॥
हुर हुर नसो यज्ञस्थानीं प्रजल्प उगे रहा ।
मदनुजनिला ताडी ऐसा न विष्णु वृत्रहा ॥ ११ ॥
ऐसें ऐकुनि त्यासि वंदुनि शिरीं ते बोलती सन्मती ।
देते ज्ञान अनादि मोह हरुनि त्वन्नामधेयस्मृति ॥
पैशाच्यभ्रमजन्म होइल विभो आम्हासि कां शर्मदा ।
तूझे सेवक तूज गाउनि तुला संप्रेक्षितां सर्वदा ॥ १२ ॥
ऐसें ऐकुनियां राम पावला हृदयीं श्रम ।
मग बोले लोककामकल्पद्रुम मनोरम ॥
जंबुकें वधिला सिंह बुडाला गोष्पदीं करी ।
झाली कशी कालगत्या विपरीताचि हे परी ॥ १३ ॥
रे वत्सा लक्ष्मणा तूं लवणरिपुचिया मृत्युपाशासि खंडीं ।
वाजीतें सोडवूनि द्विजशिशुसि बरें मद्यशोघ्नासि दंडीं ॥
वीरा तूं मेघनादांतक मजहुनि ही कीर्ति तूझी विचित्रा ।
त्वां पुत्रें लोकवंद्या अदिति जशि तशी माय माझी सुमित्रा ॥ १४ ॥

---

८३ रविनंदन=यम. ८४ मदनुजनि=माझा धाकटा भाऊ. ८५ वृत्रहा=इंद्र. ८६ शर्मद=सुखदाता. ८७ लवणरिपु=शत्रुघ्न. ८८ मेघनादांतक=इंद्रजितशत्रु.

आज्ञा वाहुनि मस्तकीं नमुनियां सौमित्रि तेव्हां निघे ।
तत्सेनाहतदुंदुभिस्वन तदा स्वर्गासि पाहूं रिघे ॥
एकस्त्रीव्रतपूत सर्व भट ते प्रोद्दामवीर्यास्पद ।
स्वांतीं मानिति जीवितासि तृणवत्सिंधूंसि ही गोष्पद ॥ १५ ॥
वाजींच्या खुरकुट्टणें करुनियां पाषाण झाले चुरा ।
सांगायास्तव रेणुदूत बहुधा गेला सुरांच्या पुरा ॥
भूभृत्कल्पमतंगजोद्भटघटाभाराकुलांगी धरा ।
कन्यापुत्रविनाश मानुनि जणों झाला तिला कांपरा ॥ १६ ॥
गेल्या शत्रुजनांगनाक्षियुगुलीं तत्सैन्यधाकें धुनी ।
होतें जें तृण तें हि रामरिपुचीं तुंडें बळें शोधुनी ॥
होतां हीन लताद्रुमें न मग तीं संशोभती काननें ।
जैशीं रामसुरद्रुतद्गुणलतासंत्यक्त लोकाननें ॥ १७ ॥
एवं सौमित्रि जाऊनी रणभूमीस पावला ॥
जीवशेष धरासंस्थ निजानुज विलोकिला ॥ १८ ॥
जैमिनिकृत भारतगत हयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
हा नववा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ १९ ॥

---

त्या सेनेसि विलोकितां कुश ह्मणे आतां करावें कसें ।
आहे फार चि दुष्प्रधर्ष बळ हें देवाधिपाचें जसें ॥
तेव्हां त्यासि कथी लव क्षितितळीं या सैनिकांचीं शिरें ।
कोहाळ्यापरि फोडिजे फटफटां क्रूरें शरें कीं करें ॥ १ ॥
नाहीं योग्य तुझ्या बळासि बळ हें कुंभोद्भवाला जसा ।
अंभोराशि तसा तृणासम गमे सैन्यौघ मन्मानसा ॥
मातें चाप नसे रणांत रिपुनें केले शरें तूकडे ।
पाहे बोलुनियां असें लव तदा तो लोकबंधूकडे* ॥ २ ॥
त्रिभुवनरक्षादक्षा नमितों तुजला स्वभक्तसुरवृक्षा ॥
तिमिरद्विपहर्यक्षा† तेजःपक्षा क्षतामरविपक्षा ॥ ३ ॥

---

९ सौमित्र=लक्ष्मण. १० दुंदुभिस्वन=नगाऱ्याचा अवाज. ११ धुनी=नदी. १२ कानन=वन. १ दुष्प्रधर्ष=मर्दनकरण्यास अशक्य असें. २ बळ=सैन्य. ३ देवाधिप=इंद्र. ४ कुंभोद्भव=अगस्त्य. ५ अंभोराशि=समुद्र. ६ त्रिभुवनरक्षादक्ष=त्रैलोक्याचें रक्षण करण्याविषयीं कुशल अ० समर्थ. ७ सुरवृक्ष=कल्पवृक्ष. ८ क्षतामरविपक्ष=छिन्न केले आहेत देवांचे शत्रु ज्यानें असा. * सूर्याकडे. † हर्यक्ष=सिंह.

स्वजनभवांबुधितरणे[9] त्रिजगद्भूषणमहामणे तरणे[10] ॥
दे मज चापास रणीं दावीन दुष्टासि काळग्रहसरणी ॥ ४ ॥
एवं संस्तविता दिनेश भगवान् श्रीमान् दयासागर ।
स्नेहें दे शिशुला धनुर्व्रततिला[11] देखावया संगर[12] ॥
हातीं घेउनियां ह्मणे लव कुशा स्वोत्कर्ष मातें गमे ।
श्रीविघ्नेश्वर ते नमः कुरु कृपां[13] निर्विघ्नमस्त्वद्य[14] मे ॥ ५ ॥
जैसे वायुविभावसू[15] कुश लव क्रोधें तसे धांवले ।
विस्फाळूनि धनुर्लतांसि सहसा सैन्यांतरीं पावले ॥
केलें मर्दन मांसकर्दम[16]पटें रक्तस्रवंती किती ।
तेथें वाहति पहाती भटें[17] मनीं कल्पांतसें तर्किती ॥ ६ ॥
सेनानी[18] लक्ष्मणाचा प्रकटबळयशा[19] काळजिन्नाम त्याला ।
संगें घेऊनि रामानुज घनरवहा[20] तो पुढें शीघ्र झाला ॥
दोघे ही बाणजाळें करूनि मग रणीं रोधिती त्या कुशाला ।
तेव्हां एका लवानें द्रुततर वरिली सर्वसेना विशाला ॥ ७ ॥
फिरे सेने मध्यें अभय विपिनीं[21] तीं अनळसा[22] ।
जयाची दोर्वल्ली सतत शरदानीं अनळसा[23] ॥
रथेभांच्या[24] पंक्ती तुरगवरपादात[25]सहिता ।
लवातें वेष्टूनी बहुत वसती वीरविहिता ॥ ८ ॥
कितेक रथ मोडिले ध्वज कितेक ही तोडिले ।
कितेक शर सोडिले गज कितेक ही झोडिले ॥
असंख्य भट ताडिले यमपुराकडे धाडिले ।
शिरःप्रकर पाडिले बहुत यापरी नाडिले ॥ ९ ॥
तेव्हां शूलगदापरश्व[26]सिलताशक्त्यृष्टिचक्रायुधें ।
कुंतप्रासभृशुंडिमुद्गरमहापाशादि नानाविधें ॥
सर्वांहीं त्यजिलीं लवावर तदा तो त्यांस खंडी शरें ।

---

९ तरणे=हे नौके. १० तरणे=हे सूर्या. ११ व्रतति=लता. १२ संगर=युद्ध. १३ कुरु कृपां=कृपा कर. १४ निर्विघ्नमस्त्वद्य=( निर्विघ्नं+अस्तु+अद्य ) आज मला विघ्नें न येवोत. १५ विभावसु=अग्नि. १६ कर्दम=चिखल १७ भट=योद्धे. १८ सेनानी=सेनापति. १९ प्रकटबळयशा=व्यक्त आहे शक्ति व कीर्ति ज्याची असा. २० घनरवह=मेघनादाचा हंता लक्ष्मण. २१ विपिन=अरण्य. २२ अनळसा=अग्निसारखा. २३ अनळसा=आलस्य रहित. २४ रथेभांच्या=गाडे व हत्ती यांच्या. २५ पादात=पायदळ. २६ परश्वसिलता ( परशु + असिलता )=कुऱ्हाडी व तरवारी.

मूर्खांच्या वचनासि पंडित जसा निःशंक युक्त्युत्तरें ॥ १० ॥
तेव्हां मागें फिरोनि क्षततनु लव तो अग्रजालागिं पाहे ।
तों तो कोठें दिसेना मग निज हृदयीं फार चिंतेसि वाहे ॥
प्रावृण्मेघां[27]परी ते सुभट भटशिरीं वर्षती आयुधांहीं ।
जैसा भूमिध्र[28] तैसा तिळभरि न चळे वर्णिला तैं बुधांहीं ॥ ११ ॥
शत्रुघ्नें लवणासुर प्रमथिला पूर्वीं च तन्मातुळ ।
आला जो रुधिराक्षनाम शरण श्रीरामभीत्याकुळ ॥
त्या दुष्टें हरिलें शरासन[29] तदा वेगें रिघे तो नभीं ।
तेव्हां तो लव चक्र घेऊनि उडे व्योमीं तयाला न भी ॥ १२ ॥
जैसा आमिषलुब्ध श्येन[30] व्योमीं शिरे तसा शोभे ॥
चक्रें शक्रानुजसा देवस्त्रीवृंदें[31] पाहतां लोभे ॥ १३ ॥
भूमीसंस्थित सर्व वीरवर हा माया पडेल स्वयें ।
किंवा काय करील तें चि न कळे हें बोलती तद्भयें ॥
कोणी भ्याड रथाबुडीं च दडती कोणी मृतेभांतरीं ।
कोणी ऊर्ध्व शरांसि योजिति किती चर्मांसि[32] घेती शिरीं ॥ १४ ॥
मंत्र्याचे हि जितश्रमादि सुत जे दिक्स्यंदनाच्या[33] दहा ।
त्यांहीं चक्र विखंडितां रुडनळें[34] जाला लवाचा दहा ॥
सारे ही पडती सुतीक्ष्ण परिघें संताडितां ते तसे ।
अंतीं नास्तिक वेदबाह्य नरकीं दुःशास्त्रवेत्ते जसे ॥ १५ ॥
तेव्हां तो रुधिराक्ष राक्षस गदा हाणी लवाच्या शिरीं ।
मूर्छा पावुनियां उठे पुनरपि क्रोधें मुहूर्तांतरीं ॥
केशीं त्यासि धरूनि मस्तक तदा कुंतायुधानें हरी ।
भास्वद्दत्त[35] धनुः करीं करूनियां गर्जे हरीच्या[36] परी ॥ १६ ॥
पुनरपि तो लव तेव्हां क्षणमात्रें वेष्टिला महासेनांहीं ॥
गर्भापासुनि बाहिर पडल्यावर जेंवि जंतु अज्ञानांहीं ॥ १७ ॥
तृणें घनाच्छादित आश्रयाश । जसा तयाचा विकरी विनाश ॥
सेनागणीं वेष्टित तो शरांहीं । मर्दी तयाला चि भयंकरांहीं ॥ १८ ॥

---

२७ प्रावृण्मेघ (प्रावृट्+मेघ) =पावसाळ्यांतील ढग. २८ भूमिध्र=पर्वत. २९ शरासन=धनुष्य. ३० श्येन=ससाणा. ३१ देवस्त्रीवृंद=अप्सरांचा समूह. ३२ चर्म=ढाल. ३३ दिक्स्यंदन=दशरथ. ३४ रुडनळ (रुड्+अनळ)=क्रोधाग्नि. ३५ भास्वद्दत्त=सूर्यानें दिलेलें. ३६ हरीच्या परी=सिंहासारखा.

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
अध्याय दहावा हा श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ १९ ॥

---

सौमित्रीशीं कुशाशीं प्रखरतररणीं ज्या क्षणीं योग जाला ।
सीतेचासूनु[३७] गर्जे निरखुनि मृगराडुग्र[३८] जैसा गजाला ॥
सोडी पांचां शरांतें घनरवरिपु[३९] तो त्यांसि तोडूनि बोले ।
मागें न स्यंदनांतें[४०] कर तव पिशितें[४१] तर्पितों आजि कोलें[४२] ॥ १ ॥
ऐसें बोलोन तेणें स्वरिपुरथ शरें ताडितां भोंवताला ।
भावे वेगें मुहूर्तं क्षितिवरि करितां अश्व गेले लयाला ॥
तो अन्यस्यंदनस्थ द्रुत विशिखयुगें वर्म[४३] तोडूनि पाडी ।
कोपे बाणत्रयानें त्वरित हरिपदीं[४४] तत्किरीटासि धाडी ॥ २ ॥
ह्मणे कुश भला भला त्यजुनि वैरता संप्रती ।
रणांत हरिलेंसि तूं जरि मदीय भाराप्रती ॥
तुझ्या बळभरासि मी हरिन आज विश्वास हा ।
मनीं धरूनियां रहा शरगणासि माझ्या सहा ॥ ३ ॥
आग्नेयास्त्रास सोडी कुश अनळ तदा भाजुनी तद्रथाला ।
जाळी वीरव्रजांला[४५] ध्वजरथतुरगां उष्ट्रकांला गजांला ॥
नाना शस्त्रें जळालीं कितिक शिखिभयें[४६] योधवृंदें[४७] पळालीं ।
छत्रें वर्में गळालीं सुरुचिर वसनें फार भस्मीं मिळालीं ॥ ४ ॥
सौमित्री वारुणास्त्रें शमवित दुसऱ्या मारुतास्त्रासि सोडी ।
तेव्हां वायु प्रचंड ध्वज रथ गज जे त्यांसि अत्यंत झोडी ॥
आकाशीं शुष्कपर्णांपरि किति फिरती भ्रांत सारे पदाती ।
स्वर्गांतें वृक्ष जाती द्विजसम[४८] उडती शैल ही भीति देती ॥ ५ ॥
सेनानी मग लक्ष्मणाप्रति ह्मणे मी यासि संहारितों ।
एकाकी तव साध्य होइल पहा अस्त्रांस ही वारितों ॥
ऐसें ऐकुनियां ह्मणे कुश वृथा मूढा किती जल्पसी ।
त्वज्जिव्हा हरितों बरें मदिषुला छेदों जरी कल्पिसी ॥ ६ ॥
ऐसें बोलोनि जिव्हा हरि बळपति[४९]ची तो हि बाणें कुशाला ।

---

३७ सूनु=पुत्र. ३८ मृगराडुग्र ( मृगराट्+उग्र )=क्रूर सिंह. ३९ घनरवरिपु=मेघनादा ( इंद्रजिता ) चा शत्रु लक्ष्मण. ४० स्यंदन=रथ. ४१ पिशित=मांस. ४२ कोलें=डुकरें. ४३ वर्म=कवच. ४४ हरिपदीं=आकाशांत. ४५ व्रज=समूह. ४६ शिखि=अग्नि. ४७ वृंदें=समूह. ४८ द्विजसम=पक्ष्यासारखें. ४९ बळपति=सेनापति.

ताडी कोपें हृदब्जीं क्षितिदुहितृसुतें[५०] तत्कर च्छिन्न केला ॥
अर्द्धद्राकारबाणें[५१] मग रुचिर शिर छेदितां रामबंधू ।
सेनानीमृत्युकाळीं बहुत खवळला मानसीं शौर्यसिंधू ॥ ७ ॥
आधीं अर्पुनि बाण दारुण सहा अर्पी बळें शक्तिला ।
कुंतातें[५२] असिला गदेसि मग तो दावी महाशक्तिला ॥
त्यागी मुद्गर आणखी परशु या दोहींस त्याला करें ।
सीतेचा सुत सप्तधा क्षितितळीं छेदूनि पाडी शरें ॥ ८ ॥
ज्यांपासूनि नभोतरीं शिखिशिखा[५३] विद्युत्समा फांकती ।
ऐसे बाण लवाग्रजें कवळितां लोकेश ही धाकती ॥
त्यांहीं लक्ष्मणहृत्कपाटकवच छेदूनियां भेदिलें ।
त्यातें भूवरि पाडिलें मग कुशें मूर्च्छास्वहस्तीं दिलें ॥ ९ ॥
जेव्हां दूरुनि बंधुसिंहनिनद[५४] श्रोत्रीं तयाच्या घसे ।
पाहे तों बळराजिवेष्टित[५५] लव क्ष्माजासुताला[५६] दिसे ॥
हातीं घेउनि खड्ग चर्म परम क्रोधें तदा धांवला ।
अग्नीलागिं सहाय मारुत जसा जाऊनियां पावला ॥ १० ॥
द्विधा गज विदारिले रथ हि धूळिला अर्पिले ।
पदातिहय चूर्णिले पिशितभुक्[५७] क्षणें तर्पिले ॥
कितेक पललक्ष्माधर[५८] विनिर्मिले क्ष्मातळीं[५९] ।
कितेक रुधिरें[६०] नदी कितिक कूप वापी तळीं ॥ ११ ॥
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
अकरावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ १२ ॥

---

श्रीमद्राघव दीक्षित स्वहृदयीं चिंता करूनि वदे ।
रे वत्सा भरता स्वदर्शन मला सौमित्र तो कां न दे ॥
ज्यांहीं जिंकुनि पाडिला त्वदनुज क्रत्वश्व[६१] नेला असे ।
त्यांच्या सर्व यशासि घेउनि कसा आला न बोला कसें ॥ १ ॥
सौमित्रिप्रति संगरीं निरखितां देवादि ही धाकती ।

---

५० क्षितिदुहितृसुत=भूकन्या सीता तिचा पुत्र. ५१ अर्द्धद्राकार=अर्धचंद्राकार. ५२ कुंत=भाला. ५३ शिखिशिखा=अग्नीच्या ज्वाला. ५४ सिंहनिनद=सिंहनाद. ५५ बळराजिवेष्टित=सैन्य पंक्तीनें वेढलेला. ५६ क्ष्माजासुत=सीतापुत्र. ५७ पिशितभुक्=मांसभक्षक. ५८ पललक्ष्माधर=मांसपर्वत. ५९ क्ष्मा=भू. ६० रुधिर=रक्त. ६१ क्रत्वश्व=(क्रतु+अश्व)=यज्ञाचा घोडा.

तेथें मंदमती किती द्विजशिशू युद्धीं कसे ठाकती ॥
जन्योद्युक्त[६२]मना ममानुज जधीं होईल तेव्हां तया ।
सांगा कोण शरण्य[६३] या त्रिभुवनीं नाशावया तद्भया ॥ २ ॥
कोपें प्रवर्त्ततां द्विजशिशुमथनीं शौर्यसिंधु मद्भ्राता ॥
सुतनाशाकुलचित्ता प्रार्थी कोणासि तेथ तन्माता ॥ ३ ॥
धर्मगृहीं[६४]पासुनि हि स्वबळें आणील बंधुरत्नातें ॥
चंडपराक्रममंडित न चुकेल तो प्रयत्नातें ॥ ४ ॥
मम यज्ञविघ्नकारक दारकें[६५] कोठूनि पावले आजी ॥
करुनि अवज्ञा माझी वाजी धरिला विनिर्मिला आजी[६६] ॥ ५ ॥
अंगद सुगळ[६७] बिभीषण पवनज यांतें कसें अनादरिलें ॥
फणिफणमणी[६८] न जाणुनि मदश्वरत्नें[६९] द्विजात्मजें हरिलें ॥ ६ ॥
अन्य मदीय सुहृज्जन त्यांचा हि मनांत न धरिला लेखा ॥
धाक हि ज्यास न कांहीं द्विजसुतचेष्टित विचित्र हें देखा ॥ ७ ॥
सौमित्रिप्रति माझ्या संदेशातें[७०] सुशीघ्र नेति असे ॥
आणावे चार[७१] भले भरता अस्वस्थ चित्त आजि असे ॥ ८ ॥
तत्सेवालाभरतें आणविले पांच दूत तेव्हां भरतें ॥
बोले हृतभूभर तें ऐका येतें कृपांबुनिधिलीं[७२] भरतें[७३] ॥ ९ ॥
द्विजबाळ मोहनास्त्रें मोहुनि जीवंत लक्ष्मणा धरणें ॥
रिपुसिंधुनिमग्नयशःशरीर[७४] यातें असे समुद्धरणें[७५] ॥ १० ॥
तूं शूर वीरसेवितरथ स्वधृतिमान् धनुःश्रुतिज्ञ[७६] कृती ॥
अपराधी परि रक्षीं विरथ निराश्रय शिशु पशुप्रकृती ॥ ११ ॥
जे परबाळावरती करिति दया त्यांसि कीर्ति मा[७७] वरती ॥
बहुपुत्रपौत्रलालनसुखभाजनसंसृतिसि मधु करि ती ॥ १२ ॥
सीतावदनांबुजनिभ[७८] पुत्रानन मीं विलोकिलें नाहीं ॥
संसृतिनदीप्रवाहीं मज कांहीं सुख न लाभलें पाहीं ॥ १३ ॥

---

६२ जन्योद्युक्त=युद्धोद्युक्त. ६३ शरण्य=रक्षक. ६४ धर्मगृह=यमाचें घर. ६५ दारक=मुलगे. ६६ आजी=युद्ध. ६७ सुगळ=सुग्रीव. ६८ फणिफणमणि=सापाच्या फडेंतला मणि. ६९ मदश्वरत्न=माझा उत्तम घोडा. ७० संदेश=निरोप. ७१ चार=जासूद. ७२ कृपांबुनिधि=दयासागर. ७३ भरतें=भरती. ७४ रिपुसिंधुनिमग्नयशःशरीर=शत्रुरूपी सागरांत बुडालेलें यशोरूपी शरीर. ७५ समुद्धरणें=वर काढणें. ७६ धनुःश्रुतिज्ञ=चापवेदवेत्ता. ७७ मा=लक्ष्मी. ७८ सीतावदनांबुजनिभ=सीतेच्या मुखकमलासारखें.

कां विपिनीं[७९] कोण पिता माता स्थळ कोण हें विचारावें ॥
आणावें मजपाशीं त्यांचें भय सर्व ही निवारावें ॥ १४ ॥
एवं सांगत असतां क्षतजोक्षितगात्र[८०] वीर बहु आले ॥
वेपथु[८१]कंपभयाकुळ रामातें नमुनियां सुखी झाले ॥ १५ ॥
तेव्हां ते म्हणती जगत्त्रयपते सौमित्रि गेल्यावरी ॥
शत्रुघ्नासि विलोकितां खवळला युद्धासि कोपें करी ॥
त्या काळीं मग त्या रणीं द्विजसुतें सेनापती मर्दिला ॥
देवासह्य परंतु लक्ष्मण कृती तो मोहहस्तीं दिला ॥ १६ ॥
जेणें राक्षस लक्षकोटि वधिले शौर्याब्धि वीराग्रणी ॥
जेणें इंद्रजिदप्रधृष्य[८२] माथिला सर्वास्त्रवेत्ता[८३] रणीं ॥
गाती ज्याप्रति मर्त्य देवरमणी[८४] जो धीरचूडामणी[८५] ॥
तो विप्रात्मजबाणभिन्न[८६] पडला संमूढ[८७] युद्धांगणीं ॥ १७ ॥
हस्त्यश्वोष्ट्रपदातिरक्ततटिनी[८८] क्षोणीतळीं[८९] वाहिल्या ॥
ज्यांचीं दुर्गम मांसकर्दमतटें नाहीं अशा पाहिल्या ॥
शक्रच्छिन्नगरुद्गिरिव्रज[९०] तसे नागेंद्र[९१] संचेष्टती ॥
कोणाचे करपाद भिन्न किती त्वच्छल्यें बहू कष्टती ॥ १८ ॥
नानावीरशिरःसरोजनिकराकीर्णक्षमे[९२]च्या तळीं ॥
गृध्रश्येनशिवासकृत्प्रज[९३]बकस्तोमीं[९४] हि वाढे कळी[९५] ॥
एवं संक्षय पावलें बळ रणीं क्षोणींद्रचूडामणी[९६] ॥
दीक्षा सोडुनि धांव कीर्तिरमणी[९७] नेली असें तूं गणीं[९८] ॥ १९ ॥
असें वचन ऐकतां परम मोह तो पावला ।
पडे क्षितिवरी भ्रमें भरत तत्क्षणीं धांवला ॥

---

७९ विपिन=अरण्य. ८० क्षतजोक्षितगात्र=रक्तानें ज्यांचें शरीर भरलें आहे असे. ८१ वेपथु=कांपरें. ८२ इंद्रजिदप्रधृष्य ( इंद्रजित्+अप्रधृष्य )=मर्दण्यास अशक्य असा इंद्रजित. ८३ वेत्ता=ज्ञाता. ८४ देवरमणी=अप्सरा. ८५ चूडामणी=शिरोभूषण. ८६ विप्रात्मजबाणभिन्न=ब्राह्मणाच्या मुलाच्या बाणांनीं विद्ध. ८७ संमूढ=मूर्छित. ८८ हस्त्यश्वोष्ट्रपदातिरक्ततटिनी ( हस्ति+अश्व+उष्ट्र+पदाति+रक्त+तटिनी )=हत्ती, घोडे, उंटें, पायदळ यांच्या रक्ताच्या नद्या. ८९ क्षोणी=भू. ९० शक्रच्छिन्नगरुद्गिरिव्रज ( शक्र+छिन्न+गरुत्+गिरी+व्रज )=इंद्रानें तोडले आहेत पंख ज्यांचे अशा पर्वतांचे समूह. ९१ नागेंद्र=मोठे हत्ती. ९२ नानावीरशिर:सरोजनिकराकीर्णक्षमा ( नाना+वीर+शिर:+सरोज+निकर+आकीर्ण+क्षमा )=अनेक योद्ध्यांच्या मस्तकरूपी कमलांनीं व्याप्त अशी भू. ९३ असकृत्प्रज=डुकर. ९४ स्तोम=समूह. ९५ कळी=भांडण. ९६ क्षोणींद्रचूडामणी=हे राजश्रेष्ठा. ९७ रमणी=स्त्री. ९८ गणीं=मान.

धरी उचलुनी द्विजव्रज तदाशिषीं[९९] योजिती ।
जळें कितिक शिंपिति व्यजन[१००]मारुतें वीजिती[१] ॥ २० ॥
मग उघडुनि नेत्रांतें करुणावचनें करूनि राम ह्मणे ॥
हा वत्स अहह लक्ष्मण हा बंधो प्रवीरमूर्द्धमणे[२] ॥ २१ ॥
भरत ह्मणे रघुनाथा धर्मच्युत[३] शोच्य हा तसा नोहे ॥
तच्छोकें न समुचिता विकळ[४] दशा धैर्यरत्नसानो[५] हे ॥ २२ ॥
निर्दोषा त्यजिली वनीं जनकजा तेव्हां चि वीराग्रणी ।
झाला पंकिल[६] लक्ष्मण स्वतनुला तो भार ऐसें गणी ॥
तो सारा कुशचंडकांडतटिनी[७]मध्यें स्वयें धूतला ।
झाला पूत चि तद्यशें धवळिलें स्वर्गासि या भूतळा ॥ २३ ॥
मी ही होईन पूत राम वरदा आज्ञा मला आज दे ।
कैकेयीसुत रामपादनत तो प्रार्थूनि एवं वदे ॥
जा वत्सा उठ कोण तो कुश असे जाण स्वसेनेसि घे ।
ऐसें राघववाक्य ऐकुनि तदा तो ही प्रहर्षें निघे ॥ २४ ॥
तातादेशकरें[८] वनें बहुतरें म्यां सेविलीं भीकरें[९] ।
त्वां ही चीरजटाधरें मम वचः केलें खरें आदरें ॥
जीवंत द्विजलेंकरें धरुनियां जा आण वत्सा बरें ।
ऐसा भूमिसुतावरें[१०] भरत तो आज्ञापिला उत्तरें ॥ २५ ॥
ऐकूनियां सत्वरतें भरतें तो प्रार्थिला सुसत्वर तें ॥
बळमथनकुशळ खळ ते कसे धरावे न मानस त्वरतें ॥ २६ ॥
दोघे बाळक काळकराळ[११] कवण ते न तूजला कळती ॥
जाणत असेल मारुति कीं अंगद सचिव[१२] नीतिमान्सुमती ॥ २७ ॥
अंगद ह्मणे वनीं त्या अपवादें त्यागिली सती सुमती ॥
त्वद्गोत्रोद्भव झाले तीच्या ठायीं शिशू असे गमती ॥ २८ ॥
मग जांबवदंगदनलनीलपवननंदनादि वीरमणी ॥
रमणीयवेषभूषित निघती क्षम[१३] सर्व विष्टप[१४]क्रमणीं ॥ २९ ॥

---

९९ आशिषा=आशीर्वाद. १०० व्यजनमारुत=पंख्याचा वारा. १ वीजिती=वारा घालिती. २ प्रवीरमूर्द्धमणे=हे वीरश्रेष्ठा. ३ धर्मच्युत=धर्मभ्रष्ट. ४ विकळ=विव्हळ. ५ रत्नसानो=हे मेरुपर्वता. ६ पंकिल=पापी. ७ कुशचंडकांडतटिनी=कुशाचे तीक्ष्ण शर हीच नदी. ८ तातादेशकर=बापाची आज्ञा मानणारा. ९ भीकर=भयंकर. १० भूमिसुतावर=राम. ११ काळकराळ=काळासारखें भयंकर. १२ सचिव=प्रधान. १३ क्षम=समर्थ. १४ विष्टप=जगत्.

नरवानरसंकुल[15] बल भूमिव्योमांसि[16] वेष्टुनी चाले ॥
भारार्त शेषमस्तक हाले हालें मग भूमिकंप बहु झाले ॥ ३० ॥
क्षरती[17] मदोदकांहीं गंभीरध्वान[18] कज्जलाभ[19] करी ॥
भूगत धन[20] हें मानुनि मुग्धाजन[21] फार कौतुकासि करी ॥ ३१ ॥
गणिकास्पर्शें[22] होतें क्षीण यशः पुण्यपुंज ही जळती ॥
ह्मणुनि जणों बहुभुक्तक्षितिला[23] धर्मज्ञ हरि[24] न आतळती[25] ॥ ३२ ॥
चापी रुक्मरथी[26] प्रचंडमुसली कांडी[27] कृपाणी[28] गदी ।
हारी कीतिक कुंडली सुकवची चर्मी[29] किरीटांगदी[30] ॥
देवांच्या परि शोभती भट चलत्क्षोणीध्र[31] तैसे रदी[32] ।
झाल्या त्या कटकें तदा क्षितितळीं नामैकशेषा नदी ॥ ३३ ॥
स्वर्णाचे ध्वज अंबरीं[33] झळकती दानोदकें वर्षती ।
हस्ती गर्जति धूळिचे व्रज[34] घन व्योमांतरीं दाटती ॥
झाला कर्दम दानघर्मसलिलें तीं वाहती सांचती ।
वर्षा मानुनियां शिखी[35] बहुसुखी कांतांसवें नाचती ॥ ३४ ॥
ऐसा सेनेसमेत त्वरित भरत तो जाय बंधुद्वयातें ।
रक्षायातें प्रतापें कुशल कुशलवालागिं जिंकावयातें ॥
भेरीध्वानें[36] सुरांला बधिर करुनियां युद्धयज्ञक्षमेला[37] ।
पावे जेथें सुमित्रासुत भटजन ही कोटि कीं लक्ष मेला ॥ ३५ ॥
कोठें अंगुलिहस्तपादरदनत्वङ्मूर्द्धजांत्रें[38] शिरें ।
कोठें अर्ध कलेवरें[39] गलदसृक्पूरें[40] महाभीकरें ॥
कोठें कुंडलनिष्क[41]हारकटकें[42] त्युटयात्किरीटांगदें ।
ऐसें तेथ धरातळीं निरखिलें रामानुजें सांगदें ॥ ३६ ॥
त्या स्थानीं लक्ष्मणाला सलवणरिपुला[43] शोधितां क्षिप्र गेला ।

१५ संकुल=युक्त. १६ व्योम=आकाश. १७ क्षरती=स्रवती. १८ गंभीरध्वान=गंभीर आहे शब्द ज्यांचा असे. १९ कज्जलाभ=कज्जल पर्वतासारखे मोठे व काळे. २० धन=ढग. २१ मुग्धाजन=स्त्रिया. २२ गणिका=वेश्या. २३ बहुभुक्त=पुष्कळांनीं भोगलेली. २४ हरि=वानर. २५ आतळती=स्पर्शती. २६ रुक्म=सोनें. २७ कांडी=बाण (कांड) आहेत ज्यांपाशीं असे. २८ कृपाणी=तरवार वाले. २९ चर्मी=ढालवाले. ३० अंगदी=बाहुभूषणें धारण करणारे. ३१ चलत्क्षोणीध्र=चालणारे पर्वत. ३२ रदी=हत्ती. ३३ अंबरीं=आकाशांत. ३४ व्रज=समूह. ३५ शिखी=मोर. ३६ भेरीध्वान=नगाऱ्याचा आवाज. ३७ युद्धयज्ञक्षमा=युद्धरूपी यज्ञाची भूमी (रणभूमी). ३८ मूर्द्धजांत्रें=केंस व आंतडीं. ३९ कलेवर=शरीर. ४० गलदसृक्पूर=गळणाऱ्या रक्ताचा पूर. ४१ निष्क=पदक. ४२ कटकें=कडीं. ४३ लवणरिपु=लवणासुराचा शत्रु शत्रुघ्न.

बोले वातात्मजातें[४४] भरत निरखुनि क्रूर रक्तापगेला[४५] ॥
सीताशुध्द्यर्थ पूर्वी क्रमुनि जलधिला[४६] तुष्ट केलें अजाला[४७] ।
तैसा या सिंधुला[४८] ही तर मज सुखवीं शोध रामानुजाला ॥ ३७ ॥
सिंधूतें तरलों तधीं अभिमुखी[४९] होती ह्मणे ती सती ।
ते झाली च पराङ्मुखी[५०] लघु नदी हे दुस्तरा दीसती ॥
ईतें लंघुनि पाहतों परि बरें आतां त्वदाज्ञेस्तव ।
ऐसें बोलुनियां उडे करि मुखें सीताधवाचा[५१] स्तव ॥ ३८ ॥
सीतात्यागजकोपतापविकळा[५२] धात्री जणों ती प्रती ।
होते प्रार्थित ते क्षमस्व[५३] म्हणुनी दोघे हि बंधू कृती[५४] ॥
तेथें जाउनि त्यांसि पाहुनि ह्मणे चित्रा विधीची[५५] कृती ।
हातीं घेउनि मारुती मग उडे स्वर्णक्षमाध्राकृती[५६] ॥ ३९ ॥
दोघे ही भरतासि नेउनि तदा वातात्मजें दाविले ।
ते दूरस्थित वीर वानर तिहीं निर्जीवसे भाविले ॥
लंकेशात्मजशक्तिनें हृदय तें जेव्हां रथीं भेदिलें ।
तेव्हां मोह असा नसे चि मरणापासूनि ही मे दिलें ॥ ४० ॥
उदंडचंडकुशकांडविखंडितोरा[५७] । तो रामबंधु धरि आकृति फार घोरा[५८] ॥
वक्षःक्षतक्षतजसिक्त[५९]तनू सशोक । लोकव्रजासि परि पंक्तिरथात्मतोक[६०] ॥ ४१ ॥
त्याच्या संरक्षणार्थ द्रुत भरत तदा स्थापुनीयां चमूला[६१] ।
कोपावेशें ह्मणे हे रघुपतिभजनध्वस्तसंसारमूला[६२] ॥
रक्षोवृंदैककाला सततगतिसुता[६३] बाळकातें विलोकीं ।
या काळीं त्या खळाला स्वकृतफळ घडो भानुमत्पुत्रलोकीं[६४] ॥ ४२ ॥
ऐसें वदोनि जेव्हां ताडविला दुंदुभि स्वयें भरतें ॥

---

४४ वातात्मज=मारुति. ४५ रक्तापगा=रक्तनदी. ४६ जलधि=सागर. ४७ अज=राम. ४८ सिंधु=समुद्र पक्षीं नदी. ४९ अभिमुखी=अनुकूळ. ५० पराङ्मुखी=प्रतिकूळ. ५१ धव=पति. ५२ सीतात्यागजकोपतापविकळा=सीतेच्या त्यागानें आलेला जो कोप त्यापासून होणाऱ्या तापानें विव्हळ झालेली अशी धात्री (पृथ्वी). ५३ क्षमस्व=क्षमाकर. ५४ कृती=कुशल, धन्य. ५५ विधि=दैव. ५६ स्वर्णक्षमाध्राकृती=मेरूपर्वतासारखा विशाल. ५७ उदंडचंडकुशकांड विखंडितोरा=पुष्कळ तीक्ष्ण अशा कुशाच्या बाणांनीं विद्ध झालें आहे उर जीचें अशी. ५८ घोरा=भयंकर. ५९ क्षतजसिक्त=रक्तानें शिंपडलेलें. ६० पंक्तिरथात्मतोक=दशरथ सुत. ६१ चमू=सेना. ६२ रघुपतिभजनध्वस्तसंसारमूला=रामाच्या भजनानें नाहींसें केलें आहे संसार मूळ ज्यानें अशा मारुते. ६३ सततगतिसुत=वायुपुत्र. ६४ भानुमत्पुत्रलोक=यमलोक.

आज्ञाविधूं[६५]दयीं त्या आले सेनापयोधि[६६]लीं भरतें ॥ ४३ ॥
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
बारावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ४४ ॥

---

तो पाहुनियां कुशलव म्हणती नाहीं रिपू निमा[६७]ले कीं ॥
निकट विकटकटकभट प्रकट कटकसे दुष्ट आले कीं ॥ १ ॥
असें ते बोलोनी त्वरित मग दोघे उसळले ।
वनीं वाय्वग्नीसे भरतकटकांतीं मिसळले ॥
महाकांडव्रा[६८]तें करुनि सुटले मर्दित रणीं ।
बुडे अब्धी[६९]मध्यें तदिषुशिखिसंतप्त[७०] तरणी[७१] ॥ २ ॥
सूर्यरश्मिसमुदा[७२]य आटला । अंधकार मग फार दाटला ॥
जाहलीं जनविलोचनें वृथा । नासली रणकथा यशःप्रथा ॥ ३ ॥
नेत्रें असूनि उघडीं तिमिरीं स्वपरांसि वीर नोळखिती ॥
आकस्मिकलब्धश्रीमदांध अकुलीन नर जसे कुमती ॥ ४ ॥
ताडिले गजकरीं करवालें[७३] । निर्मिलें रण भयंकर बालें ॥
वाहती बहुतर क्षतजा तें । निर्मिलें लवकरें क्षतजातें ॥ ५ ॥
खड्गपात करितां गजदंतीं । शब्द संचराति सर्वदिगंतीं ॥
पाव[७४]क प्रगट होउनि भाजी । धांवतां चिरडती गजवाजी ॥ ६ ॥
काळसर्परसनी[७५] तरवारी । तीस कोण जन कात[७६]र वारी ॥
स्पर्शतां चि बहु सत्वर मारी । काय ते प्रगटली नरमा[७७]री ॥ ७ ॥
तात सोद[७८]र सखे सुत काका । यापरी बहुत मारिति हाका ॥
ऊठती कलितशस्त्र[७९] कबंधे[८०] । मारिती निजजनास चि अंधे ॥ ८ ॥
कित्येक शोणिततटिन्युदरांत[८१] मेले । जे कातरांतरतमांत पळोन गेले ॥
एवं तदा क्षितिसुतातनया[८२]युधानीं । एका दिसांत भरिली यमराजधानी ॥ ९ ॥
मांसासि भक्षुनि निषेवुनि शोणितां[८३]तें । भूतें दिलें म्हणति भोजन मिष्ट तातें ॥
याच्या नसे म्हणति तीं तुलना यशातें । तें ऐकतां सुख गमे बहु त्या कुशातें ॥ १० ॥

---

६५ आज्ञाविधु=आज्ञारूपी चंद्र. ६६ पयोधि=समुद्र. ६७ निमाले=मेले. ६८ महाकांडव्रात=बाणाचा मोठा समूह. ६९ अब्धि=समुद्र. ७० तदिषुशिखिसंतप्त=त्याच्या बाणाच्या अग्नीनें तापलेला. ७१ तरणी=सूर्य. ७२ रश्मि=किरण. ७३ करवाल=तरवार. ७४ पावक=अग्नि. ७५ रसना=जीभ. ७६ कातर=भित्रा. ७७ नरमारी=महामारी (cholera) देवी. ७८ सोदर=भाऊ. ७९ कलितशस्त्र=धारण केलीं आहेत शस्त्रें ज्यांनीं असे. ८० कबंधें=मस्तकरहित धडें. ८१ शोणिततटिन्युदरांत=रक्तनदींत. ८२ क्षितिसुतातनय=सीतापुत्र. ८३ शोणित=रक्त.

आसूर्योदय[८४] यापरी बळें[८५] तिहीं संहारितां पाहिलें ।
तेव्हां त्या भरतासि कोपशिखिनें[८६] उद्दंडसें[८७] दाहिलें ॥
संताडी कुशहृत्स्थळासि अनळज्वाळाकुळेषुव्रजें[८८] ।
साधूंच्या प्रतिपालनीं मृदु असत्संक्रंदनीं[८९] तीव्र जे ॥ ११ ॥
त्याचें करुनि निवारण वारणशत्रुप्रताप[९०] कुश बोले ॥
धरुनि वृथा काम[९१] रणीं कां मरणीं सिद्ध मूढ हे झाले ॥ १२ ॥
सेनालक्ष्मणशत्रुघ्नपंचतामोहहेतु[९२] मी ॥
पतंगदीपकन्यायें मरत्वां काय हे तुम्ही ॥ १३ ॥
म्हणे भरत हे शिशो त्यज खळा ममाश्वोत्तमा ।
न मानिसि जरी मनीं धरुनि गर्व लोकाधमा ॥
यमालयपथीं[९३] न हो पथिक[९४] मी करुनि क्षमा ।
न मारिन असो प्रसू[९५] तव न तापसी सश्रमा[९६] ॥ १४ ॥
मदीयबळशोणितें करुनि तर्पिली त्वां क्षमा[९७] ।
स्वबंधु हि विमर्दिले जरि तथापि केली क्षमा ॥
त्यजीं मखहयास[९८] या धरुनि अन्यथा[९९] मी तुला ।
पुरासि[१००] मग नेइन क्षण न लागतां रे मुला ॥ १५ ॥
सोडुनि माझा घोडा दोघे ही हस्त या क्षणीं जोडा ॥
शरणागत ह्मणवा रे या चि उपायें समर्थभय वारे ॥ १६ ॥
वांचविलें भरतानें ऐसें जननीस शीघ्र सांगावें ॥
पुनरपि असें न करणें निजजीवनदातृकीर्तिला गावें ॥ १७ ॥
कैकेयीपुत्र बोले खर मृदुल असें जेधवां आत्मतुंडें ।
कोपें नेत्रें कुशाचीं तंव दिसति जशीं खादिरांगारकुंडें[१] ॥
सोडी निश्वास पादाहतें[२] उरग[३] तसा दंतवस्त्रांसि[४] खंडी ।
कोदंडी[५] चंडकांडी[६] कुश चि परि गमे पत्र[७] ज्याचें शिखंडी[८] ॥ १८ ॥

---

८४ आसूर्योदय=सूर्य उगवे पर्यंत. ८५ बळ=सैन्य. ८६ कोपशिखी=क्रोधाग्नि. ८७ उद्दंड=पुष्कळ. ८८ अनळज्वाळाकुळेषुव्रज=अग्नीच्या ज्वाळेसारख्या बाणांचा समूह. ८९ असत्संक्रंदन=दुष्टमर्दन. ९० वारणशत्रुप्रताप=सिंहासारखा आहे प्रताप ज्याचा. ९१ काम=इच्छा. ९२ सेनालक्ष्मणशत्रुघ्नपंचतामोहहेतु=सेनेचें मरण (पंचता) आणि लक्ष्मण व शत्रुघ्न यांची मूर्च्छा (मोह) यांचें कारण (हेतु.) ९३ यमालय=यमाचें घर. ९४ पथिक=वाटसरू ९५ प्रसू=आई. ९६ सश्रमा=दुःखी. ९७ क्षमा=भू. ९८ मखहय=यज्ञाचा घोडा. ९९ अन्यथा=नाहीं तर. १०० पुर=शहर. १ खदिरांगार=खैराच्या लांकडाचे निखारे. २ पादाहत=पायानें तुडविलेला. ३ उरग=साप. ४ दंतवस्त्र=ओंठ. ५ कोदंडी=धनुष्य आहे हातीं ज्याच्या असा. ६ चंडकांडी=तीक्ष्ण आहेत बाण ज्याचे असा. ७ पत्र=वाहन. ८ शिखंडी=मोर. (ज्याचें वाहन मोर असा कार्तिकेय).

ताडी सप्त सुवृंदें कुश कुशल करें शीघ्र रामानुजाला ।
पांचां सातां शरांहीं इतर भट तयां सत्तरांहीं नळाला ॥
वाताच्या नंदनाला खरविशिख[9]शतें अंगदातें सहस्त्रें ।
नीळातें ही तदर्धें स्थविरें[10] तिस शतें छिन्न वाहे महास्त्रें ॥ १९ ॥
ज्यांच्या उरीं स्पर्श केला बलाकृष्ट[11]शिलीमुखें ॥
त्यांहीं त्यांहीं भूगतांहीं वीराहीं वाशिलीं मुखें ॥ २० ॥
षट् चंडकांडप्रकरें[12] लवानें । केलें धनु च्छिन्न तदा लवानें[13] ॥
ससूतवाजीशुभलक्षणानें । संचूर्णिला तद्रथ हि क्षणानें ॥ २१ ॥
वक्षस्थळीं बाण तदा कुशानें । संप्रेरिले युद्धनिरंकुशानें[14] ॥
संमूढ होऊनि पडे धडाडां । रक्तप्रवाहासि वमे भडाडां ॥ २२ ॥
जेव्हां मूर्छित देखिला क्षितितळीं भास्वत्कुळाचा[15] टिळा ।
क्रोधें पर्वत योजनायत[16] मरुत्पुत्रें[17] समुत्पाटिला ॥
हुंकारध्वनिकंपितत्रिभुवनें दोघांवरी सोडिला ।
त्यांहीं तो त्रसरेणु[18]संचय वियद्गंगां[19]तरीं पाडिला ॥ २३ ॥
वातोद्धूतमहीध्ररेणुगण[20] तो जेव्हां शिरे खांगणीं[21] ।
युद्धालोकनकौतुकागतनभस्थस्वर्वधू[22] तत्क्षणीं ॥
वक्त्रें झांकिति नेत्र चोळिति किती त्या फुंकिती थुंकिती ।
कीती खोकती ओकती किति धुतस्वालंकृती[23] शिंकती ॥ २४ ॥
ऐसें कौतुक निर्मिलें लवयुतें त्या सद्यशःसंचकें ।
वामी[24] मारुति ताडिला मग कुशें बाणाचिया पंचकें ॥
वज्राच्छिन्ननगेंद्रसा[25] धडधड क्षोणीतळीं[26] आपटे ।
कांपे सांद्र विनाकरा थरथरां भू पृष्ठ जीचें फुटे ॥ २५ ॥

---

९ खरविशिख=तीक्ष्ण बाण. १० स्थविर=ह्मातारा (जांबवान्). ११ बलाकृष्टशिलीमुखें=जोरानें ओढिलेल्या बाणानें. १२ चंडकांडप्रकर=तीक्ष्णबाणसमूह. १३ लव=अत्यल्प काळ. १४ युद्धनिरंकुश=युद्धांत न हटणारा. १५ भास्वत्कुळ=सूर्यवंश. १६ योजनायत=चार कोस लांब. १७ मरुत्पुत्र=मारुती. १८ त्रसरेणु=तीन रेणूंचा समूह (ज्याचा यांत्रिक अथवा रासायनिक रीतीनें विभाग करितां येत नाहीं त्यास परमाणु ह्मणतात). १९ वियद्गंगा=आकाश गंगा. २० वातोद्धूतमहीध्ररेणुगण=वाऱ्यानें उडविलेला पर्वताच्या रेणूंचा समूह. २१ खांगण=आकाश. २२ युद्धालोकनकौतुकागतनभस्थस्वर्वधू=युद्ध पहाण्याच्या हौसेनें येऊन आकाशांत उभ्या राहिलेल्या अप्सरा. २३ धुतस्वलंकृति=हालविले आहेत आपले अलंकार ज्यांहीं अशा (शिंकते समयीं आंगावरचे अलंकार हलले). २४ वामी=प्रतिकूल. २५ वज्रच्छिन्ननगेंद्रसा=वज्रानें तोडलेल्या मोठ्या पर्वता सारखा. २६ क्षोणी=भू.

ऐसें कुशें कौतुक तेथ केलें । सर्वां भटांचें मग धैर्य गेलें ॥
धाकें पळाली अवशिष्ट सेना । म्याडांसि कांहीं च पुढें दिसेना ॥ २६ ॥
करूनियां ते जन वंदनातें । निवेदिती श्रीरघुनंदनातें ॥
सबाष्पदीनानन[27] खेद मानी । धरी धृतीतें[28] परमाभिमानी ॥ २७ ॥
हा वत्सा भरता मदुक्तिनिरता हा सद्गुणा लक्ष्मणा ।
हा वत्सा घननादनाशकुशला[29] हा भिन्नरक्षोगणा[30] ॥
हा शत्रुघ्न सखे मरुत्सुत मम प्राणप्रदा नील हा ।
हा हा हांगद जाववान्नल कसे निर्वीर्य झालां महा ॥ २८ ॥
एवं फार तदा विलाप करुनि श्रीराम तो घे सवें ।
सुग्रीवासि बिभीषणाप्रति रथीं आरूढ झाला जवें[31] ॥
सेनामध्यविराजमान उडुराट[32] शोभे जसा खांगणीं ।
पावे जाउनि युद्धभूमिजवळि क्षोणींद्रचूडामणी ॥ २९ ॥
रामा मनोज्ञगुणधामा[33] पलाशजनतामारणैकनिरता[34] ।
कामारिचित्तसदना[35] मारुतिप्रियसुनामा[36] न शत्रुविजिता ॥
धामाधिपान्वयवरा[37] मानशौर्यसुभगा मानिषेव्यचरणा[38] ।
वामाकृते[39] इतरवामापराङ्मुखमना[40] मानवैकशरणा[41] ॥ ३० ॥
एवं शल्यनिपीडितात्मजनतावक्त्रोत्थनामध्वनी[42] ।
येतां युद्धधरेसमीप शिरति श्रीरामकर्णाध्वनीं[43] ॥
त्याला देखुनियां दयाकुलमना[44] झाला कृपापांपती[45] ।

२७ सबाष्पदीनानन=अश्रुयुक्त व केविलवाणीं आहेत मुखें ज्यांचीं असे. २८ धृति=धैर्य. २९ घननादनाशकुशल=इंद्रजितास मारण्याविषयीं निपुण. ३० भिन्नरक्षोगण=जखमी केले आहेत राक्षसांचे समूह ज्यानें असा. ३१ जव=वेग. ३२ उडुराट्=नक्षत्रांचा राजा चंद्र. ३३ मनोज्ञगुणधाम=मनोहर गुणांचें स्थान. ३४ पलाशजनतामारणैकनिरत=( पल+अश+जनता+मारण+एक+निरत ) मांस भक्षक राक्षसांच्या समूहास मारण्याविषयीं अतितत्पर. ३५ कामारिचित्तसदन=मदनशत्रु शिव याचे चित्तांत रहाणारा. ३६ मारुतिप्रियसुनाम=मारुतीला प्रिय आहे उत्तम नाम ज्याचें असा. ३७ धामाधिपान्वयवर=तेजाचा स्वामी सूर्य याचे वंशांत श्रेष्ठ असा. ३८ मानिषेव्यचरण=( मा+निषेव्य+चरण )=लक्ष्मीनें सेविले आहेत पाय ज्याचे असा. ३९ वामाकृति=सुंदर आहे रूप ज्याचें असा. ४० इतरवामापराङ्मुखमना=परस्त्रियांविषयीं पराङ्मुख आहे मन ज्याचें असा. ४१ मानवैकशरण=मानवांचा एकच रक्षक असा. ४२ शल्यनिपीडितात्मजनतावक्त्रोत्थनामध्वनी=( शल्य+निपीडित+आत्म+जनता+वक्त्र+उत्थ+नाम+ध्वनी ) बाणांनीं पीडिलेल्या आपल्या लोकांच्या तोंडातून निघणारे नामाचे शब्द. ४३ कर्णाध्वनीं=कर्णमार्गांत. ४४ दयाकुलमना=कृपेनें व्याप्त आहे मन ज्याचें असा. ४५ कृपापांपती=( कृपा+अपांपति ) दयासागर.

गेले काय ह्मणे किशोरें[46] तंव ते आले अकस्मात् कृती ॥ ३१ ॥
काकपक्षधर[47] कार्मुकपाणी[48] । मेघवर्ण[49] सुकुमार कृपाणी[50] ॥
तुल्यलक्षण समानवयाचे । देवसे गणिति मानव याचे ॥ ३२ ॥
जानकीवदनपद्म[51]समानें । तन्मुखें निरखिलीं बहु मानें ॥
स्वाकृतीधरशिशुंप्रति पाहे । तो सुखासि रघुनंदन लाहे ॥ ३३ ॥
तद्वृत्तश्रवणोत्सुकश्रुति[52] कृती श्रीराम त्यांतें पुसे ।
कोणापासुनि सांगचापनिगमीं[53] अभ्यास केला असे ॥
उद्दंडध्वजिनी[54]विनाश करितां कांहीं च नाहीं श्रम ।
क्षोणीभूषणराजिरत्न[55] तुमचा कोण्या स्थळीं आश्रम ॥ ३४ ॥
कोणीं केलें उपनयन वदा मातृताताभिधानें ॥
शब्दब्रह्माभ्यसन[56] घडलें कीं महत्संनिधानें[57] ॥
निष्प्रत्यूहें[58] सकळ घडती नित्य कीं सद्विधानें[59] ।
रामें वाक्यें करुनि पुशिलें त्यांसि एवंविधानें[60] ॥ ३५ ॥
ह्मणे कुश नृपा असो काशितरी हि अस्मत्कथा ।
पुसूनि तुज काय गा फळ विलंब होतो वृथा ॥
त्यजूनि निज पौरुषा[61] प्रति अशा न वार्ता[62] रणीं ।
करीं स्वविशिखांसि[63] घे त्वरित तूं नियोजीं गुणीं[64] ॥ ३६ ॥
स्ववृत्त न निवेदितां प्रथम वीरचूडामणे[65] ।
न युद्ध तुजशीं घडे रघुपती असें जों ह्मणे ॥
तदा स्मितलसन्मुखद्विजसमूहशुभ्रद्युति-
छटाधवलितांबराक्षिति[66] कथी कुश स्वास्थिति ॥ ३७ ॥

---

४६ किशोर=बालक. ४७ काकपक्षधर=झुलपें धारण करणारे. ४८ कार्मुकपाणी=धनुष्यें आहेत हातीं ज्यांच्या असे. ४९ मेघवर्ण=ढगासारखे सांवळ्या रंगाचे. ५० कृपाणी=तरवार हातीं धरणारे. ५१ वदनपद्म=मुखकमल. ५२ तद्वृत्तश्रवणोत्सुकश्रुति=त्यांचा इतिहास ऐकण्याविषयीं उत्सुक आहेत कान ज्याचे असा. ५३ सांगचापनिगम=समग्र धनुर्वेद. ५४ ध्वजिनी=सेना. ५५ क्षोणी भूषणराजिरत्न=पृथ्वीच्या अलंकारसमूहांत श्रेष्ठ असा. ५६ शब्दब्रह्माभ्यसन=वेदाध्ययन. ५७ महत्संनिधानें=मोठ्याच्या जवळ. ५८ निष्प्रत्यूह=निर्विघ्न. ५९ सद्विधानें=उत्तम क्रिया. ६० एवंविध=अशा प्रकारचें. ६१ पौरुष=मर्दपणा. ६२ वार्ता=गप्पा. ६३ विशिख=बाण. ६४ गुण=दोरी. ६५ वीरचूडामणि=सर्व योध्यांत श्रेष्ठ असा. ६६ स्मितलसन्मुखद्विजसमूहशुभ्रद्युतिछटाधवलिततांबराक्षिति=( स्मित+लसन्+मुख + द्विज+समूह+शुभ्र+द्युति+छटा+धवलित+अंबर+क्षिति ) हास्याचे योगानें चमकणारे जे मुखांतील दांत त्यांच्या समूहाच्या पांढऱ्या कांतीच्या झाकेनें पांढरी केली आहे पृथ्वी व आकाश ज्यानें असा. ( हें सगळें कुशाचें विशेषण ).

सीता केवळ काननीं प्रसवली जीं जातकर्मादिकें ।
कर्मं सोपनयें[67] स्वयें चि मुनिनें केलीं महत्कौतुकें ॥
सम्यग्वेद सशास्त्र ही पढविले गानादि नानाकळा ।
श्रीमद्रामचरित्र चित्र कथिलें झाली मती सोज्वळा ॥ ३८ ॥
बुद्धिस्वास्थ्य घडे मनोमळ झडे स्वर्ग स्वयें सांपडे ।
देहीं मोक्ष जडे करीं जय चढे काळारी धाकें दडे ॥
रामाच्या चरितामृताप्रति पितां सेना जयाची कथा ।
तेथें काय कितीक कौतुक मनीं लोकासि भासे वृथा ॥ ३९ ॥
रामा तूझी ममता जायातनूयालयादिकीं नाहीं ॥
तस्मान्मृतसेनेची तुजला गणना नसे[68] कांहीं ॥ ४० ॥
शक्ति[69] नसे तुज संप्रति ते त्वां कां त्यागिली वनीं रामा ॥
शक्तिविवर्जित नर जो तो होईल काय योग्य संग्रामा ॥ ४१ ॥
सीता असा परिसतां कुशशब्द कानें ।
ते पुत्रसे वळखिले रघुनायकानें ॥
धिग्युद्ध हें म्हणुनियां मग कश्मलाला[70] ।
पावोनियां विकळ केवळ तो गळाला ॥ ४२ ॥
झाला मुहूर्तें मग सावधान । सीतापती शौर्ययशोनिधान ॥
तेव्हां जगत्कंटकरावणारी[71] । वक्त्रें सुकंठासि[72] असें विचारी ॥ ४३ ॥
कोणाचे सुत दोघे हे या शोधासि वाळिबंधो घे ॥
मजशीं करिती दावे जाणत असशील तरि निवेदावे ॥ ४४ ॥
सुग्रीव वदे तेव्हां रामातें नमुनि पूर्णकामातें ॥
तूझे चि वनामध्यें दोघे प्रतिबिंब वाटती मातें ॥ ४५ ॥
आज्ञा मला त्वरित दे रघुनायका मी । आहें दशास्यमृति[73]पासुनि युद्धकामी[74] ॥
हे भक्तकामसुरपादपराज[75] आजी । या बाळकां सह घडो मजलागिं आजी[76] ॥ ४६ ॥
आज्ञा होतां सुकंठें तरु उपडुनियां क्षेपिला जो प्रचंडें ।
त्या ही केलीं द्रुमाचीं स्वविशिखनिकरें[77] तों नभीं कोटि खंडें ॥

---

६७ सोपनय=मौंजिबंधना सह. ६८ या आर्यार्द्धांत पांचव्या गणा नंतर तीन मात्रा कमी आहेत यावरून कांहीं अक्षरें नष्ट झालेलीं आहेत हें उघड होतें. ६९ शक्ति=स्त्री. ७० कश्मळ=मूर्च्छा. ७१ जगत्कंटकरावणारी=जगताला कांट्याप्रमाणें पीडा देणाऱ्या रावणाचा शत्रु राम. ७२ सुकंठ=सुग्रीव. ७३ दशास्यमृति पासून=दशमुख रावण मेल्यापासून. ७४ युद्धकामी=युद्धेच्छु. ७५ भक्तकामसुरपादपराज=भक्तांची इच्छा पुरविणारा असा श्रेष्ठ कल्पवृक्ष. ७६ आजी=युद्ध. ७७ विशिखनिकर=बाणसमूह.

तद्वक्षोरक्त जैसें शरतति[७८]सि दिलें देह ही त्या क्षितीतें ।
आली मूर्च्छा हि यांच्या[७९] धरुनि म्हणुनियां अर्पिले प्राण तीतें ॥४७॥
होतां वानरराज मूर्च्छित असा तो नीळ ही तत्क्षणीं ।
क्रोधाला धरुनी मनांत तरुला हस्तीं उडे खांगणीं[८०] ॥
ताडी त्यासि धरारुहें[८१] प्रबळ तो बाहूसि पाणिद्वयें ।
हा ही सानुज खंडित द्रु[८२] कुश तद्वक्षासि बाणें स्वयें ॥ ४८ ॥
जेव्हां तद्रक्तबिंदु क्षितिवरि पडले मूळ नीळाप्रमाणें ।
त्यांचे ही नीळ झाले प्रगट मग कुशें ताडिले ते हि बाणें ॥
तद्रक्ताच्या हि धारा प्रबळतर महाकायनीळात्ममाता[८३] ।
झाला ऐसा चि नीलव्रज[८४] सागरितरु क्ष्मानभोतीं[८५] न माता[८६] ॥ ४९ ॥
चित्तीं सम्यग्विचारी कुशल कुश जलौकास्त्र[८७] जें त्यासि योजी ।
त्याच्या देहीं जलौका प्रबळ चि जडती कोण हो त्यांसि मोजी ॥
होतां नीरक्त पूर्वासहित शराचित क्ष्मातळीं वोळवीलें ।
कुष्टाचे चालवीलें कर यमसदना सर्व ही बोळवीले ॥ ५० ॥
गुणग्रहणदक्ष[८८] ते म्हणाति साधु साधु क्षमा ।
क्षमादुहितृनंदना[८९] धरु तुझा सदा पक्ष मा[९०] ॥
क्षमाबळपराक्रमद्युति[९१]यशोनिधी[९२] सर्वदा ।
वदान्यपति[९३] हो सुखी चिर वसें सुहृत्सर्वदा ॥ ५१ ॥
तदा कुशलवत्रस्त[९४] तें शिरे सैन्य काननीं[९५] ॥
यशस्तोम[९६] जनीं त्यांचा गुण स्वर्नायिकाननीं[९७] ॥ ५२ ॥
एकाकी च तदा रघूद्वह रणीं क्रोधें उभा राहिला ।
तद्भीत्याकुल भूमि कांपवि धृतस्वीयात्मभाराहि[९८]ला ॥
नेला कीं चिरसंचितोत्तमयशस्तोम स्वयें पाहतां ।
युद्धीं मृत्यु बरा ह्मणे सुख नसे दुष्कीर्तिला वाहतां ॥ ५३ ॥
कालानलप्रभ[९९]शरांसि गुणासि जोडी ।

---

७८ तति=पंक्ति. ७९ यांच्या=याचना, भिक्षेची इच्छा. ८० खांगण=आकाश. ८१ धरारुह=वृक्ष. ८२ द्रु=वृक्ष. ८३ महाकायनीळात्ममाता=मोठमोठे नीळ उत्पन्न करणाऱ्या. ८४ व्रज=समूह. ८५ क्ष्मानभोतीं=पृथ्वींत व आकाशांत. ८६ माता=मावणारा. ८७ जलौकास्त्र=जळूचें अस्त्र. ८८ गुणग्रहणदक्ष=गुण घेण्याविषयीं निपुण. ८९ क्ष्मादुहितृनंदन=भूकन्या सीता इचा पुत्र. ९० मा=लक्ष्मी. ९१ द्युति=शोभा. ९२ निधी=ठेवा, खजीना. ९३ वदान्यपति=दातृश्रेष्ठ. ९४ त्रस्त=भ्यालेले. ९५ कानन=अरण्य. ९६ स्तोम=समूह. ९७ स्वर्नायकाननीं=अप्सरांच्या तोंडीं. ९८ धृतस्वीयात्मभाराहि=धरिला आहे आपला भार ज्यानें असा सर्प जो शेष तो. ९९ कालानलप्रभ=कल्पांतींच्या अग्नीसारखे

आकर्ण चापलतिके प्रति राम ओढी ॥
बालद्वयावर कृपे सह शीघ्र सोडी ।
तों त्यां ससानुज कुश स्मितवक्त्र[100] तोडी ॥ ५४ ॥
शिशु[1]तें सत्वरत[2]ातें समर्पिला जो क्षुरप्र[3] सत्वर तातें ॥
तो तो होय चतुर्धा बाणांशीं वाढली अशी ते स्पर्द्धा ॥ ५५ ॥
प्रावृण्मेघ[4] जसा नगां[5]वरि जळें वर्षे तसा राम ही ।
बाणांच्या निकरें तदा थरथरां कांपे असारा[6] मही ॥
तों ते सस्मितवक्त्र कांडतति[7]चे निर्मूनियां तूकडे ।
भूमीतें किति अर्पुनी उडविती व्योम[8]स्थ देवांकडे ॥ ५६ ॥
निर्धनलोकमनोरथकृपणालयशारदांबुदांसारे[9] ॥
त्या च्चि रणीं निष्फळ शर रामाचे जाहले तदा सारे ॥ ५७ ॥
रण जनविस्मयकारक दारकयुग्म[10]ासवें असें रामें ॥
केलें खरतरशरवरधरकरपद्में[11] गुणाचियारामें[12] ॥ ५८ ॥
स्वबलतुल्य तदीय बळाप्रति । स्वहृदयीं समजे धरणीपती ॥
शर तयांसि शिवे न च्चि आपुला । तदिषुगोचर[13] तो बहु तापला ॥ ५९ ॥
त्या दोघांच्या मुखातें जंव निजनयनें युद्ध होतां हि पाहे ।
तों तों कांतास्मृतीतें घडि घडि हृदयीं जानकीजानि[14] लाहे ॥
त्या रंध्रीं त्या सतीचा स्मर[15] अणिक तिचे पुत्र ही चापपाणी[16] ।
एकामेंचि[17] प्रतापें रघुपतिस उरीं ताडिती क्रूर बाणीं ॥ ६० ॥
उरःक्षतक्षरत्प्रभूतरक्तसिक्तविग्रह[18] ।
प्रमीलिताक्ष[19] तो जगत्क्षयीं जसा रवि ग्रह ॥
सुराश्रुबिंदुसंतती[20] सह क्षणें रथीं पडे ।

---

१०० स्मितवक्त्र=हास्ययुक्त आहे मुख ज्याचें असा. १ शिशु=बालक. २ सत्वरत=सत्वगुणी. ३ क्षुरप्र=बाण. ४ प्रावृण्मेघ=पावसाळ्यांतील ढग. ५ नग=पर्वत. ६ असारा=बलरहिता. ७ कांडतति=बाणसमूह. ८ व्योम=आकाश. ९ निर्धनलोकमनोरथकृपणालयशारदांबुदासारे=दरिद्र्यांचे मनोरथ, कृपणांचीं घरें, व शरदृतूंतले ढग यांचेसारखे (निष्फळ झाले). १० दारकयुग्म=दोन बालक. ११ खरतरशरवरधरकरपद्म=तीक्ष्ण असे उत्तम बाण धरिले आहेत आपल्या हस्तकमलांत ज्यानें असा. १२ गुणाचियारामें=गुणाचा बाग यानें ( आराम=बाग ). १३ तदिषुगोचर=त्यांच्या बाणांच्या तडाक्यांत सांपडणारा. १४ जानकीजानी=सीतापति राम ( जानकी आहे जाया ज्याची तो ). १५ स्मर=मदन. १६ चापपाणी=धनुष्यें आहेत हातीं ज्यांच्या असे. १७ एकामेंचि=एकदमच. १८ उरःक्षतक्षरत्प्रभूतरक्तसिक्तविग्रह=उरावरच्या जखमेंतून वहाणाऱ्या पुष्कळ रक्तानें भिजलें आहे शरीर ज्याचें ( उरःक्षत+क्षरत्+प्रभूत+रक्त+सिक्त+विग्रह ). १९ प्रमीलिताक्ष=मिटले आहेत डोळे ज्यानें असा. २० सुराश्रुबिंदुसंतती=देवांच्या अश्रूंची पंक्ति.

सखेद लेखं[२१] देखतां प्रमोद त्यांस ही घडे ॥ ६१ ॥
प्रचंडपंक्तितुंडदंडदक्ष[२२] बाहुदंड हा ।
किशोरकांड खंडिता स्वपिंड जाहला अहा ॥
सलोक देवलोक ही सशोक तो करी क्षमा-
तळीं निजाश्रुवृष्टिला तृणोद्भवास जे क्षमा ॥ ६२ ॥
ऐसा जेव्हां रघुतिलक तो गुंतला मोहपाशीं[२३] ।
आले हर्षे कुशलव तदा जानकीजानिपाशीं ॥
घेती त्यातें उतरुनि करें मेदिनीमंडलातें[२४] ।
केयूरांतें[२५] कटकपदकस्रङ्[२६]मणीकुंडलांतें ॥ ६३ ॥
कैकेयीसूनु[२७]मेघध्वनिरिपु[२८]लवणद्वेषणाद्यंगभूषा[२९][३०] ।
त्यांतें घेती करांहीं अभय हरि जसा दीपकांतीसि पूषा[३१] ॥
मूर्च्छाग्रस्त प्रतापी भट इतर हि जे सैनिक च्छिन्नकाय[३२] ।
दोघे तद्भूषणांचें हरण करिति तद्धारनाशार्थ काय ॥ ६४ ॥
आहे हा रथ हेमरत्नखचित ब्रध्न[३३]प्रभापुंजसा ।
जावें यावरतें बसोनि लव हें बोले स्वतोषें जसा ॥
तेव्हां सानुज तो चढे कुश सुखें श्रीराघवस्यंदनीं[३४] ।
त्यांची दृष्टि जनांसि त्या निरखितां गेली मरुन्नंदनीं[३५] ॥ ६५ ॥
श्रीमन्मारुति जांबवान् प्लवंग[३६] हे दोघे चि तेथें कृती ।
होते कृत्रिममूर्च्छित क्षितितळीं अत्यंत रम्याकृती ॥
त्यांतें पाहुनियां ह्मणे लव कुशा या वानरांतें धरा ।
या नेऊं अवलोकितां चि जननी होईल हृष्टांतरा ॥ ६६ ॥
ऐसें ऐकोनि कानें पवनसुत ह्मणे जांबवन्[३७]मृत्यु आला ।
तूतें मातें धरूनि प्रबळ बळ लवें नेइल स्वालया[३८]ला ॥
मूर्च्छाग्रस्तात्म रामप्रभृति मृत तसे पाडिले बाळकांहीं ।
झांकावे लोचनांतें दृढ जयद नसे आपणा काळ कांहीं ॥ ६७ ॥
युद्धातें करितां महाबळ शिशू संहारितील क्षणें ।
माच्चितीं त्रिजगज्जयार्ह[३९] चि असे हे भासती लक्षणें ॥

---

२१ लेख=देव. २२ प्रचंडपंक्तितुंडदंडदक्ष=मोठ्या दशमुख रावणाचें मर्दन करण्याविषयीं समर्थ असा. २३ मोह=मूर्च्छा. २४ मेदिनी=भू. २५ केयूर=बाहुभूषण. २६ स्रक्=हार. २७ कैकेयीसूनु=भरत. २८ मेघध्वनिरिपु=इंद्रजिच्छत्रु लक्ष्मण. २९ लवणद्वेषण=शत्रुघ्न. ३० भूषा=दागिने. ३१ पूषा=सूर्य. ३२ छिन्नकाय=जखमी झालीं आहेत शरीरें ज्यांचीं असे. ३३ ब्रध्न=सूर्य. ३४ स्यंदन=रथ. ३५ मरुन्नंदन=मारुती. ३६ प्लवग=वानर ३७ जांबवन्=हे जांबवाना. ३८ आलय=घर. ३९ अर्ह=योग्य.

जातील स्वगृहासि घेउनि तरी संदिग्ध[४०] वाटे जिणें ॥
आजि क्ष्मातनयासमीप घडतें पंचत्व[४१] शस्त्राविणें ॥ ६८ ॥
ऐसें बोले उपांशु[४२] श्वसनसुत[४३] मग क्षिप्र[४४] तो शब्द जाला ।
दोघांतें न्यावयाला लव लवकरि तो त्या स्थळालागिं आला ॥
स्थापूनि स्यंदनांतीं प्रबळ शिशु सुखें पर्णशाळेसि गेले ।
सीता पादांबुजातें नमन करुनियां प्रांजळी नम्र ठेले ॥ ६९ ॥
पुत्रांतें हि न हृदयीं आनंदातें हि ते धरी सुमती ॥
करुणामृतासि केवळ न वर्षली अश्रुवारिलीं[४५] हि सती ॥ ७० ॥
चिर आलिंगुनि पुत्रद्वयास सोडी श्रमास ही सीता ॥
सुततनुगतरिपुशस्त्रव्रणावलोकप्रहर्षिताभीता[४६] ॥ ७१ ॥
सांगे सीतेसि तेव्हां लव जननि कुशें फारसें युद्ध केलें ।
याच्या त्रासें रिपूचें बहु बळ यमुनाबंधुगेहासि[४७] गेलें ॥
या वीरें राम तो ही प्रबळ परि रणीं जिंकिला बाणजाळें ।
हीं त्यांचीं भूषणें हा रथवर हि पहा थोर आश्चर्य झालें ॥ ७२ ॥
त्वत्कौतुकार्थ प्लवगद्वयातें । मीं आणिलें तूं अवलोक यातें ॥
तुझ्या कृपेनें चि खळ क्षयाला । नेऊनि आलों कुशल क्षयाला[४८] ॥ ७३ ॥
एवं ऐकोनि पाहे तों वोळखे मारुतीस ती ॥
दुसरा जांबवान्वृद्ध हें जाणे सुमती सती ॥ ७४ ॥
सीता म्हणे लवाला रणीं प्लवंगांस सोड जा बाळा ॥
मज पाहुनि हे मानी होतील प्राणहीन हे मानीं ॥ ७५ ॥
ऐकोनि ऐसें मग त्या लवानें । रणीं हरींतें त्यजिलें लवानें ॥
झाली सुखी ते बहु भूमिकन्या । धन्या वदान्या[४९] जगदेकमान्या ॥ ७६ ॥
अशा काळीं आला वरुणसदना[५०] पासुनि मुनी ।
तयातें हे दोघे कथिति निजवृत्तासि नमुनी ॥
तदा आलिंगूनि क्षितिदुहितृपुत्रांप्रति करें ।
शिरीं स्पर्शे हर्षें सुरविटपिगर्वक्षयकरें[५१] ॥ ७७ ॥
गंगानीर पवित्र नाम शमन प्रेमाश्रुनीरव्रजें[५२] ।

---

४० संदिग्ध=संशयित. ४१ पंचत्व=मरण. ४२ उपांशु=हळुच, गुप्त रीतीनें. ४३ श्वसनसुत=वायुपुत्र=मारुती. ४४ क्षिप्र=तात्काळ. ४५ वारि=पाणी. ४६ सुततनुगतरिपुशस्त्रव्रणावलोकप्रहर्षिताभीता=पुत्रांच्या शरीरावर शत्रूंनीं केलेल्या जखमा पाहून आनंद व भीति पावलेली. ४७ यमुनाबंधुगेह=यमाचें घर. ४८ क्षय=घर. ४९ वदान्या=उदारा. ५० सदन=घर. ५१ सुरविटपिगर्वक्षयकर=देववृक्ष कल्पद्रुम याचा गर्व नाहींसा करणारा. ५२ नीरव्रज=उदकसमूह.

वर्षे त्यांवर तो दयाब्धि भगवान् वाल्मीकि नेत्रांबुजें ॥
त्यांतें जे कथिली धनुःश्रुति तिचें साफल्य जालें खरें ।
त्या विप्रें सुतनिर्विशेष चि वनीं तीं पाळिलीं लेंकरें ॥ ७८ ॥
श्रीरामसैन्य हि बळें मथिलें करांहीं । संपादिला जय सुदुर्लभ लेंकरांहीं ।
आश्चर्ययुक्त मुनि पावुनियां सुखातें । पाहे अतृप्त हृदयें क्षण तन्मुखातें ॥ ७९ ॥
ऐसा शिष्यचरित्रतुष्ट भगवान् वाल्मीकि बोले मुखें ।
या युष्मच्चरितें करूनि हृदयीं मी पूर्ण झालों सुखें ॥
केला मत्प्रिय राम मूर्च्छित तुम्हीं हें दुःख झालें मला ।
दावा तें स्थळ जेथ सैन्य वधिलें आतां चि पाहूं चला ॥ ८० ॥
राजा राम गुणाभिराम तुमचा तो तात कीं त्याप्रति ।
दावा नेउनियां मला उचित हें केलें नसे संप्रति ॥
विप्रव्रातसमेत तो मग उठे बोलोनि ऐसें मुनी ।
सीतानंदन दाविती मग तया स्थानासि त्या नेउनी ॥ ८१ ॥
जेव्हां सानुज मूर्छित क्षितितळीं श्रीराम तो देखिला ।
त्रैलोक्याभर बाळविक्रम वनीं वाल्मीकिनें देखिला ॥
तेव्हां तो मुनि मंत्रपूत सलिलें सर्वांसि शिंपी करें ।
सर्वक्लेशहरें जनेप्सितकरें पुण्यामृतैकाकरें ॥ ८२ ॥
सुप्तोत्थिताचे परि सर्व ऊठले । वंदूनि वाल्मीकिपदासि भेटले ॥
कृपाकटाक्षें यमपाश तोडिले । म्हणोनि रामें निजहस्त जोडिले ॥ ८३ ॥
तेव्हां वाल्मीकिनामा मुनि धरि हृदयीं सानुजाला अजाला ।
आनंदाश्रुप्रवाहें भिजवि बहु तदा तोष झाला द्विजाला ॥
बोले तो लेखकांता प्रति धिषण जसा कीं पिता स्वात्मजाला ।
ऐसा चि तूं त्रिलोकीं गुरु कवि भगवान् वंदिती सर्व ज्याला ॥ ८४ ॥
रामा लोकापवादें निजयुवति वनीं त्यागिली त्वां ससत्वा ।
ते म्यां यूपार्थ रानीं विचरतें असतां देखिली शुद्धसत्वा ॥
तूझी कांता प्रशांता अजतनुजवधू मैथिलीची सुता हे ।
जाणूनि त्राण केलें तनुजवचनमनें आजपर्यंत पाहें ॥ ८५ ॥
तीचे हे पुत्र दोघे कुशलव तुजशीं निर्मिले युद्ध यांहीं ।

---

५३ धनुःश्रुति=धनुर्वेद. ५४ सुतनिर्विशेष=पोटच्या पुत्राप्रमाणें. ५५ युष्मच्चरित=तुमचें वर्तन. ५६ व्रात=समूह. ५७ लेखकांत=इंद्र. ५८ धिषण=बृहस्पति. ५९ स्वपुत्र. ६० ससत्वा=गर्भिणी. ६१ यूप=यज्ञस्तंभ. ६२ विचरत=फिरत. ६३ शुद्धसत्वा=पतिव्रता. ६४ अजतनुजवधू=अजपुत्र दशरथ याची सून. ६५ मैथील=जनक. ६६ त्राण=रक्षण

पुत्रच्छात्र[67]ादिकांहीं जित बुध धरिती दुःख चित्तीं न कांहीं ॥
आतां त्वद्विप्रयोग[68]प्रखरशिखिशिखा[69]तप्तदेहा अदोषा ।
न्यावी हर्षें गृहातें धरुनि मम वचें हे सपुत्रा स्वयोषा ॥ ८६ ॥
ऐसें वदोनि मग शिष्यासि पाठवुनि सीतेसि आणवि मुनी ।
स्वीकारिली सतनया राघवें त्वरित वाल्मीकि लागें नमुनी ॥
हर्षें तदा कुसुमवर्षें अमर्त्य जन वर्षें रघूत्तमशिरीं ।
प्रेमाश्रुशीकर[70] सुरांचे हि भूमिवरि नीहार[71] तेंवि शिशिरीं[72] ॥ ८७ ॥
गाती नभीं मुदित गंधर्व नाचति तदा अप्सरोगण सुखें ।
ब्रह्मेंद्ररुद्रमुख देव प्रहृष्ट रघुनाथासि वर्णिति मुखें ॥
भेरीप्रभृत्यखिलवाद्यस्वनें करुनि भैरो कि होय जगती ।
वाहे सुशीत मृदु गंधाढ्य[73] वात बहु लाहे प्रमोद[74] मग ती ॥ ८८ ॥
एवं झाला प्रमोद प्रचुरतर तदा विष्टपीं[75] अंगनेला[76] ।
अंगीकारोनि रामें मग निज नगरा सर्षि[77] वाल्मीकि नेला ॥
भेरीवीणामृदंगप्रभृति बहुविधें वाजलीं मंजु[78] वाद्यें ।
जेव्हां केलें प्रयाण प्रमुदितहृदयें त्या जगत्संभवाद्यें[79] ॥ ८९ ॥
साकेती[80]लागीं रामें गमन करुनियां यज्ञ संपूर्ण केला ।
झाला स्वांतीं[81] प्रमोद प्रचुर[82] अवभृथ[83]स्नान भूकन्यकेला ॥
दासीदासाश्वरत्नक्षितिकनकरथेभेंद्रधेन्वंशुकां[84]हीं ।
झाले तृप्त द्विजाति स्वमनिं न गणिती द्रव्यनाथा[85]सि कांहीं ॥ ९० ॥
एवं रावणपीडितत्रिभुवनक्लेशक्षया कारणें ।
ब्रह्मप्रार्थितपादपद्मयुगुलें देवें जगत्कारणें ॥
मायामानुषविग्रहें[86] कृतमहारक्षःसमित्निग्रहें[87] ।
सर्वांतें सदनुग्रहें सुखविलें निर्दोषलीलागृहें ॥ ९१ ॥
ऐशीं नित्य सुखाकरें सुचरितें एनस्तमोहस्करें[88] ।
जीं केलीं करुणाकरें रघुवरें भक्तापदातस्करें[89] ॥

---

६७ छात्र=शिष्य. ६८ विप्रयोग=वियोग. ६९ शिखिशिखा=अग्निज्वाला. ७० शीकर=बिंदु. ७१ नीहार=दंव. ७२ शिशिर=माघ फाल्गुन हे मास. ७३ गंधाढ्य=सुगंधी. ७४ प्रमोद=हर्ष. ७५ विष्टप=जगत्. ७६ अंगना=स्त्री. ७७ सर्षि=ऋषींसह. ७८ मंजु=मधुर ७९ जगत्संभवाद्य=जगताची उत्पत्ति कर्ता ( राम ). ८० साकेत=अयोध्या. ८१ स्वांत=चित्त. ८२ प्रचुर=पुष्कळ. ८३ अवभृथ=यज्ञसमाप्तिदर्शक. ८४ अंशुक=वस्त्र. ८५ द्रव्यनाथ=कुबेर. ८६ विग्रह=शरीर. ८७ समित्निग्रह=समूहदंडक. ८८ एनस्तमोहस्कर=पापरूपी अंधकाराचा सूर्य व० नाशकर्ता. ८९ भक्तापदातस्कर=भक्तांचीं संकटें घालविणारा.

त्यां मध्यें लव वर्णिला प्रमुदित स्वांतें मयूरेश्वेंर ।
लोकीं नाहिं च आर्य कार्य दुसरें या विग्रहें नेश्वेंर[१०] ॥ ९२ ॥
जैमिनिकृतभारतगतहृयमेधीं कुशलवाख्यानीं ॥
तेरावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ९३ ॥

इतिश्रीकुशलवोपाख्याने मयूरेश्वर
विरचिते त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥
श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु
समाप्तोयं ग्रंथः

---

१० नश्वर=नाशवंत.

# कुशलवोपाख्यानांतील वृत्तें.

## अध्याय १.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | आर्या. |
| २ | शार्दूलविक्रीडित |
| ३ | मंदाक्रांता. |
| ४–१२ | शार्दूलविक्रीडित. |
| १३ | स्रग्धरा. |
| १४–१६ | शार्दूलविक्रीडित. |
| १७ | आर्या. |

## अध्याय २.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | द्रुतविलंबित. |
| २ | मंदाक्रांता. |
| ३ | आर्या. |
| ४ | मंदाक्रांता. |
| ५ | आर्या. |
| ६–८ | अनुष्टुभ्. |
| ९ | रमा. |
| १०–१६ | पुष्पिताग्रा. |
| १७ | अनुष्टुभ्. |
| १८ | आर्या. |
| १९ | पंचचामर. |
| २० | अनुष्टुभ्. |
| २१–२३ | प्रहर्षिणी. |
| २४ | दंडक. |
| २५ | अनुष्टुभ्. |
| २६ | अमृतध्वनि. |
| २७ | मालिनी. |
| २८ | इंद्रवंशा. |
| २९–३१ | अनुष्टुभ्. |
| ३२–४० | आर्या. |
| ४१–४२ | अनुष्टुभ्. |
| ४३–५१ | आर्या. |

## अध्याय ३.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | रमा. |
| २ | अनुष्टुभ्. |
| ३ | आर्या. |
| ४–५ | अनुष्टुभ्. |
| ६–७ | आर्या. |
| ८ | स्रग्धरा. |
| ९–१० | आर्या. |
| ११ | अनुष्टुभ्. |
| १२–१३ | सारंग. |
| १४–१५ | अनुष्टुभ्. |
| १६ | स्रग्धरा. |
| १७ | दोहा. |
| १८–१९ | मंदाक्रांता. |
| २० | पृथ्वी. |
| २१ | आर्या. |
| २२ | हरिणी. |
| २३ | अमृतध्वनि. |
| २४ | माल्यभारा. |
| २५ | उपजाति. |
| २६ | मालिनी. |
| २७ | माल्यभारा. |
| २८ | रथोद्धता. |
| २९ | स्रग्धरा. |
| ३० | स्वागता. |
| ३१ | इंद्रवज्रा. |
| ३२ | शार्दूलविक्रीडित. |
| ३३ | पृथ्वी. |
| ३४–३५ | माल्यभारा. |
| ३६ | उपजाति. |
| ३७ | विबुधप्रिया. |
| ३८ | शालिनी. |
| ३९ | मालिनी. |
| ४०–४३ | अनुष्टुभ्. |
| ४४ | आर्या. |

## अध्याय ४.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | पृथ्वी. |
| २ | आर्या. |
| ३–५ | अनुष्टुभ्. |
| ६ | वसंततिलका. |
| ७ | शिखरिणी. |
| ८–१० | शार्दूलविक्रीडित. |
| ११ | प्रमिताक्षरा. |
| १२ | पुष्पिताग्रा. |
| १३ | प्रहर्षिणी. |
| १४ | उपजाति. |
| १५ | अनुष्टुभ्. |
| १६ | आर्या. |
| १७ | वंशस्थ. |
| १८–२० | वसंततिलका. |
| २१ | द्रुतविलंबित. |
| २२ | शार्दूलविक्रीडित. |
| २३–२५ | अनुष्टुभ्. |
| २६ | शार्दूलविक्रीडित. |
| २७ | माल्यभारा. |
| २८ | अनुष्टुभ्. |
| २९ | उपजाति. |
| ३० | वसंततिलका. |
| ३१ | उपजाति. |
| ३२ | सारंग. |
| ३३–३४ | अनुष्टुभ्. |
| ३५ | पृथ्वी. |
| ३६ | वसंततिलका. |
| ३७ | इंद्रवंशा. |
| ३८ | शिखरिणी. |
| ३९–४० | वसंततिलका. |
| ४१–४२ | शार्दूलविक्रीडित. |
| ४३ | वसंततिलका. |
| ४४ | मंदाक्रांता. |
| ४५ | उपजाति. |
| ४६ | आर्या. |
| ४७ | उपजाति. |
| ४८ | रुक्मिणी. |
| ४९ | आर्या. |
| ५० | वसंततिलका. |
| ५१ | उपजाति. |
| ५२ | अनुष्टुभ्. |

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| ५३–५४ | आर्या. |
| ५५–५६ | वसंततिलका. |
| ५७–५८ | उपजाति. |
| ५९–६० | आर्या. |
| ६१ | वसंततिलका. |
| ६२–६३ | उपजाति. |
| ६४ | अनुष्टुभ्. |
| ६५ | वियोगिनी. |
| ६६ | शिखरिणी. |
| ६७ | आर्या. |
| ६८ | अनुष्टुभ्. |
| ६९ | सारंग. |
| ७० | आर्यागीति. |
| ७१ | विबुधप्रिया. |
| ७२ | आर्या. |
| ७३ | वसंततिलका. |
| ७४ | चंद्रिका ऊर्फ उत्पलिनी. |
| ७५ | भुजंगप्रयात. |
| ७६–८३ | आर्या. |
| ८४ | स्रग्धरा. |
| ८५ | तोटक. |
| ८६–८७ | आर्या. |
| ८८ | शार्दूलविक्रीडित. |
| ८९ | आर्या. |

अध्याय ५.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | उपजाति. |
| २ | शार्दूलविक्रीडित. |
| ३ | अनुष्टुभ्. |
| ४ | उपजाति. |
| ५ | अनुष्टुभ्. |
| ६–७ | शार्दूलविक्रीडित. |
| ८ | मालिनी. |
| ९ | पृथ्वी. |
| ९–अ | आर्या. |
| १० | सारंग. |
| ११ | जलोद्धतगति. |
| १२ | स्रग्धरा. |
| १३ | आर्या. |
| १४ | विबुधप्रिया. |
| १५ | आर्या. |
| १६–१८ | शार्दूलविक्रीडित. |
| १९–२३ | आर्या. |
| २४ | पुष्पिताग्रा. |
| २५ | शार्दूलविक्रीडित. |
| २६ | अनुष्टुभ्. |
| २७ | अमृतध्वनि. |
| २८–३३ | आर्या. |
| ३४ | अनुष्टुभ्. |
| ३५ | स्रग्धरा. |
| ३६ | आर्या. |

अध्याय ६.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १–३ | स्रग्धरा. |
| ४ | वसंततिलका. |
| ५–७ | शार्दूलविक्रीडित. |
| ८ | विबुधप्रिया. |
| ९ | शिखरिणी. |
| १०–१५ | आर्या. |
| १६ | स्रग्धरा. |
| १७ | आर्या. |
| १८ | स्रग्धरा. |
| १९ | आर्या. |

अध्याय ७.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | उपजाति. |
| २–३ | आर्या. |
| ४ | अनुष्टुभ्. |
| ५ | स्रग्धरा. |
| ६ | पृथ्वी. |
| ७ | हरिणी. |
| ८ | वसंततिलका. |
| ९ | अनुष्टुभ्. |
| १०–११ | शार्दूलविक्रीडित. |
| १२ | स्रग्धरा. |
| १३–१४ | शार्दूलविक्रीडित. |
| १५ | आर्या. |
| १६ | वसंततिलका. |
| १७–२० | शार्दूलविक्रीडित. |
| २१ | आर्या. |
| २२ | स्रग्धरा. |
| २३–२४ | शार्दूलविक्रीडित. |
| २५ | आर्या. |

अध्याय ८.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | स्रग्धरा. |
| २ | मत्तमातंगलीलाकर दंडकवृत्त. |
| ३ | वसंततिलका. |
| ४ | पुष्पिताग्रा. |
| ५ | वसंततिलका. |
| ६ | शार्दूलविक्रीडित. |
| ७ | आर्यागीति. |
| ८ | आर्या. |
| ९ | इंद्रवज्रा. |
| १० | उपजाति. |
| ११ | उपेंद्रवज्रा. |
| १२ | अनुष्टुभ् |
| १३ | उपेंद्रवज्रा. |
| १४ | इंद्रवज्रा |
| १५–१६ | वियोगिनी. |
| १७ | उपजाति. |
| १८–१९ | हरिणी. |
| २० | अनुष्टुभ्. |
| २१ | स्रग्धरा. |
| २२ | पुष्पिताग्रा. |
| २३ | पंचचामर. |
| २४ | मंदाक्रांता. |
| २५ | मयूरी. |
| २६–२७ | उपजाति. |
| २८ | आर्या. |
| २९–३१ | स्रग्धरा. |
| ३२–३६ | शार्दूलविक्रीडित. |
| ३७ | शालिनी. |
| ३८ | आर्या. |

अध्याय ९.

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| १ | स्रग्धरा. |
| २–३ | प्रहर्षिणी. |
| ४ | मयूरक. |
| ५ | शार्दूलविक्रीडित. |
| ६ | विबुधप्रिया. |
| ७ | प्रहर्षिणी |
| ८ | आर्या. |

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| ९–१० | शार्दूलविक्रीडित. |
| ११ | हरिणी. |
| १२ | शार्दूलविक्रीडित. |
| १३–१३अ | अनुष्टुभ्. |
| १४ | स्रग्धरा. |
| १५–१७ | शार्दूलविक्रीडित. |
| १८ | अनुष्टुभ्. |
| १९ | आर्या. |
| **अध्याय १०.** | |
| १–२ | शार्दूलविक्रीडित. |
| ३–४ | आर्या. |
| ५–६ | शार्दूलविक्रीडित. |
| ७ | स्रग्धरा. |
| ८ | शिखरिणी. |
| ९ | पृथ्वी. |
| १० | शार्दूलविक्रीडित. |
| ११ | स्रग्धरा. |
| १२ | शार्दूलविक्रीडित. |
| १३ | आर्या. |
| १४–१६ | शार्दूलविक्रीडित. |
| १७ | आर्या. |
| १८ | उपजाति. |
| १९ | आर्या. |
| **अध्याय ११.** | |
| १–२ | स्रग्धरा. |
| ३ | पृथ्वी. |
| ४–५ | स्रग्धरा. |
| ६ | शार्दूलविक्रीडित. |
| ७ | स्रग्धरा. |
| ८–१० | शार्दूलविक्रीडित. |
| ११ | पृथ्वी. |
| १२ | आर्या. |
| **अध्याय १२.** | |
| १–२ | शार्दूलविक्रीडित. |
| ३–८ | आर्या |
| ९ | आर्यागीति. |
| १०–१५ | आर्या. |
| १६–१९ | शार्दूलविक्रीडित. |
| २० | पृथ्वी. |
| २१–२२ | आर्या. |

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| २३–२५ | शार्दूलविक्रीडित. |
| २६–३२ | आर्या. |
| ३३–३४ | शार्दूलविक्रीडित. |
| ३५ | स्रग्धरा. |
| ३६ | शार्दूलविक्रीडित. |
| ३७ | स्रग्धरा. |
| ३८–४० | शार्दूलविक्रीडित. |
| ४१ | वसंततिलका. |
| ४२ | स्रग्धरा. |
| ४३ | आर्या. |
| ४४ | आर्या. |
| **अध्याय १३.** | |
| १ | आर्या |
| २ | शिखरिणी. |
| ३ | रथोद्धता. |
| ४ | आर्या. |
| ५–८ | स्वागता. |
| ९–१० | वसंततिलका. |
| ११ | शार्दूलविक्रीडित. |
| १२ | आर्या. |
| १३ | अनुष्टुभ्.. |
| १४–१५ | पृथ्वी. |
| १६–१७ | आर्या. |
| १८–१९ | स्रग्धरा. |
| २० | अनुष्टुभ्. |
| २१ | उपजाति. |
| २२ | इंद्रवज्रा. |
| २३–२५ | शार्दूलविक्रीडित. |
| २६ | इंद्रवज्रा. |
| २७ | उपेंद्रवज्रा. |
| २८–२९ | शार्दूलविक्रीडित. |
| ३० | अमृतध्वनि. |
| ३१ | शार्दूलविक्रीडित. |
| ३२–३३ | स्वागता. |
| ३४ | शार्दूलविक्रीडित. |
| ३५ | मंदाक्रांता. |
| ३६–३७ | पृथ्वी. |
| ३८–३९ | शार्दूलविक्रीडित. |
| ४०–४१ | आर्या. |
| ४२ | वसंततिलका. |

| पद्यांक | वृत्तनाम. |
|---|---|
| ४३ | इंद्रवज्रा. |
| ४४–४५ | आर्या. |
| ४६ | वसंततिलका. |
| ४७ | स्रग्धरा. |
| ४८ | शार्दूलविक्रीडीत. |
| ४९–५० | स्रग्धरा. |
| ५१ | पृथ्वी. |
| ५२ | अनुष्टुभ्. |
| ५३ | शार्दूलविक्रीडित. |
| ५४ | वसंततिलका. |
| ५५ | आर्यागीति. |
| ५६ | शार्दूलविक्रीडित. |
| ५७–५८ | आर्या. |
| ५९ | द्रुतविलंबित. |
| ६० | स्रग्धरा. |
| ६१–६२ | पंचचामर. |
| ६३ | मंदाक्रांता. |
| ६४ | स्रग्धरा. |
| ६५–६६ | शार्दूलविक्रीडित. |
| ६७ | स्रग्धरा. |
| ६८ | शार्दूलविक्रीडित. |
| ६९ | स्रग्धरा. |
| ७०–७१ | आर्या. |
| ७२ | स्रग्धरा. |
| ७३ | उपजाति. |
| ७४ | अनुष्टुभ्. |
| ७५ | आर्या. |
| ७६ | उपजाति. |
| ७७ | शिखरिणी. |
| ७८ | शार्दूलविक्रीडित. |
| ७९ | वसंततिलका. |
| ८०–८२ | शार्दूलविक्रीडित. |
| ८३ | इंद्रवंशा. |
| ८४–८६ | स्रग्धरा. |
| ८७–८८ | अमृतध्वनि. |
| ८९–९० | स्रग्धरा. |
| ९१–९२ | शार्दूलविक्रीडित. |
| ९३ | आर्या. |

एकूण पद्यें ५०९.

समाप्त.

## मोरोपंतकृत

# प्रल्हादविजय.

### आर्यागीतिवृत्तें.

प्रल्हादविजयो नाम ग्रंथोयं स्वस्तरुः सतां ॥
भवतु श्रीशकृपया मनः संकल्पसिद्धये ॥ १ ॥

श्रीमत्प्रल्हादाची लीला गावी खनी सदाल्हादाची ॥
हरिचरणीं अनिश मन स्थापुनि करिते भवानळांचें शमनें ॥ १ ॥
कश्यपमुनिची दारा दिति दक्षसुता प्रसिद्ध परमोदारा ॥
तत्सुत हिरण्यकशिपु ब्रह्मवरें होय मत्त तो देवरिपु ॥ २ ॥
पीडी तो मंद रसा वैरिबळीं होय सागरीं मंदरसा ॥
करुनि बळें समरांशी पाडी शवशत्रुच्या नगांसम राशी ॥ ३ ॥
नरवीर्यतिमिरतरणी अमरांला ही करी पराभूत रणीं ॥
जिंकोनि शतक्रतुला आणी त्याच्या यशोमृता तक्रतुला ॥ ४ ॥
असुरप राजयशातें हरि माजे शत्रुच्या पराजयशातें ॥
आठ हि दिग्धिप दमुनी त्रस्त करी सर्व सत्समाधिपद मुनी ॥ ५ ॥
पीत सुरारस कलहा करुनि सेवी सुराधिकार सकल हा ॥
फिरती सुर मानवसे स्वांशीं त्यांच्या पदीं विजयमान वसे ॥ ६ ॥
सेवी क्रतुभाग जसा सुर माजे धरुनि कामलोभा गजसा ॥
करुनि उपायनयातें अहि देती रत्नमय उपायनें यातें ॥ ७ ॥

---

१ बृहद्दशमाचे पहिले ५४ अध्याय ज्या आर्यागीति वृत्तांत रचिले आहेत त्याच वृत्तांत या प्रकरणाचे चार ही विजय पंतांनीं लिहिले आहेत.

२ या ग्रंथाचा उल्लेख नामरसायनांत कवीनें येणेंप्रमाणें केला आहे:—

श्रीमद्विष्णुपुराणीं पाहुनि अत्यंत आदरें रचिला ।
प्रल्हादविजयनाम ग्रंथ पहा नग चि मणिगणीं खचिला. ॥ १०५ ॥

३ स्वस्तरु=कल्पतरु. ४ खनी=खाण. ५ सदाल्हादाची=उत्तम आनंदाची. ६ भवानळ=संसाराग्नि. ७ शमन=नाश. ८ दारा=स्त्री. ९ मंद=मूढ. १० रसा=पृथ्वी. ११ समर=युद्ध. १२ नगासम=डोंगरा एवढ्या. १३ नरवीर्यतिमिरतरणी=नरशौर्यनाशक. १४ अमर=देव. १५ पराभूत=पराजित. १६ शतक्रतु=इंद्र. १७ तक्रतुला=ताकाची उपमा. १८ दिग्धिप=दिशांचे स्वामी. पूर्वेचा इंद्र, पश्चिमेचा वरुण, दक्षिणेचा यम, उत्तरेचा सोम किंवा कुबेर, ईशान्येचा ईशान, आग्नेयीचा अग्नि, नैर्ऋत्येचा निर्ऋति, वायव्येचा वायु. १९ विजयमान=विजयी. २० क्रतु=यज्ञ. २१ अहि=सर्प. २२ उपायन=नजराणा.

शक्र वसु रवि प्रबळें दमिले हरिलीं च अन्यसुरविप्रबळें ॥
केलें भुवन वश रण-त्रासें मग येति देवमानव शरण ॥ ८ ॥
जें कांहीं रुचिरें[२३] जनीं तें घे तच्छक्ति शत्रुखररुचिरजनी[२४] ॥
कीर्ति हरी विश्वाची सेवी रंभा तिलोत्तमा विश्वाची ॥ ९ ॥
नरलोकामरसहित त्रिजगीं मानी कुबुद्धि कामरस हित ॥
सेवी बहु विषयांतें वाटे अमृतासमान तें विष यातें ॥ १० ॥
सेवी स्फटिकगृहाला समधिष्ठुनि एकदा महासुर हालीं[२५] ॥
कामविनोदभ्रमदा मदिरीं[२६] त्तत्प्रकृतिहानि ते दभ्रमदीं[२७] ॥ ११ ॥
रंभा सुभगीं नाचे रस घे गंधर्वराजशुभगानाचे ॥
करुनि सभाजनें[२९] सारा[३०] तत्कीर्ति चि गाय तो सभाजन[३१] सारा[३२] ॥ १२ ॥
तेथें कंद नयांचा[३३] आला प्रल्हादनाम नंदन[३४] याचा ॥
नृप-वचनें ज्या शिकवी ज्ञान करें नित्य बाळपाठाशि कवी ॥ १३ ॥
जो गर्भीं निजला भें धरुनि तेथें चि नारदें निजलाभें ॥
बोधुनि केला जागा धरिला ज्याच्या मनें मुकुंदीं जागीं[३५] ॥ १४ ॥
तो कवि[३६] सुतपा[३७] दास प्रभुचा धरि कश्यपार्षिसुत[३८]पादास ॥
तो आलिंगनदानें तातें केला सुखी प्रमोदनदीनें[३९] ॥ १५ ॥
त्यासि ह्मणे राजवर प्राज्ञा पढलासि गुरुगृहीं आजवर ॥
तेथें वत्सा गमला पदार्थ जो सारभूत तो सांग मला ॥ १६ ॥
पुसतां ऐसें दितिजें वर्णी प्रल्हाद असुरजन निंदिति जें ॥
ताता हरिला गावें संतत तत्पादसेवना लागावें ॥ १७ ॥
लागावें या वाटे हें चि सदा सारभूत हृदया वाटे ॥
ज्यासि न आदि न निधन[४०] स्मरतों गातों सदैव तें ज्ञानिधन[४१] ॥ १८ ॥
ऐसें जेव्हां कथिलें तों पोळे कर्ण[४२] जेंवि कढत्या कथिलें ॥
दितिजें ज्ञानानयनें क्रोधें केलीं अनूरुवर्णें[४३] नयनें ॥ १९ ॥
पुत्राध्यापक[४४]वदना पाहोनि म्हणे अरे सुदुर्मतिसदना[४५] ॥
बाळक रिपुच्या भजनीं लावुनि संपादिला बरा लाभ जनीं ॥ २० ॥

---

२३ रुचिर=सुंदर. २४ शत्रुखररुचिरजनी=शत्रुरूपी सूर्याला रात्रीसारखा. २५ हाला=मद्य. २६ मदिरा=मद्य. २७ दभ्रमदा=थोडा मद आणणारी. २८ सुभगा=सुंदर. २९ सभाजन=पूजन. ३० सारा=उत्तमा. ३१ सभाजन=सभेंतील लोक. ३२ सारा=सर्व. ३३ नय=नीति. ३४ नंदन=पुत्र. ३५ जागा=आश्रय. ३६ कवि=ज्ञानी. ३७ सुतपा=तपस्वी. ३८ कश्यपार्षिसुत=हिरण्यकशिपु. ३९ प्रमोदनद=आनंदाचा प्रवाह. ४० निधन=मरण. ४१ ज्ञानिधन=ज्ञात्यांची दौलत. ४२ कर्ण=कान. ४३ अनूरुवर्ण=ज्याला मांड्या नाहींत असा जो अरुण ( अनूरु ) त्याच्या रंगासारखीं लाल. ४४ अध्यापक=गुरु. ४५ सदन=गृह.

वधिलें माझ्या भावा तद्भजनीं लाविलें सुताच्या भावा[४६] ॥
याणें रिपुला गोंवें भला भला ज्ञान काय हें सांगावें ॥ २१ ॥
ऐकुनि म्याला गुरु तें मग विनवी कोपसर्पकालागुरु[४७]तें ॥
देवा न करीं क्रोध स्वामी हा मी नसे चि केला बोध ॥ २२ ॥
भूप म्हणे रे बाळा वद कोणीं शिकविलें असें हें बाळा ॥
गुरु म्हणतो मी नाहीं कथिलें तूं सांग सत्य निज वचनांहीं ॥ २३ ॥
प्रल्हाद ह्मणे हृदयस्थित परमात्मा चि मुख्य शास्ता सदय ॥
त्याविण कोणा कवणें मज इतराला हि आत्मतत्व शिकवणें ॥ २४ ॥
हृदयीं विष्णु जनाच्या तो मार्गीं लावितो स्वपदभजनाच्या ॥
त्याचा प्रसाद मजला झाला म्हणवूनि हा स्वलाभ समजला ॥ २५ ॥
दितिज म्हणे रे कुमती भ्रांति तुझ्या मानसांत दुष्टा रमती ॥
जगदीश प्रभविष्णु प्रभु मी कैंचा मदन्य मूढा विष्णु ॥ २६ ॥
प्रल्हाद ह्मणे तातें ऐकावें करुनि सुस्थिर स्वांतीं[४८]तें ॥
जो कारण[४९] विश्वास[५०] स्वयें हि जो विश्व जेथ मुनिविश्वास[५१] ॥ २७ ॥
शब्दागोचर[५२] ज्याचें पद न तमस्थान जें न सत्वरजाचें ॥
तो परमेश्वर विष्णु त्रिजगन्नाथ स्वभक्तबाधाजिष्णु[५३] ॥ २८ ॥
नृपति म्हणे मी असतां परमेश्वर अन्य कोण तुझा असता ॥
या चारें[५४] मरशील त्यागावें हें समस्त पामरशील[५५] ॥ २९ ॥
प्रल्हाद म्हणे जनका होतोसि व्यर्थ कोपमळभाजन[५६] कां ॥
माझा चि नव्हे धाता[५७] तुझा हि परमेश्वर त्रिलोकविधाता[५८] ॥ ३० ॥
आयकतां अशि वाणी हृदया लागे खळाचिया असिवाणी[५९] ॥
चावी दांत कर कर क्रोधें चोळी रिपुप्रणाशि[६०]कर कर ॥ ३१ ॥
कोण कुबुद्धिप्रकर[६१] प्रवेशला याचिया मनीं घातकर ॥
लोटुनि सन्मति परती[६२] कोणीं केला किशोर[६३] हा पापरती[६४] ॥ ३२ ॥
करितो वेडे चार भ्रमला हा जाहला खरा संचार[६५] ॥

४६ भाव=श्रद्धा. ४७ कोपसर्पकालागुरु=कोपरूपी सर्पाला चंदनासारखा आवडणारा. ह्म० अति कोपप्रिय ( कोपी ). ४८ स्वांत=चित्त. ४९ कारण=उत्पत्तिकर्ता. ५० विश्व=सर्व वस्तु. ५१ विश्वास=भरंवसा. ५२ शब्दागोचर=शब्दांनीं अवर्णनीय. ५३ जिष्णु=जिंकणारा, नाशकर्त्ता. ५४ चार=चाळे. ५५ पामरशील=नीच स्वभाव. ५६ भाजन=स्थान. ५७ धाता=उत्पन्नकर्त्ता. ५८ विधाता=उत्पन्नकर्त्ता. ५९ असिवाणी=तरवारी सारखा. ६० प्रणाश=नाश. ६१ प्रकर=समूह. ६२ परती=एकीकडे. ६३ किशोर=बालक. ६४ पापरती=पापप्रिय. ६५ संचार=भूतबाधा.

वदतो अनुचित सारें निघती वाक्यें मुखांतुनी निःसारें ॥ ३३ ॥
हें वदतां जनकानें ऐके तो विष्णुभक्तिभाजन कानें ॥
नमुनि म्हणे परिसा हो मन तूझें कटुक मानितें परिसा हो ॥ ३४ ॥
माझे चि हृदयकमळ प्रवेशला तो नसे चि गतशोकमळ[66] ॥
मज तुज जनास विष्णु व्यापुनियां चेष्टवीतसे भ्राजिष्णु[67] ॥ ३५ ॥
आधी भ्रम मधुपानें[68] त्यांत हि हरिपादनीररुहमधुपानें[69] ॥
सत्वान्यगुणप्रकृती[70] कोपविला ज्यास भीति सुर विप्र कृती ॥ ३६ ॥
कोपानळांत काढा होऊनि म्हणे खळासि येथुनि काढा ॥
केली क्षमा उदंडा गुरुकरवीं यासि बुद्धि शिकवा दंडा[71] ॥ ३७ ॥
त्या दैत्यांहीं ज्ञानी नेला गुरुच्या गृहीं अतत्वज्ञांनीं[72] ॥
तो अध्यापकशाला सेवी साधू धरील ताप कशाला ॥ ३८ ॥
तेथें पढे अनवरत[73] स्वोपाध्यायोक्त शास्त्र अनवरत[74]
अन्य जना परि चर्या[75] दावी गुरुची करी सदा परिचर्या[76] ॥ ३९ ॥
त्यावर बहु काळानें नंदन बोलाविला असुरपाळानें ॥
प्रऱ्हाद हि तातपदें वंदी भावें करूनि आहिततापदें[77] ॥ ४० ॥
आत्मकुमारा जवळी स्थापूनि असें म्हणे असुरराज बळी ॥
गा वत्सा गाथा[78] रे जेथें माझें स्वचित्त सुभगा थारे ॥ ४१ ॥
ऐशी आज्ञा तातें करितां जोडूनि हस्तजलजातें[79] ॥
प्रेमें करूनि वाचे प्रल्हाद म्हणे स्मरोनि पद देवाचें ॥ ४२ ॥
जेथुनि पुरुष[80] प्रकृती[81] स्थिर चर जो सर्वदा दयार्द्रप्रकृती ॥
जो वरद रमावर[82] हो तो विष्णु सदा प्रसन्न आम्हावर हो ॥ ४३ ॥
या गाथेच्या श्रवणें पावे तो दुःख तें वदावें कवणें ॥
पेटे अमर्षदावें[83] वांछी सत्पुत्रनाश काय वदा वदावें ॥ ४४ ॥
दैत्यांसि म्हणे मारा विलंब न करूनियां कुबुद्धि कुमारा ॥
खरशस्त्रसमूहांनीं[84] छेदा हा वांछितो कुळाची हानी ॥ ४५ ॥

---

६६ गतशोकमळ=गेला आहे शोकरूपी मळ ज्याचा असा. ६७ भ्राजिष्णु=तेजस्वी. ६८ मधुपान=मद्यप्राशन. ६९ हरिपादनीररुहमधुप=हरीच्या पदकमलाचे ठायीं रमणारा प्रऱ्हाद. ७० सत्वान्यगुणप्रकृति=रजस्तमोगुणयुक्त आहे प्रकृति ज्याची असा. ७१ दंडा=मारा. ७२ अतत्वज्ञ=तत्त्व न जाणणारे. ७३ अनवरत=निरंतर. ७४ अ-नव-रत=पुराण पुरुषाचे ठायीं रमलेला प्रल्हाद. ७५ चर्या=वागणूक. ७६ परिचर्या=सेवा. ७७ आहित-आ-तप-द=शत्रुतापद. ७८ गाथा=कविता. ७९ हस्त-जल-जात=करकमल. ८० पुरुष=आत्मा. ८१ प्रकृति=सृष्टि. ८२ रमा-वर=लक्ष्मीपति. ८३ अमर्ष-दाव=क्रोधाग्नि. ८४ खर=तीष्ण.

आहार नवा चावा स्वकुळांगार[85] क्षणार्ध ही न वांचावा ॥
मत्कुलमालिन्या या आज्ञा माझी तुम्हासि झाली न्याया ॥ ४६ ॥
तेव्हां दानव हे ती आज्ञा घेवूनि काढिती नव हेती[86] ॥
पाहुनि खर तरवारी ये सज्जनलोचनासि बहुतर वारीं[87] ॥ ४७ ॥
स्वस्थ प्रल्हाद मनीं यद्यपि ते सर्व सिद्ध झाले दमनीं[88] ॥
देहीं आत्माजगर[89] व्यर्थ चि शस्त्रास्त्र-काळअहिराज-गर[90] ॥ ४८ ॥
घेउनि शस्त्रप्रकरा[91] उचलिती जेधवां रिपु क्षिप्रे[92] करा[93] ॥
प्रल्हाद म्हणे शमना[94] करा सुखें हर्षवा धराधीशमना[95] ॥ ४९ ॥
शस्त्रसमूहामाजी तुम्हांत मदंतरीं हरी हे माजी[96] ॥
वाणी असेल साची तरि देह छेदितां तगेल असाची ॥ ५० ॥
हें ऐकुनि एकामें[97] करिती शूर प्रहार मारणकामें[98] ॥
नीरदें[99] बहुतर वारी वर्षे तैशा च भासती तरवारी ॥ ५१ ॥
तरवारी खरधारा वर्षति बहु जेंवि वारिदांच्या[100] धारा ॥
होती शब्द खणखण व्योमीं[1] उडती तुटोनि खंड सणसण ॥ ५२ ॥
अच्युतदेहत्राणा[2] धरितां शस्त्रे विनाश कैंचा प्राणा ॥
झाला न लोमें[3] भंग त्राता ऐसाचि साधुचा श्रीरंग ॥ ५३ ॥
विष्णुस्मरणोपधिला धरितां वज्रें न काळदंडें वधिला ॥
प्राकृतें[4] शस्त्रें काय प्रल्हादाचा सुरम्य झाला काय ॥ ५४ ॥
राय म्हणे रे परत द्वेषिस्तुतिपासुनी[5] न हो पापरत ॥
देतों मी अभय तुला मूढ-मतीची किमर्थ धरितोसि तुला[6] ॥ ५५ ॥
ऐशी असुरपतीची वाणी ऐके कुबुद्धिची सुपतीची ॥
सन्मतिनिधिवैश्रवण[7] प्रल्हाद म्हणे पित्या करावें श्रवण ॥ ५६ ॥
भयहर अनंत राया हृदयीं असतां भवांबुराशि[8] तराया ॥
मज कैंची भीति जनीं मत्त्राणीं[9] जागरूक तो दिनरजनी[10] ॥ ५७ ॥
भवभय हरिपदनखरें[11] त्रात[12] जमीं होय लेश तापद न खरें ॥

---

८५ कुलांगार=कुलकलंक. ८६ हेती=तरवारी. ८७ वारी=पाणी. ८८ दमन=मर्दन. ८९ आत्मा-अजगर=आत्मरूपी सर्प. ९० गर=विष. ९१ प्रकर=समूह. ९२ क्षिप्र=सत्वर. ९३ कर=हात. ९४ शमन=मर्दन. ९५ धराधीश=राजा. ९६ माजी=माझी. ९७ एकामें=एकदम. ९८ मारण-काम=मारण्याची इच्छा. ९९ नीर-द=मेघ. १०० वारि-द=मेघ. १ व्योम=आकाश. २ अच्युत-देह-त्राण=विष्णुरूपी चिलखत. ३ लोम=रोम, केंस. ४ प्राकृत=साधारण. ५ द्वेषिस्तुति=शत्रूचा स्तव. ६ तुला=उपमा. ७ सन्मति-निधि-वैश्रवण=सन्मतिरूप ठेव्याचा कुबेर. ८ भव-अंबु-राशि=संसार-सागर. ९ त्राण=रक्षण. १० दिनरजनी=दिवसरात्र. ११ नखर=नख. १२ त्रात=रक्षित.

अभयद केशव कमला-वर[13] विष्णु जगन्निवास तो एक मला ॥ ५८ ॥
भेद जिहीं न दवाडिला त्यांला तृण तें हि होय भयनद वडिला ॥
भवतिमिरमहारविला[14] न भजोनि तिहीं स्वलाभमाणि हारविला ॥ ५९ ॥
हा बुधमुक्ताहार[15] ज्ञानिजनाचा यथेष्ट अमृताहार[16] ॥
झाला पविप्रहार[17] त्रिदशरिपुला[18] स्वनंदनव्याहार[19] ॥ ६० ॥
बोलावी नृप सर्प श्राद्धपतीचे[20] चि काय ते अपसर्प* ॥
त्यांसि ह्मणे धृतदर्प[21] स्वसुत वधावा शिवें जसा कंदर्प[22] ॥ ६१ ॥
चावा पापडसा रे नक्षीं तुम्हासि लेश पाप डसा रे ॥
ऐसे ते अहि[23] तातें नियोजिले[24] नंदनाचिया अहितातें ॥ ६२ ॥
मग त्या मरुदशनांहीं[25] त्याचा सुकुमार देह गुरुदशनांहीं[26] ॥
सारा ही कवळीला तों भंग घडे रदांचियां[27] कवळीला ॥ ६३ ॥
श्रीहरिचरणाचि रती ते तनु न तुटे भुजंगमफणा[28] चिरती ॥
मणि फुटती जशि लाही भस्म करी ते क्षणांत तेज शिलांहीं ॥ ६४ ॥
ऐशा संतापाशीं पावुनि जाऊनि त्या असंतोपाशीं[29] ॥
ते अहि वंदिति जाला वृत्तांत निवेदुनि स्वयें दितिजाला[30] ॥ ६५ ॥
तो खळ पापाचारी दिग्गज ही टाकुनी त्रपा[31] पाचारी[32] ॥
मारा दंताघातें म्हणे न पावाल हो तदंता घातें ॥ ६६ ॥
दिग्गज विगतनयाला[33] दितिजाला नमुनि त्याचिया तनयाला ॥
पाडिति दंताघातें क्षितिवरि हरिचिंतनप्रशांताघातें[34] ॥ ६७ ॥
करिति करी[35] शतकोटी-प्रखररदांहीं[36] प्रहार ते शतकोटी[37] ॥
त्यांचे न कसे तुकडे होती याचें स्वचित्त भवसेतुकडे[38] ॥ ६८ ॥
त्या दानवदेवाचे[39] निज पद वंदूनि नंदन वदे वाचे ॥

---

१३ कमलावर=लक्ष्मी-पति. १४ भव-तिमिर-महा-रवि=संसाररूपी अंधकाराचा मोठा सूर्य ह्म० संसार नाशकर्त्ता. १५ बुधमुक्ता-हार=शहाण्यांस मोत्यांचे हारासारखा. १६ अमृत-आहार=अमृताचें भोजन. १७ पवि-प्रहार=वज्राचा तडाखा. १८ त्रि-दश-रिपु=देवांचा शत्रु. १९ स्व-नंदन-व्याहार=आपल्या पुत्राचें भाषण. २० श्राद्धपति=यम. २१ धृत-दर्प=गर्वी. २२ कंदर्प=मदन. २३ अहि=सर्प. २४ नियोजिले=आज्ञापिले. २५ मरुत+अशन=वायु भक्षक सर्प. २६ गुरु-दशन=मोठे चावे. २७ रद=दांत २८ भुजंगम-फणा=सापाची फडा. २९ असंतापाशीं=दुष्टाजवळ. ३० दिति-ज=दैत्य. ३१ त्रपा=लाज. ३२ पाचारी=बलावी. ३३ विगत-नय=अन्यायकर्त्ता. ३४ हरि-चिंतन-प्रशांत-अघ=देवाच्या स्मरणानें गेलें आहे पाप ज्याचें असा. ३५ करी=हत्ती. ३६ शतकोटी-प्रखर-रद=वज्रासारखे तीक्ष्ण दांत. ३७ शतकोटी=शंभर कोट. ३८ भव-सेतु=संसार सागर तरून जाण्याचा पूल. ३९ दानव-देव=राक्षस-राजा. * अपसर्प=हेर.

मी दिग्गजरद[४०]नांहीं न निमालों[४१] काय विष्णु पारद[४२] नाहीं ॥ ६९ ॥
दैत्य ह्मणे पापरता हो रे दुष्टा कुबुद्धिकूपा[४३] परता[४४] ॥
मरण जसें लाभसि तें करुनि समर्चीन[४५] शंकराला भसितें[४६] ॥ ७० ॥
दानवदेव कयास[४७] स्वयें करुनि बाहुनि स्वसेवक यांस ॥
मारायाचा शिकवी उपाय परि वारिती तथीं त्याशि कवी ॥ ७१ ॥
सेवक हो तनयाला होमा ज्वलनांत[४८] अन्य अंत न याला ॥
दहन[४९] चि जेविलें[५०] यातें पावो कुमती पतंग जेंवि लयातें ॥ ७२ ॥
हा बहुधा मायावी[५१] हे पीडा माझिया न धामा[५२] यावी ॥
या खळडिंभा[५३] जा रे घालुनियां शीघ्र लांकडीं भाजा रे ॥ ७३ ॥
आज्ञा हे निकरानें[५४] होतां ते भृत्य मग धरुनि करानें ॥
अमितइंधन[५५]भाराचिते मध्यें झाले स्वनाथडिंभा रचिते ॥ ७४ ॥
ते निर्दयमानस खा यातें ऐसें वदोनि पवमानसखा[५६] ॥
लाविति परि तो यासी धाके न शिवे तदा जसा तोयासी[५७] ॥ ७५ ॥
क्रोध तथापि तयाला न ये चि मग तो कथी कथा पितयाला ॥
विष्णुभजन तापाला हरितें ऐसें चि दैत्यजनता-पाला ॥ ७६ ॥
पद्मनिकरकरका[५८]हीं समास्तृता[५९] भू शिखी[६०] न खरकर[६१] कांहीं ॥
भासे मजला भजनीं हरिच्या सुख फार हा चि निज लाभ जनीं ॥७७॥
कविकायज[६२] मानातें वाढवुनी म्हणति ते स्वयजमानातें ॥
उचित तुज न कोपाया पुनरपि करितों सुबुद्धिजनकोपाया[६३] ॥ ७८ ॥
करुणाकंचुक[६४] तात त्यजिति न जरि लेंकुरें सदा चुकतात ॥
अनुकंपापात्रास[६५] स्वसुतास असा दिजे न भूपा त्रास ॥ ७९ ॥
न सुटे हरिपक्ष महा बोधें तरि मर्दनासि पाप क्षमें[६६] हा ॥
कृत्या[६७] मग माराया निर्मू हे युक्ति फार सुगमा राया ॥ ८० ॥
ऐकुनि या परि सारें वचनें त्यजि हें कुकर्म तदुपरि सारें ॥

---

४० रद=दांत. ४१ निमालों=मेलों. ४२ पार-द=पर तीरास पोंचविणारा. ४३ कूप=विहीर. ४४ परता=पलीकडे. ४५ समर्चीन=पूजीन. ४६ भसित=भस्म. ४७ कयास=बेत. ४८ ज्वलन=अग्नि. ४९ दहन=अग्नि. ५० जेविल=खाईल. ५१ मायावी=कपटी. ५२ धाम=घर. ५३ खळ-डिंभ=दुष्ट पोर. ५४ निकर=नेट. ५५ अमित-इंधन=पुष्कळ लांकडें. ५६ पवमान-सखा=वाऱ्याचा मित्र अग्नि. ५७ तोय=उदक. ५८ पद्म-निकर-करका=कमलांचा समूह व गारा ( करका ). ५९ समास्तृता=आंथरलेली. ६० शिखी=अग्नि. ६१ खर-कर=तीक्ष्ण ज्वालांचा. ६२ कवि-काय-ज=शुक्राचे पुत्र. ६३ सुबुद्धि-जनक-उपाय=चांगली बुद्धि उत्पन्न करणारा उपाय. ६४ करुणा कंचुक=कृपारूपी अंगरखा. ६५ अनुकंपा-पात्र=कृपेस योग्य. ६६ क्षम=समर्थ, योग्य. ६७ कृत्या=राक्षसी.

होय पुरोहित[68]सामीं शांत म्हणे बोध मानिला हितसा मी ॥ ८१ ॥
देउनि का[69]यज मानें पाठविलें विप्रनायकां यजमानें ॥
मग शुभमती शिकविती हरिभक्ति सुटावया कुबुद्धिशि कवि ती ॥ ८२ ॥
त्या सज्जनासि कवणें हरिभक्तिहूनि अन्य बुद्धि शिकवणें ॥
तिळ हि नसे परवा ची सांगे आ[70]चार्य म्हणुनियां प[71]रं वाची ॥ ८३ ॥
अध्ययनें[72]विराम यदा होय तदा बाळकांस हि निरा[73]मयदा ॥
चित्सुखहेतु[74]कं विद्या कथी म्हणे तो स्वकीय चित्त कवि द्या ॥ ८४ ॥
जो सद्रिपु[75]भस्म रणीं करि हरि त्याच्या धरूनि लोभ स्मरणीं ॥
संसृतिपारावा[76]रीं तरा अ[77]सद्वासना अपारा वारा ॥ ८५ ॥
ब्रह्म चि या विश्वास स्वमनीं जाणा धरूनियां विश्वास ॥
हरिचे चि सदा चरण ध्यावे टाकुनि सर्व असदा[78]चरण ॥ ८६ ॥
चिंता तें सत्वर जें तत्व नसे स्पर्शिलें तमःसत्वरजें ॥
जेथें शु[79]क्तिरज[80]तसा प्रपंच मिथ्या तडाग रविक[81]रज तसा ॥ ८७ ॥
तुम्हीं च सदा सहजें ब्रह्म असा नामरू[82]पभेदासह जें ॥
हें कळतां उपरमती संसृति विषयीं दिजे न याउपर मती ॥ ८८ ॥
नरपशु हे काम[83]रती धरूनि पावोनि जन्मशोका मरती ॥
द्रव्यास क[84]लत्रास ध्याती मग पावताति सकल त्रा[85]स ॥ ८९ ॥
मन तत्वीं द्या च वदा हरिगुण शिकणें किमर्थ विद्या चवदा ॥
कवि चतुरान[86]नसम जे मूढ चि ते ही जरि स्वतत्त्व न समजे ॥ ९० ॥
जरि हि ऐकाल टिका तरि हरिभजनीं धरा विवेका लटिका ॥
कालव्यय कां करितां स्वहित त्यजितां किमर्थ लोकां करितां ॥ ९१ ॥
या परि जगदीशाला चिंताया लाविली चि अगदीं शाला ॥
ज्ञानाचा राशि कवि प्रल्हाद मुलांसि सद्विचारा शिकवी ॥ ९२ ॥
तम नासुनि दैत्यपतोक[87]-रवी परमार्थसमागम तो करवी ॥

---

६८ पुरोहित-साम=पुरोहितांनीं केलेली समजूत. ६९ काय-ज=पुत्र. ७० आचार्य=गुरु. ७१ पर=परंतु. ७२ अध्ययन-विराम=शिकणें संपणें. ७३ निरामयद=परमेश्वर दाखविणारी ७४ चित्सुखहेतुक=ज्ञानसुख देणारी. ७५ सद्रिपुभस्म=साधुंच्या शत्रूंचा नाश. ७६ संसृति-पारावार=संसारसमुद्र. ७७ असत्-वासना=दुष्ट बुद्धि ७८ असत् आचरण=वाईट वर्तणूक. ७९ शुक्ति=शिंप. ८० रजत=रुपें. ८१ रवि-कर-जतडाग=सूर्यांचे किरणापासून उत्पन्न झालेला तलाव ह्म० मृगजलाचा तलाव. ८२ नामरूप-भेद-असह=ज्याला नांव व रूप यांच्या संबंधानें भिन्नता नाहीं. ८३ कामरती=मदनप्रीति. ८४ कलत्र=स्त्री. ८५ त्रास=दुःख. ८६ चतुरानन=ब्रह्मदेव. ८७ दैत्य-प-तोकरवि=दैत्यांच्या राजाचा बालक हाच सूर्य.

असुरात्मज सर्व उदारमती हरिच्या भजनीं च सदा रमती ॥ ९३ ॥

इति श्रीरामनंदनमयूरेश्वरकृतौ प्रल्हादविजये
प्रथमो विजयः
॥ १ ॥

---

गुरुच्या सदनीं चेष्टा प्रल्हाद अशी करी न जी नीचेष्टी[८८] ॥
ऐकुनि बहुधा कानें दानव दितिजास सांगती धाकानें ॥ १ ॥
लागे वार्ता सकळा दैत्यपतीला जशी गदार्तास कळा ॥
फोड चि कानीं झाला वृत्तांत न सोसवे क्षणीं राजाला ॥ २ ॥
करिन परासू[८९] दास स्वरिपूचा म्हणुनि तो त्वरा सूदास[९०] ॥
आणुनि एकांताला शिकवी यत्न स्वयें चि तोकांतीला[९१] ॥ ३ ॥
सांगति वर विप्र कृती तरि दुष्टाचि न होय बरवी प्रकृती ॥
करितो चि सदा चार स्वयें चि कथितो परांसि असदाचार ॥ ४ ॥
म्हणउनि भिल्ला माजी आज्ञा न करूनियां सदन्नामाजी[९२] ॥
घेउनि विष मारा जा सांगे ऐशी च युक्ति विषमा राजा ॥ ५ ॥
सूदानें विष यातें समर्पिलें विष्णुभजनजितविषयातें[९३] ॥
जो हृदयामाजि रवी विपत्तमाचा[९४] अनंत तो तें जिरवी ॥ ६ ॥
सूद तदा लवलाहें कथिती कुलदीप हा न मालवला हें ॥
दैत्य मनीं भ्रमला हे वार्ता ऐकूनि फार संभ्रम लाहे ॥ ७ ॥
राजा पुरोहितातें सांगे साधावया स्वकीय हितातें ॥
या दोषाकरकृत्या[९५] मारा निर्मूनियां भयंकर कृत्या ॥ ८ ॥
स्वपुरोहित सामानें करिती मग त्यास बोध हितसा मानें ॥
वत्सा सुख दे वडिला धरूनि त्याच्या मती पदीं आवडिला ॥ ९ ॥
कश्यपमुनिसंतान-प्रभव[९६] तुझा तात आप्तजनसंतान[९७] ॥
होतां पितृसमशीलें[९८] त्रिविष्टपीं[९९] तूं हि यापरी रमशील ॥ १० ॥
परम गुरू तुजा तात प्राज्ञ भले या चि सत्पथें जातात ॥

---

८८ नीच-इष्टा=नीचास आवडणारी. ८९ परासू=मृत. ९० सूद=सैपाकी. ९१ तोक-अंत=बालकाचें मरण. ९२ सत्+अन्न+माजी=उत्तम अन्नांत. ९३ विष्णु-भजन-जित विषय=विष्णूच्या भजनानें जिंकले आहेत विषय ज्यानें असा. ९४ विपत्-तम=संकटरूपी अंधकार. ९५ दोष-आकर-कृत्य=दोषांची खाणच अशीं आहेत कृत्यें ज्याचीं असा. ९६ कश्यप-मुनि-संतान-प्रभव=कश्यपाचा पुत्र हिरण्यकशिपु याचे पासून आहे उत्पत्ति ज्याची असा ( हे प्रल्हादा ). ९७ आप्त-जन-संतान=आप्त जनांचा कल्पवृक्ष. ९८ पितृसमशील=बापासारखा आहे स्वभाव ज्याचा. ९९ त्रिविष्टप=त्रैलोक्य.

लाभ अनंतें काय व्यर्थ न दीजे हटें यमातें काय ॥ ११ ॥
दितिजाच्या तोकानें आयकतां बोध या परी तो कानें ॥
करुनि स्मितें[100] नमनानें गुरु तोषविले तदा प्रसन्न मनानें ॥ १२ ॥
विनयें च वदे त्यांतें कुरसीं रसत्व चव देत्यांतें ॥
बरवा उपदेश मला करितां श्रम या चि धर्मवादें शमला ॥ १३ ॥
सत्य प्रिय हित सारें ऐकूनि तुमच्या पदांबुजीं[1] अळिसारें[2] ॥
मस्तक माझें लवलें परि हरिनें काय हें कसें बोलवलें ॥ १४ ॥
साधु पुरोहित माजे नुमजन सर्वज्ञ म्हणवुनी हित माजे ॥
सद्वृंद जया लवलें काय अनंतें असें कसें बोलवलें ॥ १५ ॥
तुह्मी गुरु नमनासी योग्य वदा जें चि आवडेल मनासी ॥
सर्वांहीं असुरजनीं बुद्धिविवेकक्षपाकरामा रजनी[3] ॥ १६ ॥
दितिजाशिशूची[4] वाणी लागे त्यांच्या श्रुतीसि[5] सूचीवाणी[6] ॥
धरुनी कोपा जळती गुरु ते जैसे घृतें शिखी[7] पाजळती[8] ॥ १७ ॥
गुरु ह्मणती तव रक्षा[9] अनळें[10] होतां वृथा चि केली रक्षा[11] ॥
हें ज्ञान नसे कळलें यास्तव तेव्हां कृपेसि मन आकळलें ॥ १८ ॥
मान्य बरा होशील स्वपित्याला हें तुझें न राहो शीलें[12] ॥
करवुनि अभ्यास कळा विद्या कथिल्या तुला असभ्या सकळा ॥ १९ ॥
तरि बापा मरशील त्यजिनासि जरी असें स्वपामर[13] शील ॥
माराया तुज कृत्या[14] करितों उत्पन्न आज भीकरकृत्या[15] ॥ २० ॥
प्रल्हाद वदे वाचे स्मरोनि पद दुःखदावदवदेवांचे[16] ॥
आत्मा त्राता[17] हंर्ता[18] सदसद्वृत्तें[19] तुम्हीं त्यजा चि अहंता[20] ॥ २१ ॥
या वचनें ते कृत्या निर्मिति साधूनियां यथाविधि कृत्या ॥
शूलधरा[21] कामगती[22] जाय वधायासि दितिज-तोकीं[23] मग ती ॥ २२ ॥
दितिजशिशूला घात क्षिप्र[24] घडाया करी स्वशूलाघात[25] ॥

---

१०० स्मित=हास्य. १ पदांबुज=पदकमळ. २ अळिसारें=भुंग्यासारखें. ३ रजनी=रात्र. ४ शिशु=बालक. ५ श्रुति=कान. ६ सूचीवाणी=सुईसारखी. ७ शिखी=अग्नि. ८ पाजळती=पेटती. ९ रक्षा=राख. १० अनळ=अग्नि. ११ रक्षा=रक्षण. १२शील=स्वभाव. १३ पामर=नीच. १४ कृत्या=राक्षसी. १५ भीकर-कृत्या=भयंकर आहे कृत्य जीचें अशी. १६ दुःख-दाव-दव-देव=दुःखरूपी अरण्याचा अग्नि त्या० नाशकर्ता असा देव. १७ त्राता=रक्षक. १८ हंता=मारक. १९ सत्-असत्-वृत्त=बरें वाईट कृत्य. २० अहंता=अहंकार. २१ शूलधरा=सूळ जीचेजवळ आहे अशी. २२ काम-गती=पाहिजे तिकडे जाण्याची शक्ति आहे जिला. २३ तोक=बालक. २४ क्षिप्र=सत्वर. २५ आघात=तडाखा.

हरिचिंतनचंचूरा[26] स्पर्श करीतां चि जाहलें तें चूरा ॥ २३ ॥
जो भक्तभवा संहरि तो हृदयीं ज्या असे करुनि वास हरी ॥
तेथें पावेल पवी[27] भंग असो शूल काळदंडा लपवी ॥ २४ ॥
कृत्या मग माघारी मुरडे कोपें जशी च खगमा[28] घारी ॥
होती विप्रसभा जी तीतें ते करुनि कुपित मानस भाजी ॥ २५ ॥
धरुनी भूतळ मळती होतां दाहव्यथा बहू तळमळती ॥
निष्पापा पाप डसे कसें स्वयें हे चि भाजले पापडसे ॥ २६ ॥
तेव्हां या संतापें[29] आली करुणा द्विजांचिया संतापें[30] ॥
पावे बहु तनु कंपा सर्वां भूतीं भल्यासि ये अनुकंपा[31] ॥ २७ ॥
त्याला कर लावि न ती प्रयुक्त भावें करी प्रभूला विनती ॥
हरिनें ते वांचविले नाहीं तरि लागते चि तेवां च विले[32] ॥ २८ ॥
ते सावध कवि झाले हरिदासस्पर्शनें चि ताप विझाले ॥
देती प्रल्हादातें आशीर्वादासि धरुनि आल्हादातें[33] ॥ २९ ॥
दीर्घायु कुमारा हो अप्रतिहत वीर्य कीर्ति महिमा राहो ॥
वृद्धि असो संततिला भुवनीं वर्णूत सर्वदा संत तिला ॥ ३० ॥
जन तूझ्या यशशीला गावू हांसो त्वदीय कीर्ति शशीला ॥
हे सुरगायक[34] लीला धरूत कंठीं करू विनाश कलीला ॥ ३१ ॥
उपकारविंचितक विप्र वर बहु देऊनि यास कविप्रवर ॥
कथिती दितिच्या तनया सकळ न पडे मग त्या अनयास कळ ॥ ३२ ॥

॥ इति श्रीरामनंदनमयूरेश्वरकृतौ प्रल्हाद-
विजये द्वितीयो विजयः ॥
॥ २ ॥

---

पूर्वकृतापाय[35] तथा ते कृत्या दुःसहा हि जाली वितथा[36] ॥
नाहीं नंदनशमनीं[37] उपाय म्हणुनी सचिंत दैत्येश मनीं ॥ १ ॥
तो देवरिपु त्रास स्वमनीं धरुनी असे पुसे पुत्रास ॥
मंत्रजनितसा[38] गमला प्रभाव कीं सहज हा सुता सांग मला ॥ २ ॥

---

२६ चंचूर=तत्पर. २७ पवि=वज्र. २८ खगमा=आकाशांत फिरणारी. २९ संतापें=साधूपाशीं. ३० संतापें=दुःखानें. ३१ अनुकंपा=कृपा. ३२ तेवां च विले (विल्हे) लागते=तेव्हां च नाश पावते. ३३ आल्हाद=आनंद. ३४ सुर–गायक=गंधर्व. ३५ पूर्व–कृत–अपाय=पूर्वी केलेली पीडा. ३६ वितथा=व्यर्थ. ३७ शमन=नाश. ३८ मंत्र–जनित=मंत्रापासून उत्पन्न झालेला.

मंत्रौषधी[३९]प्रभावें[४०] मृत्यु नसे आपुल्या च कीं अनुभावें[४१] ॥
हें पुत्रा वद साचें जें कांहीं बीज जीवनाध्वंसाचें[४२] ॥ ३ ॥
परिसुनियां त्या लपितीं[*] प्रल्हादें वंदिला त्रिदशकालें[४३] पिता ॥
मग कथिलें तें सारें ध्यावें जो पीडिला असे संसारें ॥ ४ ॥
मंत्रादिजनित शाया प्रभाव न समर्थ मृत्युसिंधु तराया ॥
मरण महा दुःसह जें तें कैसें लंघिजेल वीर्यें सहजें ॥ ५ ॥
जे लोक अनंतरती[४४] ते चि मरणजन्मसिंधु मध्यें तरती ॥
ज्यांच्या लोकेश मनीं शमनीं[४५] कैंचा प्रभाव त्यांच्या शमनीं[४६] ॥ ६ ॥
जे इंद्रियसंघाता[४७] जिकुनि न मनें ही चिंतिती परघाता ॥
त्यांचें आयुष्य हरी मग त्यांचे प्राण भूपते कोण हरी ॥ ७ ॥
मी तनुवचनमनांहीं[४८] परदुःखातें कदापि वांछित नाहीं ॥
अन्य जनीं मजमाजी[४९] एक हरी हे चि बुद्धि शाश्वत माजी[५०] ॥ ८ ॥
एक चि आत्मा सारा त्यजिली म्यां भेदकल्पना चि असारा ॥
हें अमृत ज्ञानिधन[५१] प्राप्त मला कां घडेल सुज्ञा निधन[५२] ॥ ९ ॥
भेद चि माझा शमला यास्तव नाहीं च सर्वथा नाश मला ॥
म्हणउनि हरी भजावा स्वपर असा भाव तो समूळ चि जावा ॥ १० ॥
प्रासादाच्या[५३] शिखरीं वाक्यें कथिलीं अशीं स्वताताशि खरीं ॥
तेव्हां दांत करारां चावी फिरवी सुरारि नेत्र गरारां ॥ ११ ॥
चोळुनि करें कराशी क्रोधाकुळ दानवेंद्र पातकराशी ॥
दैत्यारि पुरोगातें[५४] म्हणे वधा सूनुतें स्वरिपुरोगातें ॥ १२ ॥
देह न लेश तगावें याचें प्रासाद आमचा शत गांवें[५५] ॥
यापासुनि ढकला हो याच्या प्राणासि आज अंतकें[५६] लाहो ॥ १३ ॥
नरनाथाज्ञा साची मानुनि तो लोटिला तिहीं तैसा ची ॥
परि वरचेवर धात्री[५७] झेलुनि रक्षी सुतासि जैशी धात्री[५८] ॥ १४ ॥
तेथ हि मृत्यु पळाला द्रवें[५९] परि आला नसे चि त्या उपळाला[६०] ॥

---

३९ ओषधि=वनस्पति. ४० प्रभाव=शक्ति. ४१ अनुभाव=प्रभाव. ४२ जीवन–अ–ध्वंस=जिवाचा नाश न होणें. ४३ त्रिदश–काल=देवशत्रु. ४४ अनंत–रती=ईश्वराचे ठायीं आहे भक्ति ज्यांची असे. ४५ शमन=यम. ४६ शमन=नाश. ४७ संघात=समूह. ४८ तनु–वचन–मन=शरीर–शब्द–व मन. ४९ मजमाजी=माझ्या मध्यें. ५० माजी=माझी. ५१ ज्ञानिधन=ज्ञात्यांचें द्रव्य. ५२ निधन=मरण. ५३ प्रासाद=राजवाडा. ५४ पुरोग=जवळ उभे राहणारे सेवक. ५५ गांवें=योजनें. ५६ अंतक=यम. ५७ धात्री=पृथ्वी. ५८ धात्री=दाई. ५९ द्रव=पाझर. ६० उपळ=दगड. * लपित=भाषण.

टाकुनि सर्व हि माया[६१] नियोजवी शंबरासुराची माया ॥ १५ ॥
हे शंबरासुरा मीं केले बहु यत्न या कुपुत्रविरामीं[६२] ॥
परि न मरे हा पापी याचें असुदुग्ध[६३] तूं तरी बापा पी ॥ १६ ॥
शंबर बोले माजें वीर्य पहा न गणि सूर्य-वन्हि[६४]यमा जें ॥
असती बहुविध माया तूं स्वस्थ असें विनाशितों अधमा या ॥ १७ ॥
बोलुनि हें मायावी तो कपटें विष्णुसेवक शमाया वी[६५] ॥
चिंती प्रल्हाद मनीं जो पटु[६६] मधु-कैटभासुराच्या दमनीं ॥ १८ ॥
भक्तोपद्रवशमनें पाठविलें चक्र दीनभद्रवशमनें[६७] ॥
मायासहस्र-तम तें तेणें हरिलें क्षणें जगत्कांत मतें ॥ १९ ॥
जरि तडिदंबर[६८] माया[६९] करिल तरि काय काळ शंबरमायीं[७०] ॥
सर्वत्र सुजन सम जे त्यांसि नसे नाश हें कुबुद्धि न समजे ॥ २० ॥
करितो हा प्रतिघात[७१] प्रकटोपायें[७२] नसे चि या प्रति घात ॥
यास्तव गुप्त चि रिपुला माराया अन्य युक्ति योजी विपुला ॥ २१ ॥
संशोषक वायूतें सांगे शोषावया तनुभवायूतें[७३] ॥
तो मग शीतज्वरसा शिरे तदंगीं करावया शुष्क रसा ॥ २२ ॥
पवमानाचा आढळला विकार परि धैर्य पर्वत न हा ढळला ॥
धरणीधर[७४] आठविला तो त्याणें वायु सेवुनि आटविला ॥ २३ ॥
जीवनघस्मरविपदा[७५] हरूनि भक्तासि आपुल्या स्मरवि पदा ॥
कारुण्यनदीनांचें[७६] प्रभुचें व्रत हें चि जें अवन[७७] दीनाचें ॥ २४ ॥
प्रल्हाद स्वस्थ मनीं गेला गुरुच्या समीप विपदस्तमनीं[७८] ॥
तो अनुदिन याशि कवी शुक्रकृता राजनीति सारी शिकवी ॥ २५ ॥
स्वगुणें श्री बांधावी जीणे संपूर्ण राज्यतृष्णा धावी ॥
कीर्ति बरी साधावी ऐशी नृपनीति शीकला मेधावी[७९] ॥ २६ ॥
गुरु विज्ञातनयाला[८०] प्रल्हादाला सुरारिच्या तनयाला ॥
नेउनि याज्यापतितें[८१] भेटवि सुत शत्रु मानिला ज्या पतितें ॥ २७ ॥

---

६१ माया=दया. ६२ विराम=नाश. ६३ असुदुग्ध=प्राणरूपी दूध. ६४ वन्हि=अग्नि. ६५ वी=उत्पन्न करी. ६६ पटु=समर्थ. ६७ दीन-भद्र-वश-मन=गरीबाचें कल्याण करण्याविषयीं तयार आहे मन ज्याचें असा. ६८ तडित्-अंबर=विद्युल्लतेसारखें तेजस्वी आहे वस्त्र ज्याचें असा. ६९ माया=दया. ७० माया=कपट. ७१ प्रतिघात=उलट तडाखा. ७२ प्रकट=उघड. ७३ तनु-भव-आयु=पुत्राचें आयुष्य. ७४ धरणी-धर=शेष. ७५ जीवन-घस्मर-विपदा=जीवीत-नाशक-विपत्ति. ७६ नदी+इन=समुद्र. ७७ अवन=रक्षण. ७८ विपदस्तमनीं=संकट दूर झाल्यावर. ७९ मेधावी=शहाणा, बुद्धिमान्. ८० विज्ञातनय=जाणली आहे नीति ज्यानें असा. ८१ याज्या-पति=यजमान

जीणे श्री साधावी ते शिकला राजनीति हा मेधावी ॥
झाला शास्त्रीं वेदीं ऐसें आचार्य भूपतीसि निवेदी ॥ २८ ॥
भूप म्हणे प्रल्हादा विचारितों तें वदोनि दे आल्हादा ॥
हें सुनया सांगावें मित्रारिगणीं कसें नृपें वागावें ॥ २९ ॥
वद मध्यस्थां[८२]माजी वर्ताया नीतियुक्ति ही परमा जी ॥
वृद्धिक्षयसाम्य असे काळ तधीं भूपतीस नयें[८३] कोण असे ॥ ३० ॥
मंत्री अमात्य तनया वद कैसे सर्व वर्त्तवावे सुनया ॥
नीतिज्ञा बोलावें त्वां बाह्याभ्यंतरीं कसें चालावें ॥ ३१ ॥
जो तस्कर पुरलोकीं वर्त्तायाचा प्रकार ही वद तो कीं ॥
शंकित दुष्टांत कसें वागावें सांग पंडिताल्हादकसें ॥ ३२ ॥
कृत्याकृत्यविधानें वद गिरिजळविपिनें[८४]वासिजनसंधानें ॥
कंटकशोधनें[८५] कानें ऐकावें तें हि सांगणें तोकानें ॥ ३३ ॥
सामाद्युपाय सारे वद आहे अन्य नीतिमार्ग कसा रे ॥
प्रश्न असा जनकाचा ऐकुनि मानी मनांत सज्जन काचा ॥ ३४ ॥
प्रल्हाद म्हणे नीती सारी कथिली असे मला गुरूंनीं ती ॥
न पडावें या वाटे बापा ऐसें मनास माझ्या वाटे ॥ ३५ ॥
मित्रामित्रें[८६] असावे तेव्हां नीतिप्रकार सर्व पुसावे ॥
एक चि आत्मा साचा व्यर्थ श्रम कासया नयाभ्यासाचा ॥ ३६ ॥
तुज मज भूतांमाजी एक हरी सत्य गोष्टि ताता माजी ॥
अरिमित्रकथा राया कैंची स्थळ तीस कोणतें थाराया ॥ ३७ ॥
रागद्वेष[८७] उमटती जेथें हरिभक्ति मार्ग सारे सुटती ॥
हें टाकुनि जनकां[८८] मीं म्हणतों कीं यत्न साधिजे निष्कामीं ॥ ३८ ॥
जे चि अविद्या[८९] सारी भासे मूर्खांसि ते चि विद्येसारी[९०] ॥
बालिश खद्योतें[९१]तें अग्नि म्हणे जाणिजे तसें हें तातें ॥ ३९ ॥
तें कर्म जें न बाधे ते विद्या जीमुळें विमुक्ती साधे ॥
कर्म दुजें दुःखार्थ स्वामी विद्या दुजी तशी च अपार्थ[९२] ॥ ४० ॥
विषयरसप्रवणाला[९३] राज्यधनाची स्पृहा नसे कवणाला ॥
परि जें असतें भावी[९४] तें चि घडे मूढ हें न चित्तीं भावी[९५] ॥ ४१ ॥

---

८२ मध्यस्थ=उदासीन ( शत्रु नव्हेत व मित्रही नव्हेत असे लोक ). ८३ नय=नीति. ८४ विपिन=अरण्य. ८५ कंटकशोधन=शत्रु नाहींतसे करून टाकणें. ८६ अमित्र=शत्रु. ८७ राग=प्रीति. ८८ जनका=हे बापा. ८९ अविद्या=अज्ञान. ९० विद्येसारी=ज्ञानासारखी. ९१ खद्योत=काजवा. ९२ अपार्थ=व्यर्थ. ९३ प्रवण=अनुरक्त. ९४ भावी=होणारें. ९५ भावी=मानी.

साधाया राज्यधनें करितां उद्योग पावले किती निधनें[16] ॥
जें प्राप्त नसे कांहीं तें यत्नें साधिजे कसें लोकांहीं ॥ ४२ ॥
ज्यांला राज्य कराया शौर्यनयज्ञानलेश नाहीं राया ॥
ते ही भूपति होती जन्मांतरपुण्यपुंजफलगति हो ती ॥ ४३ ॥
श्रीकामें[17] याकरितां न करावा अळस पुण्यकर्म करितां ॥
यत्न समत्वीं करणें असेल जरि मानसांत मुक्तिस वरणें ॥ ४४ ॥
सुरनरखगमृगभुजगीं[18 99] एक चि आत्मा नसे चि भिन्न विभु जगीं ॥
हे मोक्षकरी समता भक्तभवध्वांतरविमुरारीस[100] मता ॥ ४५ ॥
आत्मत्वें जो सारें पाहे तो सोडिला चि या संसारें ॥
मग कैंचा क्लेश वसे ज्याला जन सर्व भासले केशवसे ॥ ४६ ॥
ऐशीं सुखजनक[1] वचें यमदंडाघातभीतसज्जनकवचें[2] ॥
तो विषयवसुरतरुची[3] न धरि कुमति साउली त्यजी सुरतरुची[4] ॥ ४७ ॥
तो असुरेश्वर चरणें ताडी हृदयीं सुतासि असदाचरणें ॥
सद्भाग्य सकळ हातें लोटुनि करी निशादिवस[5] कलहातें ॥ ४८ ॥
प्रकटाप्रकटोपाया[6] करि सत्सुतजीवनासि[7] आटोपाया ॥
परि न मरे चि रमेना[8] चिंती विषयांतरीं क्षणार्ध रमेना ॥ ४९ ॥
बोलुनियां स्वकरांतें दितिपुत्र म्हणे तदा निदेशकरांतें[9] ॥
बळ विप्रचित्त राहो मजला चिंतार्णवांतुनी[10] तारा हो ॥ ५० ॥
रमतो असाधु भजनीं असा चि निर्मोल मार्ग हा डिंभ[11] जनीं ॥
अहिपाशांहीं बांधा मग्न[12] करा सागरीं निवारा बाधा ॥ ५१ ॥
हे विप्रचित्त राहो न दुष्ट हा हे बळासुरा हे राहो[13] ॥
आतां त्वरा करा हो माझा संकल्प सर्वथैव खरा हो ॥ ५२ ॥
हे दितिजाची वाणी आवश्यक होय त्यांसि वेदावाणी ॥
सारे यथोक्तकारी[14] टाकिति सद्रत्न सागरांत भिकारी ॥ ५३ ॥
भूषण सुरांदिकांचें हरिभक्त चि रत्न मौक्तिकादिक कांचें ॥

---

१६ निधन=मरण. १७ श्री–काम=लक्ष्मीची इच्छा आहे ज्याला असा. १८ खग=पक्षी. ९९ भुजग=सर्प. १०० भक्त–भव–ध्वांत–रवि–मुरारी=भक्तांच्या संसाररूपी अंधकाराचा सूर्य म्ह० नाशकर्ता असा ईश्वर. १ जनक=उत्पादक. २ यम–दंड–आघात–भीत–सत्–जन–कवचें=यमाच्या सोट्याच्या तडाख्याला म्यालेले जे उत्तम लोक त्यांचें रक्षण करणारीं. ३ विषय–वसु–रत–रुची=विषयव द्रव्य यांची आहे आवड ज्याला असा. ४ सुरतरु=कल्पवृक्ष. ५ निशा=रात्र. ६ प्रकटाप्रकट=उघड व गुप्त. ७ जीवन=आयुष्य. ८ रमेन=( रमा+इन ) रमा–पति. ९ निदेशकर=सेवक. १० अर्णव=समुद्र. ११ डिंभ=पोर. १२ मग्न करा=बुडवा. १३ विप्रचित्त, बळ, व राहु हीं तीन सेवकांचीं नांवें आहेत. १४ यथोक्तकारी=राजानें सांगितल्याप्रमाणें करणारे.

त्याच्या लाभें साचा रत्नाकरें[15] जाहला चि पात्र रसांचा ॥ ५४ ॥
सुमधुर भवहर लीला पीतां शमवावयासि तापालीला[16] ॥
गळली शिशुची लाला तें चि अमृत लाधलें नदीपाळाला[17] ॥ ५५ ॥
हरिभक्तप्रल्हाद प्राप्तीनें होय सिंधुला आल्हाद ॥
जो चिंती बाळ हरी तो प्रेमें काय त्यासि येती लहरी[18] ॥ ५६ ॥
प्रल्हादासि खळ बळी टाकिति तो फार नीरराशि[19] खळबळी ॥
त्या पुष्करनाभरतें[20] स्वसुखानें आणिलें जडास[21] हि भरतें ॥ ५७ ॥
हरिपदभक्तविलास-द्वेषी खळ गांजिती उगेचि मुलास ॥
अक्षोभ्य जडप्रकृती[22] क्षोभे दीनामुळें चि दुःखित सुकृती ॥ ५८ ॥
कथिती दैत्य नृपातें नीरनिधि[23] क्षोभला किशोरनिपातें[24] ॥
त्यांसि म्हणे तो अदय त्रिदशाधिपशत्रु[25] वज्रसोदरहृदय[*] ॥ ५९ ॥
त्या दुर्मतिनगराशी[26] आच्छादा करुनियां वरी नगराशी[27] ॥
पर्वतभारें चिरडो निरुद्धनिःश्वास[28] आत्मदोषें चि रडो ॥ ६० ॥
कारितील मत्स्यमकर ग्रास तयासी करील कैसें क्षेम कर ॥
वर्षसहस्रें हि तरी मरेल होईल कोण जन तेथ तरी[29] ॥ ६१ ॥
दितिदनुसुत[30] अशि वाचा ऐकुनि घेती निदेशीं[31] त्या अशिवाचा[32] ॥
त्यावरि पर्वत रचिती केली त्या सागरीं विशालतर चिती[33] ॥ ६२ ॥
चिंती प्रल्हाद मना स्थिर करुनी तेथ भक्तबाधादमना[34] ॥
बंधन गिरिभारासी न गणुनियां संस्तवी महाभाराशी[35] ॥ ६३ ॥

## दंडकवृत्त.

जय जय जनकामकल्पद्रुमा मामनोधीश्वरा[36] वामना भद्रनामा[37] महर्षिस्तुता ॥
सकळदुरितजाळि[38] विच्छेदका काळविध्वंसका व्याळभक्ष्यासना[39] भाळदृक्सन्नुता[40] ॥

---

१५ रत्नाकर=समुद्र. १६ आली=पंक्ति. १७ नदीपाल=समुद्र. १८ लहरी=लाटा. १९ नीरराशि=समुद्र. २० पुष्कर-नाभ-रत=कमलासारखी नाभी आहे ज्याची अशा विष्णूचा भक्त. २१ जड=निर्जीव पक्षीं उदक. २२ जड प्रकृति=निर्जीव पक्षीं जलमय. २३ नीरनिधि=समुद्र. २४ किशोरनिपात=बालकनाश. २५ त्रिदश-अधिप-शत्रु=देवांचा स्वामी इंद्र याचा रिपु ( हिरण्यकशिपु ). * वज्रासारखें कठिण आहे हृदय ज्याचें असा. २६ दुर्मतिनगर=दुष्ट बुद्धीचें स्थान. २७ नगराशी=पर्वतांचे ढीग. २८ निरुद्धनिःश्वास=कोंडला आहे श्वास ज्याचा. २९ तरी=नौका. ३० दिति-दनु-सुत=दैत्य व दानव. ३१ निदेश=आज्ञा. ३२ अशिव=अकल्याण कारक हिरण्यकशिपु. ३३ चिती=रास. ३४ भक्तबाधादमन=भक्तसंकटहर्ता. ३५ महाभाराशि=मोठ्या तेजाचा पुंज ( विष्णु ). ३६ मामनोधीश्वर=लक्ष्मीच्या मनाचा स्वामी. ३७ भद्रनाम=कल्याण कारक आहे नाम ज्याचें. ३८ सकलदुरितजालविच्छेदक=सर्व पापरूपी जाळें तोडणारा. ३९ व्याळभक्ष्यासन=गरुडवाहन. ४० भाळदृक्सन्नुत=शिवस्तुत.

ज्ञातधृतिसुरवा[४१]सवाराध्यपादा समस्तेश्वरा दासपीडाहरा भासमाना प्रभो ॥
बहुखरभवदावें दग्धास बाधावनाग्ने जगत्पावना धाव गा पाव ये क्षिप्र भो ॥६४॥

**पंचचामर**–असा सुरारिपुत्र सागरांत तेधवां स्तव ।
करूनियां त्यजी समस्त भेद हा अवास्त[४२]वें ॥
अनंत मीं च हे धरूनि भावना समाधिला ।
क्षणांत पावला चि नाठवूनियां [४३]श्रमाधिला ॥ ६५ ॥

इति **श्री**रामनंदनमयूरेश्वरकृतौ श्रीप्रल्हाद विजये तृतीयो विजयः ॥ ३ ॥

---

ऐसा प्रल्हाद मुनी योगानें ब्रह्म होय भेदा [४४]दमुनी ॥
सद्भावें पाप सरे हृदयीं चि[४५]द्भा अनादि[४६]रूपा पसरे ॥ १ ॥
चिंतुनि अधोक्षजाला योगबळें तन्मय स्वयें तो जाला ॥
तो भवपाश हि तुटला अधिक न अहिबंधनांतुनी जरि सुटला ॥ २ ॥
पावे क्षोभ नदीन[४७] त्रिभुवन झालें तदा अशो[४८]भन दीन ॥
भासे [४९]कल्पासम ही वेळा सेवी सकंप सं[५०]त्रास मही ॥ ३ ॥
पर्वतभार विराला स्वप्नापरि तो श्रम क्षणांत जिराला ॥
[५१]मकरादिकीं न सकळा [५२]नीरांतुनियां [५३]अलाबुसा चि उसळला ॥ ४ ॥
मग तो गतश्रमाधी सोडी येऊनियां तटासि समाधी ॥
हा मीं प्रल्हाद असें जाणे योगींद्र आपणालागिं असें ॥ ५ ॥
आत्मोद्धारकरातें वंदी जोडूनियां तदा स्वकरातें ॥
दितिजसुत समस्त वन स्वमुखानें गाजवी करीतां स्तवन ॥ ६ ॥
हरि तुझिया स्तवना मीं अपटु चि परि लुब्ध हाप्रियास्तव नामीं ॥
भक्तांच्या सु[५४]रतरूचे गावे गुण हे मनास या सतत रुचे ॥ ७ ॥
लक्ष्मी ज्या पदकमळा सेवी तें आवडे पदक मला ॥
नलगे तापद [५५]कमला असो तुझी भक्ति सं[५६]हृतापदक मळा ॥ ८ ॥
करुणापारावा[५७]रा लागों देशी न सेवकांला वारा ॥
हृदयीं धरूनि [५८]जागा दीनत्राणीं सदा हि असशी [५९]जागा ॥ ९ ॥

---

४१ वासव=इंद्र. ४२ अवास्तव=खोटा. ४३ श्रमाधि=शारीर दुःख व मानसिक दुःख. ४४ दमुनी=नासून. ४५ चिद्भा=चैतन्य-ज्योति. ४६ अनादिरूपा=जिला आरंभ व आकार नाहीं अशी. ४७ नदीन=समुद्र. ४८ अशोभन=सौंदर्य रहित. ४९ कल्प=अति दीर्घ काळ. ५० संत्रास=भीति. ५१ मकर=मगर, मासा. ५२ नीर=पाणी. ५३ अलाबु=भोंपळा. ५४ सुरतरु=कल्पवृक्ष. ५५ कमला=लक्ष्मी. ५६ संहृतापदक-मळा=नाहींसा केला आहे पायांपासून मस्तकापर्यंत सर्वांगाचा मळ जीनें अशी. ५७ पारावार=समुद्र. ५८ जागा=आश्रय, स्थान. ५९ जागा=न निजलेला.

धरूनि महा आदर ज्या वांछिति तूझ्या विधीशैं[६०] ही पादरजीं[६१] ॥
तो तूं दयानदीना संरक्षिसिबा स्वयें चि धांवुन दीना ॥ १० ॥
करुनि तपा वेदांत श्रवणें कालें करूनि पावे दांत ॥
त्या श्रीकांतपदानें उद्धरिलें न घडतां मला तप दानें ॥ ११ ॥
अज्ञानतिमिरतरणी[६२] त्वत्पद देवा महाभवार्णवतरणी[६३] ॥
भक्ताचे अमरतरू कल्याण असो तयामुळें लोक तरू ॥ १२ ॥
सुरपतिविधिभवशमन-प्रभु[६४] तो स्तवितां मनांतुनी भवशमनें[६५] ॥
सगदाब्जारिदरवर[६६] प्रकटे ध्याया हरूनि सर्व दरें[६७] वर ॥ १३ ॥
जलधरपटलसमान द्युति[६८] कौस्तुभकंठ पीतपटलसमानें[६९] ॥
कारुण्यवदक्षम हा भुज भुवनलयस्थितिप्रभवदक्ष[७०] महा ॥ १४ ॥
तो प्रल्हाद भ्रमला पाहुनि सुखमूर्त्ति संहृतादभ्रमलीं[७१] ॥
पाहुनि संभ्रम लाहे नमुनि ह्मणे भेटले कृपाभ्रें[७२] मला हे ॥ १५ ॥
दीनजनावनचतुरा[७३] चतुरास्य[७४]शिवादि-मस्तकीं तूं च तुरा ॥
करुणापारावारा वाराया हो भवांबुदाला[७५] वारा ॥ १६ ॥
हे निगमागमसारा[७६] साराया दक्ष तूं चि या संसारा ॥
तव कीर्ति सुधाधारा धारा पीयूष[७७]रस समस्ताधारा ॥ १७ ॥
जो भवपाश असे तो तोडावा दीनदुःखसागरसेतो[७८] ॥
तापाला माज्या ने लयास निजपादपंकजें माजाने[७९] ॥ १८ ॥
तव महिमा आहे तो गायाला दे मला रुची सुखहेतो ॥
भवसागरांत नाव श्रीकांता एक मात्र तुझें नांव ॥ १९ ॥
स्तवन असें संतानें केलें तें ऐकिलें जगत्संतानें ॥

---

६० विधीश=( विधि+ईश ) ब्रह्मा व शिव. ६१ रज=धूलि. ६२ अज्ञान–तिमिर–तरणी=अज्ञानरूपी अंधकाराचा सूर्य. ६३ महाभवार्णवतरणी=मोठ्या संसाररूपी सागराची नौका. ६४ सुरपति–विधि–भव–शन–प्रभु=इंद्र, ब्रह्मा, शिव, व यम यांचा स्वामी. ६५ भवशमन=संसारनाशक. ६६ सगदाब्जारिदरवर=( स+गदा+अब्ज+अरि+दरवर ) गदा, कमल, सुदर्शन चक्र, व उत्तम शंख यांसह. ६७ दर=भीति. ६८ जलधर–पटल–समान–द्युति=मेघपटलासारखी आहे कांति ज्याची. ६९ पीत–पट–लसमान=पिंवळ्या वस्त्रानें शोभणारा. ७० भुवन–लय–स्थिति–प्रभव–दक्ष=भुवनाचा नाश, रक्षण, व उत्पत्ति यां विषयीं समर्थ. ७१ संहृतादभ्रमला=नष्ट केला आहे बहुत मल जीनें अशी. ७२ कृपाभ्र=दयामेघ. ७३ दीनजनावनचतुर=गरीब लोकांचें रक्षण करण्यांत कुशल. ७४ चतुरास्य=चतुर्मुख=ब्रह्मा. ७५ भवांबुद=संसारमेघ. ७६ निगमागमसार=वेद व शास्त्रें यांचें सार. ७७ पीयूष=अमृत. ७८ सेतो=हे पुला. ७९ मा–जाने=हे लक्ष्मीपते. ८० संतानें=साधूनें. ८१ जगत्संतानें=जगताच्या कल्पवृक्षानें.

मग तो सुखजनक[८२]वचें[८३] तोषविला भक्तराज सज्जनकवचें[८४] ॥ २० ॥
धरूनि मम गुणासक्ती तूं अव्यभिचारिणी च केली भक्ती ॥
वत्सा मीं तूजवर प्रसन्न आहें अभीष्टसा माग वर ॥ २१ ॥
झाल्या बाधा अतुला[८५] परि लव हि नसे मदीय विस्मरण तुला ॥
चिंतिसि मानसधामीं[८६] यास्तव झालों प्रसन्न तूज बुधा मी ॥ २२ ॥
असि भवबंधकृपाणी[८७] वाणी परिसूनि चित्सुखाची खाणी ॥
आणी नयनीं पाणी पाणी[८८] जोडूनि भक्त बहु वाखाणी ॥ २३ ॥
योनि-सहस्रांत मला भ्रमतां ही अच्युता तुझी शांतमला[८९] ॥
भक्ति असो वर दे हा भास्वरदेहा[९०], प्रपूरितद्विरदेहा[९१] ॥ २४ ॥
अविवेकांची[९२] रसदा विषयीं अनपायिनी[९३] जशी प्रीति सदा ॥
तैशी तुझिया भजनीं असो मला हा चि नित्य निज लाभ जनीं ॥ २५ ॥
देव म्हणे बाळा हें आहे चि तुला अणीक ही बा लाहें ॥
परि दुसरा क्षिप्रं[९४] वर प्रल्हादा माग तूं स्वभक्तप्रवर[९५] ॥ २६ ॥
तेव्हां त्या वरदास प्रार्थी शिर ठेवुनी पदावर दास ॥
तव गुणगीतरतातें[९६] पीडा केली असे निरंतर तातें ॥ २७ ॥
घडली पातकराशी[९७] देवा तव पाददासपातकराशी[९८] ॥
त्या माझ्या जनकमळ[९९]-क्षपणीं[१००] करुणा करू तुझें पदकमळ ॥ २८ ॥
करि असुरास रमेना द्वेषी ऐसा च दे वरास रमेना[१] ।
हरि जनघातक नर कीं सेविति आकल्प[२] सर्व पातक नरकीं ॥ २९ ॥
या अभयकृपादानें रक्षावे सर्व लोक नुतपादानें[३] ॥
जोडूनि अंजलीला ऐसें विनवी त्रिलोकपावन[४]लीला ॥ ३० ॥
ऐकुनियां मावर[५] तें कारुण्य करी स्वभक्तिधामावरतें ॥
हें तव कामित[६] साधो वर बहु घे मागतोसि कां मित साधो ॥ ३१ ॥

---

८२ जनक=उत्पादक. ८३ वचें=भाषणानें. ८४ सज्जन-कवच=साधुरक्षक. ८५ अतुला=जिला उपमा नाहीं अशी. ८६ धाम=घर. ८७ भव-बंध-कृपाणी=संसार-बंध छेदणारी तरवार. ८८ पाणी=हात. ८९ शांतमल=नष्ट झाला आहे मळ ज्या पासून. ९० भास्वर देह=तेजस्वी आहे देह ज्याचा असा. ९१ प्रपूरित-द्विरद-इह=पूर्ण केली आहे हत्तीची इच्छा ज्यानें असा. ९२ अविवेक=अविचारी. ९३ अनपायिनी=नष्ट न होणारी अशी. ९४ क्षिप्र=सत्वर. ९५ प्रवर=श्रेष्ठ. ९६ गुण-गीत-रत=गुण गाण्याविषयीं आसक्त. ९७ पातक-राशी=पापाचा ढीग. ९८ पाद-दास-पात-करा-अशी=पायांच्या सेवकाचा नाश जीनें होईल अशी. ९९ जनक-मळ=बापाचें पातक. १०० क्षपण=नाश. १ रमा-इना=हे लक्ष्मी-पते. २ आकल्प=कल्प संपे पर्यंत. ३ नुतपाद=स्तुत आहेत पाद ज्याचे असा. ४ पावन=पवित्र. ५ मा-वर=लक्ष्मी-पति. ६ कामित=इच्छित.

या धरणीवर मागें[7] अलब्ध ऐसा किशोरका[8] वर मागें[9] ॥
दुर्लभ संपाद पहा आलों मी भक्तकामसुरपादप[10] हा ॥ ३२ ॥
प्रल्हाद म्हणे नामीं सर्व असे अन्य योग्य जाणेंना मी ॥
धर्मार्थकाममुक्ती त्वद्दास करी अशी च सत्य सदुक्ति ॥ ३३ ॥
त्वद्भक्ति सुरव्रतती[11] यास्तव संसेविता सदा सुव्रत तीं ॥
जेथें चित्त भुकेलें तें देउनियां कृतार्थ मज विभु केलें ॥ ३४ ॥
सकळांला दुर्लभ जें तें दिधलें म्हणसि नित्य निर्विघ्न भजें ॥
तुज सुखमूर्ते गावें हें चि दिलें अन्य काय मी मागावें ॥ ३५ ॥
गौरविलें निज लाभें आतां नाहीं जगत्त्रयीं मजला भें ॥
भ्राजिष्णो प्रभविष्णो भूष्णो जिष्णो नमो नमस्ते विष्णो ॥ ३६ ॥
प्रल्हादाची वाणी ऐकुनि ऐशी सुधाब्धिवीचीवाणी[12] ॥
भुवनांबुजकासार[13] प्रभु बोले यापरि स्वभजका सार ॥ ३७ ॥
भक्तिसमन्वित शांत स्वांत तुझें मत्पदीं असो विश्रांत ॥
निर्वाणें[14] हि पाव न हो देहात्मभ्रांति विष्टपीं[15] पावन[16] हो ॥ ३८ ॥
ऐसा दयानिधान[17] प्रल्हादीं करुनियां प्रसादाधान[18] ॥
श्रीपति जगत्प्रधान प्रभु तो पावे क्षणात अंतर्धान[19] ॥ ३९ ॥
मग निर्जरजनकाला[20] प्रल्हाद हि जाउनी नमी जनकाला ॥
बाष्पाकुळ नयन गळे सुत धरिला पोटिशीं नृपें भुजयुगुळें ॥ ४० ॥
सुतदर्शनामृता पी नयन-युगें असुरनाथ तो अनुतापी[21] ॥
द्वेष समस्त हि विसरे हरिप्रसादें करुनि करुणा पसरे ॥ ४१ ॥
अभिमुख[22] जरि सकळपती[23] तरि कालप्रमुख दुःखदायक लपती ॥
साधिति शत्रुजन मन-प्रिय करिती जोडुनी करांबुज[24] नमन ॥ ४२ ॥
विधिशापानळदग्धें[25] बहु काळें कश्यपात्मजें[26] अविदग्धें[27] ॥
सुतमारण पुनरपि तें हरि-वैरें करुनि मांडिलें अति कुपितें ॥ ४३ ॥
तेव्हां नृसिंहतनुतें धरुनि श्रीशें सुरर्षिसंघातनुतें[28] ॥

---

७ मागें=पूर्वी. ८ किशोरका=हे बालका. ९ मागें=नाग. १० सुर-पाद-प=कल्पवृक्ष ११ सुर-व्रतती=कल्पवल्ली. १२ वीचीवाणी=लाटेसारखी. १३ कासार=तलाव. १४ निर्वाण=मोक्ष. १५ विष्टप=जगत्. १६ पावन=पवित्र. १७ निधान=ठेवा. १८ प्रसाद-आधान=प्रसाद देणें, ठेवणें. १९ अंतर्धान पावे=गुप्त होई. २० निर्जर-जन-काल=देवांचा शत्रु. २१ अनुतापी=पश्चात्तापयुक्त. २२ अभिमुख=अनुकूल. २३ सकळपति=सर्वस्वामी ईश्वर. २४ करांबुज=हस्त कमल. २५ विधि-शाप-अनळ-दग्ध=ब्रह्मदेवाच्या शापरूपी अग्नीनें जळलेला. २६ कश्यप-आत्मज=कश्यपाचा पुत्र हिरण्यकशिपु. २७ अविदग्ध=मूर्ख. २८ सुरर्षिसंघातनुत=देवर्षिसमूहानें स्तविलेला.

वधिला दितिसुत नखरें केलें मद्भक्त अभय हें वचन खरें ॥ ४४ ॥
सर्वग सर्वव्यापी भक्तप्रतिपाळ हें स्ववाक्य स्थापी ॥
भक्ति अधिक मीं हि असें निजदासाधीन दाविलें तत्व असें ॥ ४५ ॥
निजलीलाकल्पलता-छायाश्रित पूर्णकाम होऊ भलता ॥
अवतारचरित्र हरी यास्तव दावूनि भक्तभवभीति हरी ॥ ४६ ॥
प्रल्हादें ही राज्य प्रभुप्रसादें करूनि केलें प्रौंज्य[२९] ॥
बहु संपत्संततिला पावे अद्यापि वर्णिती संत तिला ॥ ४७ ॥
पापें पुण्यें सुटला जेव्हां अधिकारबंध सारा तुटला ॥
तेव्हां भगवध्यानें पर निर्वाणा[३०]सि पावला सध्यानें ॥ ४८ ॥
हरिपादयुगस्मरणप्रवणें[३१] भगवज्जनादिव्यकथाश्रवणें ॥
चतुरें रसिकें समय क्रमणें सुख अन्य नसे चि भवभ्रमणें ॥ ४९ ॥

## शार्दूलविक्रीडित

श्रीमद्विष्णुपुराणसागरसुधा[३२] प्रल्हादजीची कथा ॥
साधुश्रोत्रपथासि येउनि हरी संसाररोगव्यथा ॥
केलें सेवन यास्तव क्षणभरी आम्हां न मानें पृथा ॥
हा काळव्यय चांगला इतरथा[३३] आयुष्य जातें वृथा ॥ ५० ॥

## शिखरिणी

हरिध्यानासक्त प्रकृतिविषयप्राप्तविकृती[३४] ॥
कृती लक्ष्मीरामाकृतिभव[३५] मयूरश सुकृती ॥
तया दे हे वाणी प्रभु कमळपाणी[३६] बुधमनीं ॥
असो पीयूषाची[३७] लहरि[३८] भवसंतापशमनीं ॥ ५१ ॥

इति श्रीरामनंदनमयूरेश्वरकृतौ श्रीप्रल्हादविजये चतुर्थो विजयः ॥ ४ ॥

एकंदर पद्यसंख्या २४२

समाप्त.

---

२९ प्राज्य=पुष्कळ. ३० निर्वाण=मोक्ष. ३१ प्रवण=आसक्त. ३२ सुधा=अमृत. ३३ इतरथा=अन्य रीतीनें. ३४ प्रकृति-विषय-प्राप्त-विकृति=सृष्टींतील विषयांचे योगानें प्राप्त झाला आहे विकार ज्यास असा. ३५ लक्ष्मी-राम-आकृति-भव-=लक्ष्मी व राम यांचा पुत्र ( पंतांच्या आईचें नांव लक्ष्मी व बापाचें रामचंद्र होतें. ). ३६ कमळपाणी=कमल आहे हातीं ज्याच्या असा. ३७ पीयूष=अमृत. ३८ लहरि=लाट.

## मोरोपंतकृत

## ‡ ७३ वें रम्यरामायण*.

शार्दूलविक्रीडितवृत्त

श्रीसीतापतिपादपद्म[1] नमुनि प्रेमें तयाच्या यशा ।
गातों वंदुनि पाय आदिकविचे[2] जे व्याघ्र[3] मोहा शशा[4] ॥
श्रीदेवर्षि[5] वसिष्ठ गाधिज[8] भरद्वाजात्रि कुंभोद्भव[9] ।
यांतें प्रार्थुनि मागतों वर सरो या चिंतनें मद्भव[10] ॥ १ ॥
राजा पंक्तिरथाख्य[11] भास्करकुळीं[12] धर्मी सदा सादर ।
होतां सद्गुरुची दया पळ शिवों दे ज्या न दासा दर[13] ॥
झाला वृद्ध सुभार्य[14] आर्य सकळ श्री[15] तो कला[16] भाविना † ।
वाहे आधि[17] ह्मणे वृथा उपजलों मीं तोकलाभा[18] विना ॥ २ ॥

---

* हें आपल्या नांवाप्रमाणें खरोखरच मनोहर आहे.

‡ रा० रा० माधव चंद्रोबा यांनीं आपल्या सर्व संग्रहांत एकंदर ७० रामायणें छापिलीं आहेत. त्यांपैकीं ३० अक्षरगणवृत्तांत, ३६ मात्रागणवृत्तांत, २ अनेक वृत्तांत, व २ प्राकृत वृत्तांत आहेत. अक्षरगणवृत्तांतल्या तिसांपैकीं २८ समवृत्तांत व २ अर्ध समवृत्तांत आहेत. समवृत्तांतील २८ पैकीं ३ विद्युन्माला व अनुष्टुभ् (आर्या) या अष्टाक्षरी वृत्तांत, २ रथोद्धता व इंद्रवज्रा या एकादशाक्षरी वृत्तांत, ६ तोटक, भुजंगप्रयात, प्रमिताक्षरा, जलोद्धतगति, व सारंग या द्वादशाक्षरी वृत्तांत, ४ मत्तमयूर, वसंततिलका, मालिनी, पंचचामर या अनुक्रमें १३, १४, १५, व १६ अक्षरी वृत्तांत, ५ पृथ्वी, हरिणी, लक्ष्मी, नर्दटक, मंदाक्रांता या सप्तदशाक्षरी वृत्तांत, १ विबुधप्रिया या १८ अक्षरी वृत्तांत, २ शार्दूलविक्रीडित या १९ अक्षरी वृत्तांत, १ स्रग्धरा वृत्तांत, २ अश्वधाटी व अमृतध्वनि या २२ अक्षरी वृत्तांत, आणि १ मदिरा ( सवाई ) वृत्तांत आहे. २ वियोगिनी व पुष्पिताग्रा या अर्धसमवृत्तांत आहेत. मात्रागणवृत्तांतल्या ३६ पैकीं ३० गीतिवृत्तांत, २ साकीवृत्तांत, १ आर्यावृत्तांत, १ पज्झटिका वृत्तांत, एक दोहावृत्तांत आहे व एकाचें वृत्त समजत नाहीं. या खेरीज आम्हीं या पुस्तकांत संस्कृत मंत्ररामायण छापलें आहे तें अनुष्टुभ् वृत्तांत आहे व बाल मंत्ररामायण गीतिवृत्तांत आहे. याप्रमाणें आजपर्यंत ७२ रामायणें छापून

[ पुढें चालू. ]

१ पादपद्म=पदकमल. २ आदिकवि=वाल्मीकि. ३ व्याघ्र=वाघ. ४ शश=ससा. ५ देवर्षि=नारद. ८ गाधिज=विश्वामित्र. ९ कुंभोद्भव=अगस्त्य. १० मद्भव=माझा संसार. ११ पंक्तिरथ=दशरथ. १२ भास्कर=सूर्य. १३ दर=भीति. १४ सुभार्य=सुंदर आहेत स्त्रिया ज्याच्या असा. १५ श्री=संपत्ति. १६ कला=किंचित् अंश. † भाविना=मानीना. १७ आधि=मनोव्यथा. १८ तोक=पुत्र.

मन्यु[१९]श्रेष्ठ तुरंगमेधं[२०] करितां पुत्राप्ति हें जाणुनी ।
स्वाप्तप्रोक्त सनत्कुमारवच तो शांता[२१]पती आणुनी ॥
आरंभी यजना त्रिधिप्रमुख जे घ्याया स्वयें भाग ते ।
आले प्रार्थिति विष्णुचे चरण कीं हे स्वावनीं[२२] जागते ॥ ३ ॥

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

प्रसिद्ध झालीं आहेत. खेरीज आज हातीं घेतलेलें रम्यरामायण व द्वितीय दोहारामायण हीं आमचे जवळ छापण्यास तयार आहेत. यावरून पंतांनीं १०८ रामायणें रचिलीं म्हणून जी प्रसिद्धि आहे त्यांपैकीं आज ७४ उपलब्ध आहेत असें होतें. बाकीच्या ३४ चा शोध करितां यावा म्हणून उपलब्ध रामायणांची यादि येथें देतों :———

४ अष्टाक्षरी वृत्ताचीं

| नांव | छंद |
|---|---|
| १ विद्युन्माला रामायण | विद्युन्माला. |
| २ अनुष्टुप् रामायण | अनुष्टुभ्. |
| ३ मंत्रि रामायण | ,, |
| ४ सप्तमंत्र रामायण | ,, |
| ४ | |

२ अकराक्षरी वृत्ताचीं

| नांव | छंद |
|---|---|
| १ गटब्र रामायण | रथोद्धता. |
| २ सद्वित्त रामायण | इंद्रवज्रा. |
| २ | |

६ द्वादशाक्षरी वृत्ताचीं

| नांव | छंद |
|---|---|
| १ श्रीरमणीय रामायण | सारंग. |
| २ श्रीहररमणीय रामा० | तोटक. |
| ३ श्रीमत्सुरामायण | भुजंगप्रयात. |
| ४ एकश्लोकी रामा० | जलोद्धतगति. |
| ५ वरदरामायण | प्रमिताक्षरा. |
| ६ विचित्ररामायण | जलोद्धतगति. |
| ६ | |

| | |
|---|---|
| १ मत्तमयूर रामयण | मत्तमयूर. |
| १ सद्भक्तसर्वस्व रामायण | वसंततिलका. |
| १ रामायण पीयूष | मालिनी. |
| १ पंचचामर रामायण | पंचचामर. |

५ सप्तदशाक्षरी वृत्ताचीं

| | |
|---|---|
| १ पृथ्वीछंद रामायण | पृथ्वी. |
| २ सच्छ्लाघ्य रामयण | हरिणी. |
| ३ श्रवणामृत रामायण | नर्दटक. |
| ४ भाव रामायण | मंदाक्रांता. |
| ५ सुरामायण | लक्ष्मी. |
| ५ | |

| | |
|---|---|
| १ विबुधप्रिय रामायण | विबुधप्रिया. |

२ १९ अक्षरी वृत्ताचीं

| | |
|---|---|
| १ सत्स्वरामायण | शार्दूलविक्रीडित. |
| २ त्रिःसप्तमंत्ररामा० | ,, |
| २ | |

| | |
|---|---|
| १ सत्कीर्तिरामाण | स्रग्धरा. |

२ बावीस अक्षरी वृत्ताचीं

| | |
|---|---|
| १ कविप्रियरामायण | अश्वधाटी. |
| २ सद्रत्नरामायण | अमृतध्वनि. |
| २ | |

| | |
|---|---|
| १ सवाई रामायण | मदिरा. |
| १ पुष्पिताग्रारामायण | पुष्पिताग्रा. |
| १ श्रीप्रियरामायण | वियोगिनी. |

( पुढें चालू. )

१९ मन्यु=यज्ञ. २० तुरंगमेध=अश्वयज्ञ. २१ शांतापती=शांतेचा नवरा. २२ अवन=रक्षण.

जन्यीं[23] अक्षम[24] देव दाशरथि[25] तूं हो देवदेवा नर ।
नाकी[26] सर्व सहाय रावणवधीं होतील हे वानर ॥
श्रीवैकुंठ[27] वरें ह्मणे मुनि करी पुत्रेष्टि दे पायसा[28] ।
अग्नि प्राशिति राजदार[29] भव भी राजाधि लो कायसा ॥ ४ ॥

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

३० गीति वृत्तानीं रामायणें :—

| | |
|---|---|
| १ मात्रारामायण | १२ हनुमद्रामायण. |
| २ मंत्रमय रामा० | १३ काशीरामायण. |
| ३ नामांक रामा० | १४ गंगा रामायण. |
| ४ परंतु रामा० | १५ शिवरामायण. |
| ५ तीर्थ रामायण | १६ द्वितीयशिवरा० |
| ६ ऋषिरामायण | १७ प्रयागरामायण. |
| ७ उमारामायण | १८ दिव्यरामायण. |
| ८ लवुरामायण | १९ सन्नामगर्भरामा० |
| ९ राजरामायण | २० थोरलें मंत्ररामा० |
| १० दामरामायण | २१—३० दाहा स्तोत्र रामायणें. |
| ११ निरोष्ठ रामा० | |

२ साकी वृत्तांत

| | |
|---|---|
| १ मंत्रगर्भ साकीरामायण | साकी. |
| २ पंचशती रामायण | साकी. |
| २ | |

| | |
|---|---|
| १ कल्याण रामायण | पज्झटिका. |
| १ दोहा रामायण | दोहा. |
| १ आद्यार्या रामायण | आर्या. |
| १ सौम्यरामायण | (वृत्त कळत नाहीं). |
| १ सीतारामायण | अनेक वृत्तें. |
| १ श्रीगुरुरामायण | ,, |
| १ ओवीरामायण | ओवी व आर्या. |
| १ घनाक्षरी रामायण | घनाक्षरी. |
| ७० | |

२ काव्येतिहास संग्रहांत छापलेलीं

| | |
|---|---|
| १ संस्कृत मंत्ररामायण | अनुष्टुभ्. |
| २ बालमंत्र रामायण | गीति. |
| २ | |
| ७२ | |

वर जीं वृत्तें आलीं आहेत त्यांपैकीं सारंग, नर्दटक, वियोगिनी, व पज्झटिका या चोहोंचीं लक्षणें के० वा० परशुरामपंत तात्या गोडबोले यांचे वृत्तदर्पणांत नाहींत म्हणून तीं येथें देतों :—

सारंग—अक्षरें १२ गण त, त, त, त.

सारंगसंज्ञं समस्तैस्तकारैः ।

नर्दटक—अक्षरें १७ गण न, ज, भ, ज, ज, ल, ग.

हयदशभिर्नजौ भजजला गुरु नर्दटकम्.

वियोगिनी.

विषमे स स जा गुरुः समे सभरालोऽथ गुरुर्वियोगिनी.

विषम चरणांत गण :—स, स, ज, ग.

सम ,, ,, :—स, भ, र, ल, ग.

पज्झटिका.

प्रतिपदयमकितषोडशमात्रा । नवमगुरुत्वविभूषितगात्रा ॥
पज्झटिकाया एष विवेकः । क्वापि न मध्यगुरुर्गण एकः ॥ १ ॥

२३ जन्य=युद्ध. २४ अक्षम=असमर्थ. २५ दाशरथि=दशरथाचा पुत्र. २६ नाकी=स्वर्गवासी देव. २७ वैकुंठ=विष्णु. २८ पायस=खीर. २९ दार—स्त्री.

यज्ञेशीं[30] प्रकटे सुखें सुसमयीं सत्पुत्र तो राम हा ।
कौसल्यात्मज दे खळांस चि भया साधूंसि थोरा महा[31] ॥
कैकेयीसुत केशवांश भरत श्रीमान् सुमित्रासुत ।
नामें लक्ष्मण भव्यलक्षण दुजा शत्रुघ्न विश्वस्तुत ॥ ५ ॥
राकेशाननें[32] ते कुमार चवघे संस्कारिले आपवें[33] ।
आचार्या भजले तयां गुरु ह्मणे तेजें परां[34] तापवा ॥
भपें त्यावरि रामलक्ष्मण दिले यज्ञावना गाधिजा ।
ते मारीचसुबाहु विघ्न करति क्रौर्यें सदा आधि ज्यां ॥ ६ ॥
मर्यादापरिपालनें हरि मुनिस्वांतांसि[35] विश्वंभर ।
विद्या तो हि बळा दुजी अतिबळा अस्त्रें हि दे शंभर ॥
मार्गीं मारुनि ताटिकेसि सुभुजा सिद्धाश्रमीं पाडुनी ।
मारीचा प्रभुबाण दूर उडवी पुंखानिळें[36] ताडुनी ॥ ७ ॥
जन्हु स्वर्गनदी[37]पिता नृप तसा जो साधु सीतापिता ।
तो वाहे स्वमखो[38]त्सवार्थ मुनितें ब्रह्मीं मन स्थापिता ॥
राम त्र्यंबकचाप[39] दाखिव असें प्रार्थी स्वयें त्यासि घे ।
विश्वामित्र ह्मणे फिरा खगमृगां सांत्वूनि भक्तां निघे ॥ ८ ॥
यज्वा[40] गाधिज निर्मृगाश्रमपदीं[41] रामा अहल्याकथा ।
सांगे लाववि पादरेणु हरवी तत्पापशापव्यथा ॥
पूजी गौतम दिव्यदारसहित प्रेमें तया वाडवा[42] ।
त्या श्रीशा मग भूप घेउनि शतानंदासि[43] ये आडवा ॥ ९ ॥
जन्म प्राप्तफळ स्व मानि जनक स्नेहें सपर्या[44] करी ।
भंगी त्र्यंबकचाप राघव तया सप्रेम सीता वरी ॥
सामात्या सपुरोहिता दशरथा आणूनि दे ऊर्मिळा ।
भावें पूजुनि लक्ष्मणासि विधिनें शक्राहि जी दुर्मिळा ॥ १० ॥
यक्षाधीश्वर[45]सा सभाग्य जनक भ्रात्यासि सांगे सुता ।
द्याया तो भरता कुशध्वज सुधी जी मांडवी श्रीयुता ॥
शत्रुघ्ना श्रुतकीर्ति दे बहु धनें सर्वांसि ते पूजुनी ।
प्रेमें बोळविती दिली न बहुधा ती जांवयां भू जुनी ॥ ११ ॥

---

३० यज्ञेश=विष्णु. ३१ मह=आनंद. ३२ राकेशानन=चंद्रमुख. ३३ आपव=वसिष्ठ. ३[illegible] पर=शत्रु. ३५ स्वांत=मन. ३६ पुंखानिळ=बाणाच्या पिसाऱ्याचा वारा. ३७ स्वर्गनदी=[illegible]ा. ३८ मख=यज्ञ. ३९ त्र्यंबकचाप=शिवाचें धनुष्य. ४० यज्वा=यज्ञकर्ता. ४१ निर्मृगाश्रमपद=ज्यांतून मृग निघून गेले आहेत असें आश्रमस्थान. ४२ वाडव=ब्राह्मण. ४३ [illegible]ानंद=गौतमाचा पुत्र व जनकाचा पुरोहित. ४४ सपर्या=पूजा. ४५ यक्षाधीश्वर=कुबेर.

शरगेंजे भृगुराम[४६] भर्गधनुच्या[४७] भंगें तयाच्या हरी ।
तेजातें प्रभु विष्णु शांतिहनु तो जातां तपातें धरी ॥
केला सावध वृद्ध भूपति मनीं मानी पूनर्जन्म हें ।
साकेतांत[४८] करि प्रवेश नमुचिघ्नाचा[४९] सखा सन्महें[५०] ॥ १२ ॥
मर्त्येश श्वशुरालयासि भरता प्रेषी रिपुघ्ना[५१] सह ।
प्रेमें मातुळ[५२] ने तयासि समरीं जो शत्रुला दुःसह ॥
छंदें[५३] सत्प्रिय बालकांड लिहिला शार्दूळविक्रीडितें ।
श्रीमद्रामयशोलवें परयशें केलीं बहू व्रीडितें ॥ १३ ॥

इति बालकांडः

---

शार्दूलविक्रीडितवृत्त.

तो श्रीमान्नृप यौवराज्य वडिला द्यावें सुता हें वदे ।
ती गुर्वादिजना सुगी[५४] तशि जशी शांती सुधी[५५] खेंवें[५६] दे ॥
कैकेयी अभिषेक राहवि बळें तो मंथरेच्या मतें ।
मानीना तिळमात्र जें दशरथ प्रार्थी करी साम तें ॥ १ ॥
दे राज्य स्वसुता चतुर्दश समां[५७] रामा वनीं वास ती ।
झाली मागुनि दोन दुर्वर असे हे राक्षसी भासती ॥
मातेचें प्रिय मान्य तो प्रभु करी तें तातसत्यावना[५८] ।
सीतालक्ष्मणयुक्त तत्क्षण निघे जोडी यशा पावना[५९] ॥ २ ॥
धामें[६०] त्यागुनि वल्कली[६१] प्रभु पित्या मातांसि वंदी पुसे ।
कैकेयीवरि भूपतीवरि पुरी जी तीवरि श्री रुसे ॥
राजाज्ञप्त सुमंत्र सारथि तिचां ने तो रथीं वाहुनी ।
प्राणी सर्व हि हाय हाय वदले जातां पथीं पाहुनी ॥ ३ ॥
लाज क्षोणिपतीस[६२] होय सदनें[६३] त्यागी तिचें त्या क्षणीं ।
कौसल्यानिलयासि[६४] जाय न धरी धी[६५] प्राणसंरक्षणीं ॥
पौरांतें निजल्या स्थळीं त्यजुनि तो गेला प्रभु स्यंदनें[६६] ।
तत्पादाब्जरजें[६७] निवे गुह सखा जैसा फणी[६८] चंदनें ॥ ४ ॥

---

४६ भृगुराम=परशुराम. ४७ भर्ग=शिव. ४८ साकेत=अयोध्या. ४९ नमुचिघ्न=इंद्र. ५० सन्मह=उत्तम आनंद. ५१ रिपुघ्न=शत्रुघ्न. ५२ मातुळ=मामा. ५३ छंद=वृत्त. ५४ सुगी=उत्तम वाणी. ५५ सुधा=अमृत. ५६ खेंव=सुख, आलिंगन. ५७ समा=वर्ष. ५८ तातसत्यावन=बापाचें सत्य राखणें. ५९ पावन=पवित्र. ६० धाम=घर. ६१ वल्कली=झाडाच्या साली नेसलेला. ६२ क्षोणि=पृथ्वी. ६३ सदन=घर. ६४ निलय=घर. ६५ धी=बुद्धि. ६६ स्यंदन=रथ. ६७ अब्ज=कमल. ६८ फणी=साप.

श्रेयस्कामहितीं[६९] प्रभूत्तम भजे देवापगेच्यां[७०] तटा ।
तेथें सानुज वन्यवृत्ति वळवी दुग्धें[७१] वटाच्या जटा ॥
ताताच्या सचिवा पुसोनि उतरे पारीं भरद्वाज या ।
आज्ञा पूजुनि दे द्रवोनि परमा आशी हि देती जया ॥ ५ ॥
धीराराध्यपदांबुज[७२] प्रभु भजे श्रीचित्रकूटा नगीं[७३] ।
सांगे साश्रु सुमंत्र तें परिसतां भूप त्यजी या जगा ॥
आचार्यें द्रुत आणिला भरत तो मातेसि गांजी वदे ।
पापे मारुनि नाथ तूं न ह्मणसी मातें हि कां जीव दे ॥ ६ ॥
हें मत्कृत्य नव्हे असें सशपथ प्रार्थी रडे तो भला ।
कौसल्या हि रडे तया मग म्हणे वत्सा विधि[७४] क्षोभला ॥
तैलांतूनि शरीर काढुनि करी विध्युक्त तातक्रिया ।
संपादी गुरुच्या वचा न वरुनि क्षमा न प्रसूच्यां[७५] प्रिया ॥ ७ ॥
तेजस्वी भरत प्रभुप्रति पुरा आणावयाला निघे ।
सर्वामात्य वसिष्ठ पौर जननी आत्मप्रसूतें हि घे ॥
त्यां नौका न दिल्या गुहें प्रभुसखें अक्षौहिणी रोधिली ।
तेव्हां ती शपथांतरें[७६] उतरिली जैं धी बरी शोधिली ॥ ८ ॥
गेयज्ञानमहार्णवें[७७] मग भरद्वाजें प्रयागीं बरा ।
सत्कारुनि परीक्षिला भरत कीं त्या दुर्यशें घाबरा ॥
पावे सत्वर चित्रकूटगिरितें रामांघ्रिपद्मीं जडे ।
ताताच्या विरहें तयासि रडवी त्याच्या स्वयें ही रडे ॥ ९ ॥
राजन्यप्रवरा[७८] पित्यासि भगवान् श्रीराम दे पिंड तो ।
यन्नामें गति देत नारद जडां लोकत्रयीं हिंडतो ॥
यत्पादाब्जपरागमिश्रित महानद्याख्य जें वारि तें ॥ ॥
स्नान स्पर्श हि एकदा हि घडतां उग्रें अघें वारितें ॥ १० ॥
माय प्राकृतबुद्धि कृत्य न इचें चित्तीं धरीं बा पुरा ।
चाल स्वालय शोभवीं यश तुझें हांसो पया कापुरा ॥
ऐसें पुष्कळ तो वदे भरत तों स्वामी म्हणे हा बरा ॥
नोहे आग्रह सत्यधर्म गुरुचा रक्षीं न हो घाबरा ॥ ११ ॥

---

६९ श्रेयस्कामहित=आपलें कल्याण व्हावें अशी ज्याची इच्छा आहे त्याला हितकर शी. ७० देवापगा=देवनदी गंगा. ७१ दुग्ध=चीक. ७२ धीराराध्यपदांबुज=शहाण्यांनीं राधन करण्यास योग्य आहे पदकमल ज्याचें असा. ७३ नग=पर्वत. ७४ विधी=नशीब. ५ प्रसू=आई. ७६ शपथांतर=शपथरूपी नोर, भाडें. ७७ गेयज्ञानमहार्णव=वर्णन करण्या-योग्य आहे ज्ञानरूपी सागर ज्याचा असा. ७८ राजन्यप्रवर=क्षत्रियश्रेष्ठ.

तेरा आणिक एक अब्द सरतां येतों पुरा जा रहा ।
ध्यावा म्यां वनवास राज्य करणें तों त्वां हि बा भार हा ॥
ऐसें ऐकुनि तो म्हणे विनवितों हें सत्य हो मी नया ।
धर्मा दे पदपादुका विसरतां देहास होमीन या ॥ १२ ॥
काम स्वैंमरवृक्ष पूरवुनि दे सांत्वूनि आज्ञा तया ।
नंदिग्रामवरी विराम म्हणवी साकेत हा ज्ञातया ॥
श्रीस श्रीपद अत्रिदारकर ते कल्पद्रुसे शोभले ।
श्रीरामप्रियभक्त या दुसरिया कांडासि जे लोभले ॥ १३ ॥

इत्ययोध्याकांडः

---

## शार्दूलविक्रीडितवृत्त.

पुण्यश्रीपद भव्य दंडकवनीं श्रीराम मुन्याश्रम ।
पाहे ज्यांत विलोकितां खंगमृगां राहे न कांहीं श्रम ॥
भूकन्येसि विराध राक्षस महारण्यांत जातां हरी ।
त्यातें मारिति वीर दाशरथि ते जैसे करीतें हरी ॥ १ ॥
जो थारा शरभंगशांतिस सुखी भेटोनि त्यातें करी ।
भृंगापद्युत त्या सुतीक्ष्णमुनिच्या श्रीराम चित्ता हरी ॥
अर्पी कुंभज देवराजनिहतें चापादि दिव्यायुधें ।
नातें मी पितृमित्र हें कळविलें त्या गृध्रराजें बुधें ॥ २ ॥
जीचे मत्स्य महेंद्रपूजित तया गोदावरीच्या तटीं ।
राहे पंचवटींत तेंवि उटजीं तो दीप जैसा घटीं ॥
क्षोभे शूर्पणखा विरूपकरणें पावे खराख्य क्षया ।
श्रीरामा चवदा हजार किति ते मुंगे तसे लक्ष या ॥ ३ ॥
ती लाज त्यजुनि स्वबंधुसि कथी स्त्रीरत्न साधावया ।
गेल्यें तत्पति तो मला तुज हि बा भ्याला न बाधावया ॥
माझ्या आजि अशा विरूपकरणें हानि प्रतापा यशा ।
केली त्या मनुजें तुझ्या हि पर जे त्यांच्या कथा कायशा ॥ ४ ॥
हा हाय क्षणदाचरेश्वर वदे मायाप्रवीणा बळें ।
मारीचा शिकवी कुबुद्धि मरणा स्वर्णैणतेच्या छळें ॥

---

७९ अमरवृक्ष= कल्पद्रुम. ८० खग=पक्षी. ८१ हरी=सिंह. ८२ कुंभज=अगस्त्य. ८३ उटज=पर्णशाळा. ८४ क्षणदाचरेश्वर=राक्षसराजा. ८५ स्वर्णैण=सोन्याचा हरिण. ८६ छळ= मिष.

मोहीं द्या च म्हणे धरूनि दयिता मार्गे दयाशेवधी[87] ।
लागे राक्षस फार दूर पळतां सोडूनि आशे वधी ॥ ५ ॥
मारी राक्षस हाक हा प्रियतमे हा लक्ष्मणा यापरी ।
सीता निंदुनि देवरासि[88] दवडी तों तीस वैरी हरी ॥
दुष्टा भंगुनि सून सोडवुनियां सत्य प्रतिज्ञा करी ।
तो गृध्रेश जटायु कीर्ति गति ही युद्धीं वरी जी बरी ॥ ६ ॥
खड्गें[89] मर्म जटायुचें दशमुख छेदूनि लंकेप्रती ।
नेतां वानर पांच पाहुनि नगां[90] टाकी मग क्षिप्रें[91] ती ॥
रक्षस्त्रींत अशोकनामकवनीं श्रीजानकी ठेविली ।
देवेशप्रहितान्नलेश[92] दिवशीं तें एकदा जेविली ॥ ७ ॥
बा आज क्षितिजा वनांत उटजीं[93] कां एकली सोडिली ।
त्वां माझी बहु जी मता सतत ती आज्ञा कशी मोडिली ॥
सांगे लक्ष्मण तद्रुक्त निलयीं[94] धांवोनि ये राम हा ।
घोकी श्रीविरहीं चकोर च्चि गमे मानी न येरां[95] मेहा[96] ॥ ८ ॥
हा रायप्रवरात्मजे म्हणत जों सर्वत्र शोधी वनीं ।
तातें[97] व्याकुळ देखतां धडकला शोकाग्नि त्याच्या मनीं ॥
सांगे तो पुसतां जटायु खग म्यां केलें जरी धांवणें ।
सीता नेलि च हाय मद्गति अशी केली खळें रावणें ॥ ९ ॥
ऐसें जन्मलयोपमर्दिचरणा सांगोनि होय व्यसु[98] ।
त्याचें उत्तरकार्य तो करि म्हणे श्रीसत्सभा ज्या वसु[99] ॥
त्या देवीस पुन्हा हि दाशरथि तो शोधी वनीं हा वदे ।
संताप स्मरतां क्षणक्षण तिचा तन्मानसा हाव दे ॥ १० ॥
जी स्वायत्त करावया स्मरवशा[100] रामानुजातें धरी ।
संभोगार्थ अयोमुखी बहु तिची ही दुर्दशा तो करी ॥
नासा कर्ण कुच क्षणांत असिनें[1] खंडी खळांचा अरी ।
क्रौंचारण्य अति प्रसन्न गमलें झालें तदा त्यावरी ॥ ११ ॥
आहारार्थ कबंध योजनभुज क्रूर स्वभावें धरी ।
बाहु च्छेदुनि सानुज प्रभु तया शापाकुळा उद्धरी ॥

---

८७ शेवधि=ठेवा. ८८ देवर=दीर. ८९ खड्ग=तरवार. ९० नग=अलंकार. ९१ क्षिप्र=त्वर. ९२ प्रहित=पाठविलेलें. ९३ उटज=पर्णशाला. ९४ निलय=घर. ९५ येर=इतर. ९६ मह=सुख. ९७ तात=बाप (जटायु.) ९८ व्यसु=मृत. ९९ वसु=धन. १०० स्मरवशा=कामार्त. १ असि=तरवार.

तो सांगे हित तें मनीं धरुनियां प्रेमें मतंगाश्रमीं ।
भेटे श्रीशबरीस सत्कृति तिची घे तोष दे ती श्रमी ॥ १२ ॥
पंपा मन्मथपावकास धमनी झाली प्रभूच्या तदा ॥
त्यातें लक्ष्मण मेघ होय अथवा सद्वैद्य जैसा गदा ।
श्रीरामें चि अरण्यकांड तिसरा थोड्यांत हा आणिला ॥
लीलेनें चि भवप्रचंडविटपी ज्याच्या यशें खाणिला ॥ १३ ॥

इत्यरण्यकांडः

---

**स्रग्धरावृत्त.**

तेथूनी श्रीश जातां अनुज सह नगा ऋष्यमूकासि पाहे ।
त्रासे सुग्रीव धाडी स्वसचिव हनुमान् तेज त्याचें न साहे ॥
तो भेटे विप्रवेषें पुसुनि सकळ तद्वृत्त दोघांसि वाहे ।
पृष्ठीं ने भेटवी त्या प्रभु करि कपिशीं सख्य संतोष लाहे ॥ १ ॥
भूषा दारा त्यजी त्या प्रभुसि सुगळ तो दाखवी बंधु बाहे ।
नेणें कांहीं म्हणे जें नतिपरिचित हें नूपुर स्पष्ट आहे ॥
राम स्नेहें उरीं ते नग धरि भिजवी अश्रुंनीं त्यासि बोधी ।
सुग्रीव त्वत्प्रियेतें हुडकुनि करितों भेटि मी स्वस्थ हो धी ॥ २ ॥
अत्युद्दामप्रताप प्रभु कपिस म्हणे जें तुझें इष्ट कार्य ।
तें आधीं मी करीन प्रमुदित सखया सर्व होवूत आर्य ॥
वैराचा मुख्य हेतु प्रथम मज कथीं तो वदे ऐक रामा ।
मायावीनाम आला असुर धरुनि मद्बंधुच्या घातकामा ॥ ३ ॥
आह्मी हीं जन्यकाम त्वरित उसळलों त्या वधाया खळाला ।
भ्याला दोघांसि एक त्यजुनि समरधी राघवा तो पळाला ॥
लागे पाठीस बाळी द्रुत असुरबिळीं जाय ठेवूनि दारीं ।
मातें कीशेंद्र मार्गे खवळुनि शिरला बा घनीं अंधकारीं ॥ ४ ॥
सांगों काय प्रभो तें निरुपम विवरीं लोटला एक अब्द ।
रक्ताचा पूर आला अरिबळरव हि स्वाग्रजाचा न शब्द ॥

---

२ पंपा=सरोवरविशेष. ३ मन्मथपावक=कामाग्नि. ४ धमनी= फुंकणी. ५ गद=रोग. ६ विटपी=वृक्ष. ७ नग=पर्वत. ८ ऋष्यमूक=पर्वतविशेष. ९ त्रासे=भिई. १० सचिव= प्रधान. ११ सुगळ=सुग्रीव. १२ नति=नमस्कार. १३ नूपुर= पैंजण. १४ प्रमुदित=आनंदित. १५ काम=इच्छा. १६ जन्य=युद्ध. १७ समर=युद्ध. १८ द्रुत=सत्वर. १९ कीशेंद्र= वानरस्वामी.

मी किष्किंधेसि शोकें रडत बिळमुखीं अद्रि[20] ठेवोनि आलों ।
मंत्र्याच्या आग्रहानें प्लवगपति[21]पदीं सिक्तें[22] आरूढ झालों ॥ ५ ॥
वाळी वीराग्रणी त्या निर्वटुनि[23] सबळा स्वाहिता हर्षलाहे ।
येतां बाहेर रामा न मज बिळमुखीं ठेविला अद्रि पाहे ॥
क्षोभे फोडी नगातें अशनि[24]शतदृढस्पर्शमुष्टिप्रहारें ।
देखोनि स्वासनीं बा अरि गणुनि मला हा त्यजि प्रेम सारें ॥ ६ ॥
लागे सामर्ष[25] मागें वध करिन ह्मणे धांवलों लोक सारा ।
बा म्यां केली क्षमा कीं प्रथमज नग हा तद्द्रुराधर्ष थारा ॥
वाळी मारूनि दुंदुभ्यसुर उडवि तैं या मतंगार्षि शापी ।
दूषी पुण्याश्रमा तो प्लवग खळ मरो येथ येतां च पापी ॥ ७ ॥
वैरा बीज प्रभो हें बळ हि बहु असे दों मुहूर्तांत संध्या ।
सर्वांभोधींत[26] ज्याची चिरसमय अशी हे प्रतिज्ञा न वंध्या ॥
लीलेनें झेलितो हा गुरु [27]गिरिशिखरें या कसा मारिशील ।
नेणें मातें कसा तूं म्हणसि परि विपत्सागरीं तारिशील ॥ ८ ॥
जेणें जाय प्लवंगभ्रम विभु करि तें सप्त शालद्रु[28] भेदी ।
वाळीशीं गांठि घाली प्रभु परि न वधी होय सुग्रीव खेदी ॥
कंठीं बांधूनि वल्ली पुनरपि समरा त्या सुकंठासि धाडी ।
ताडी राहोनि गुप्त प्रखरतर शरें कीशपा यासि पाडी ॥ ९ ॥
निंदी सौजन्यसिंधु[29]प्रति मग विनवी दे स्वपुत्रासि हातीं ।
वाळी जाणे दया जी रघुकुळतिलकीं सर्वदा ती न तातीं ॥
किष्किंधाराज्य तारा प्रभुवर सुगळा देवुनि क्लेश वारी ।
सीताशोधार्थ धाडी बहु कपिपति तो मेळवी सैन्य भारी ॥ १० ॥
जे तारेयें[30] स्वयंभूसुतें[31] पवनसुतें[32] प्रेषिले ते यमाशा ।
शोधीं लंघूनि मासा धृतभय वरिति प्राण सोडूनि आशा ॥
तों संपाती तयांतें निरखित दशना काळसा तोंड वासी ।
स्नेहें शोची जटायु व्यसु परिसुनि हें तो महेंद्राद्रिवासी ॥ ११ ॥
सांगे सूरा[33]तितेजें अनुजसमवनीं कीश हो जो जळालों ।
तो येथें श्रीनिशाकृत्[34]समाभिधमुनिच्या आश्रमीं मीं गळालों ॥

---

२० अद्रि=पर्वत. २१ प्लवग=वानर. २२ सिक्त=अभिषिक्त. २३ निर्वटुनि=मारून. २४ अशनि=वज्र. २५ सामर्ष=सक्रोध. २६ अंभोधी=सागर. २७ गिरी=पर्वत. २८ द्रु=वृक्ष. २९ सिंधु=सागर ३० तारेय=अंगद. ३१ स्वयंभूसुत=ब्रह्मपुत्र. ( वानर विशेष. ) ३२ पवनसुत=मारुती. ३३ सूर=सूर्य. ३४ निशाकृत्=चंद्र.

आज्ञा दाहव्यथेतें हरि करि वस तों या नगीं रामभार्या ।
जी तच्छोध प्लवंगां कथ फुटतिल हे पक्ष या साध कार्या ॥ १२ ॥
सीता श्रीमत्प्रिया ती विसति मज दिसे गृध्रदृक्[35] दूर पाहे ।
जातां लंकेसि मार्गीं कठिन नवति[36] [37]दिग्योजनें सिंधु आहे ॥
ऐसें सांगोनि गेला उडुनि पवनभू ॠक्षपें[38] सिद्ध केला ।
किष्किंधाकांड रामें लिहवुनि चवथा सर्व सिद्धीस नेला ॥ १३ ॥

इति किष्किंधाकांड:

---

## शिखरिणीवृत्त.

उडे वेगें श्रीमान् पवनसुत दिग्योजनतनू ।
गमे धन्वी[39] स्वामी कपि शर महेंद्राचळ धनू ॥
शिरे तुंडीं व्योमीं[40] भरुनि सुरसेचें मन हरी ।
करी त्दष्ट स्पर्शें न बसुनि हि मैनाकशिखरीं ॥ १ ॥
समुद्रीं घोरा जी बसुनि उडतां सावलि धरी ।
बळें ओढी ग्रासी पवनसुत तीचे असु[41] हरी ॥
सुखें पावे पारा रजनिवदनीं[42] तों कलि[43] करी ।
पथीं लंकादेवी परि झटुनि ती भंगीं[44] चि बरी ॥ २ ॥
शिरे लंकेमध्यें हुडाके लघु होवोनि भवनीं ॥
अशेषीं पाहे श्री प्रति मग अशोकाभिध वनीं ॥
तिते रात्रि प्रार्थी दशवदन ती धिक्कृति करी ।
म्हणे वृक्षीं साध्वी प्रभुसि उचिता हे बहु बरी ॥ ३ ॥
स्तवी त्या राजश्रीप्रति तिस सुविश्वासद वदे ।
नमस्कारी जातां रजनिचर[45] मुद्रा[46] प्लवग दे ॥
कथी एकांतीं ता कुशल मग संदेश[47]मणि घे ।
करुनि श्रीरामागमनविषयीं निश्चय निघे ॥ ४ ॥
द्रुम ध्वंसी यत्नें खेचर[48]पतिसंपादित बळें ।
वधी युद्धीं अक्षीं[49] दशवदनपुत्रास हि पळें ॥
धरूं दे ब्रह्मास्त्रें करुनि घननादीं[50] मग बळें ।

---

३५. दृक्=दृष्टि. ३६ नवति=नव्वद. ३७ दिक्=दहा. ३८ ऋक्षप=आस्वलांचा स्वामी. ३९ धन्वी=धनुर्धारी. ४० व्योम=आकाश. ४१ असु=प्राण. ४२ रजनिवदन=निशामुख (सायकाळ) ४३ कलि=भांडण. ४४ भंग=पराभव. ४५ रजनिचर=राक्षस. ४६ मुद्रा=अंगठी. ४७ संदेश= निरोप. ४८ खचर=पक्षी. ४९ अक्ष=रावणपुत्र विशेष. ५० घननाद=इंद्रजित्.

वदे भावी सर्व क्षय वदवितां दापुनि खळें ॥ ५ ॥
प्रदीप्त पुच्छात्मा हंसुनि करवी पुच्छ सहसा ।
उडे जाळी लंका कपिवर करी भूसि सहसा[५१] ॥
पुन्हा श्रीसीतेतें पुसुनि अचळीं वेघुनि उडे ।
तळीं भूच्या भारें दडपुनि जरी तो गुरु बुडे ॥ ६ ॥
महाहर्षी मग्न प्लवग करि भेटोनि कळवी ।
खळांचीं तोंडें जें करुनि तरुभंगादि मळवी ॥
समुत्साहें प्याले मधु[५२] मधुवनीं भक्षुनि फळें ।
वनाध्यक्षा त्या ही बहु दधिमुखा ताडुनि बळें ॥ ७ ॥
पुढें ठाके जल्पे[५३] दधिमुख सुकंठा जवळि तें ।
कपींचें सैन्य त्वन्मधु मधुवनींचें कवळितें ॥
न कोपे सांत्वी त्या स्वभटकृतकृत्यत्व[५४] कळलें ।
ह्मणे जा येऊं दे स्वबळ मज वाटे न मळलें ॥ ८ ॥
महेशध्येयश्रीचरण हृदया माजि धरुनी ।
त्वरेनें आले ते कपिभट महत्कार्य करुनी ॥
सुकंठा श्रीरामा अनुजसहिता वंदुनि उभे ।
पुढें ठेले ज्यांची स्मृतिसुरभि[५५] सर्वेप्सित[५६] दुभे ॥ ९ ॥
प्रभूच्या कंजश्रीहरपदयुगीं तो कपि कवी ।
मणि स्थापी हा तें परम सुख जें तोक पिकवी ॥
तया आलिंगी श्रीरमण करि लोभा जनकसा ।
नव्हे प्रेमें दास्या जपुनि सुयशोभाजन[५७] कसा ॥ १० ॥
ह्मणे मीं काय त्वत्कृतसदृश देऊं तुज कपे ।
ऋणी झालों आम्हीं दिनमणि[५८]पुढें कोण न लपे ॥
असें वर्णि प्रेमें प्रभु बहुत लाजे सुकृति तो ।
मरुत्पुत्र[५९] ज्ञाता निजनुतिस यत्नें चुकवितो ॥ ११ ॥
कथी विश्वाराध्या पवनसुत तो जोडुनि कर ।
प्रियेच्या संदेशा विनवुनि शशी सोडुनिकर[६०] ॥
यशा लाजो तूतें विनविति पहा या सह सती ।
पुसोनि प्रेमानें शिवं[६१] तुज साहायास हसती ॥ १२ ॥

---

५१ सहसा=हास्ययुक्त. ५२ मधु=मद्य. ५३ जल्पे=भाषण करी. ५४ कृतकृत्यत्व=धन्यता. ५५ सुरभि=कामधेनु. ५६ ईप्सित=इष्ट. ५७ भाजन=पात्र. ५८ दिनमणि=सूर्य. ५९ मरुत्पुत्र=मारुती. ६० सोडुनिकर=( स+उडु+निकर ) नक्षत्रसमूहासह. ६१ शिव=कुशल.

निघावें त्या मत्ता वधुनि जिववाया स्वदयितें[६२]।
यशा रक्षीं दुःखा द्रुत हरोनि नित्यातिशयिता ॥
स्वयें रामें कांड स्वगुणमय हा सुंदर महा ।
सुखें केला पूर्ण प्रणतवरदें पंचम महा ॥ १३ ॥

इति सुंदरकांडः

---

## शिखरिणीवृत्त

पुसे त्या वीरा श्री रघुपति कसें वर्त्म[६३] अरिचें ।
कसें सैन्यस्थान प्रकृति[६४]मत साहित्य वरिचें ॥
कथीं सारें अन्या कठिन तुज तें सर्व सुगम ।
जयश्रीचा बा तूं रणनिपुण आहेसि उगम ॥ १ ॥
सुलग्नीं त्या वीरा रथ करि बसे अंगदरथीं ।
सुमित्रेचा पुत्र प्लवगबळ गर्जे बहु पथीं ॥
ससुग्रीव श्रीमान् जलधि[६५]तटें पावोन उतरे ।
ह्मणे त्या सिंधूतें प्रभुकटक गर्वें न उत[६६] रे ॥ २ ॥
न मानी जो साम त्यजुनि नयधर्म स्मरवश ।
तशा मत्ता त्यागी तदनुज तया दे पद यश ॥
समुद्रातें त्रासी प्रभुवर महास्त्रें स्थळकरें ।
तदुक्तें सेतूतें करवि शत गांवें[६७] नळ[६८]करें ॥ ३ ॥
स्वयें रक्षोराज प्लवगबळ पाहे उतरलें ।
हतौजा[६९] केला तो प्रथम चि सुकंठें सुतरलें[७०] ॥
न मानी कांहीं तें परम हित जें अंगद वदे ।
तया श्रीमान् जैसा वनगजकुळा भंग दव[७१] दे ॥ ४ ॥
प्रवीरांचा होय क्षय जरि पुन्हां ही पुर जळे ।
तरी सीता द्याया परतुनि न तो दुर्मति वळे ॥
प्रभू दोघे बांधी घनरव महीजा-धृति[७२] गळे ।
फणाभृत्पाशो[७३]ग्रव्यसन खगरा[७४]जेक्षित टळे ॥ ५ ॥
सुमित्रापुत्रोरा करुनि अरिशक्ति क्षत पळे ।

---

६२ दयिता=प्रिया ( स्त्री. ) ६३ वर्त्म=मार्ग. ६४ प्रकृति=प्रजा, प्रधान. ६५ जलधि=सागर. ६६ न उत=माजूं नको. ६७ गांवें=योजनें. ६८ नळ=वानरविशेष. ६९ हतौजा=निस्तेजस्क. ७० सुतर=चंचल. ७१ दव=वणवा. ७२ धृति=धैर्य. ७३ फणाभृत्पाश=सर्पपाश. ७४ खगराज=गरुड.

वरी मूर्छेतें तो रघुतिलक धैर्या सह गळे ॥
खळातें लीलेनें विरथ करि दे मार्ग निघ रे ।
ह्मणे मागें जाय द्रुत परिभवें शत्रु विघरे ॥ ६ ॥

स्ववक्त्रीं जो होय प्लवगकटका[७५]चा करि धरी ।
कपीशा तो नासा श्रुति[७६]युग जयाचें लघु हरी ॥
फिरे क्रोधें त्यातें स्वयश विभु गाया चिर वधी ।
सुख स्वर्गीं झालें असुख दशतुंडीं निरवधी[७७] ॥ ७ ॥

घनध्वान[७८] स्वौजें[७९] प्रकटि विशिखांहीं[८०] बळ खिळी ।
तदस्त[८१]ब्रह्मास्त्र प्रभुसुगळेतजस्मृति गिळी ॥
महात्मा ऋक्षेश स्तुत वर यशें सर्व निववी ।
मरुत्पुत्र स्वौषध्यगी[८२]शिखर आणूनि जिववी ॥ ८ ॥

वधाभासें हाय प्रभुसि जलदध्वान वदवी ।
रणीं दावी त्याला अनुज विभुचा मृत्युपदवी ॥
महीजा माराया कुमति सुतशोकें धरि असी[८३] ।
सुपार्श्वें त्या केली फिरवुनि परें कीर्ति न असी ॥ ९ ॥

पुन्हा रक्षोराजप्रहित[८४]खरशक्तिक्षत बरा ।
विभुभ्राता केला पवनतनयें आणुनि धरा ॥
शिरच्छेदें भागे प्रभु बसुनि हीं वासव[८५]रथीं ।
मथी त्या नै सांगे मुनि मनु[८६] म्हणे भास्कर मथीं ॥ १० ॥

दशास्यां[८७]चा काय प्रभुतिलक संस्कारवि बळें ।
पदीं त्याच्या भ्रात्या बसवि अभिषेचून सुजळें ॥
करी देवी दिव्य[८८] त्रिदशपितृवाक्यें[८९] मग तितें ।
भजे मेल्यां कीशीं[९०] उठवुनि वरी कामगतितें ॥ ११ ॥

सखे ते घे तारामुख कपिवधू[९१] ही शुभरता ।
भरद्वाजा भेटे निववुनि गुहा आशु[९२] भरता ॥
सुलग्नीं स्वीकारी पितृपद करी राज्य बरवें ।
प्रजा मोही गातां कुशळ हरिणां तेंवि न रवें[९३] ॥ १२ ॥

---

७५ कटक=सैन्य. ७६ श्रुति=कान. ७७ निरवधि=अतिशय. ७८ मेघध्वान=मेघनाद (इंद्रजित्). ७९ स्वौज=आपलें तेज. ८० विशिख=बाण. ८१ तदस्त=त्यानें सोडलेलें. ८२ अग=पर्वत. ८३ असि=तरवार. ८४ प्रहित=पाठविलेली, सोडलेली. ८५ वासव=इंद्र. ८६ मनु=मंत्र ८७ आस्य=मुख. ८८ दिव्य=अग्निप्रवेशरूप दिव्य. ८९ त्रिदशपितृवाक्यें=देव व बाप यांचे सांगण्यावरून. ९० कीश=वानर. ९१ वधू=स्त्रिया. ९२ आशु=सत्वर. ९३ रव=शब्द.

नवांभोदश्याम स्मरशतसहस्राधिकरुची[१४] ।
स्वनामें सर्वार्थप्रद करि यशें जो जग शुची ॥
तया रामें कांड श्रवणहित युद्धाख्य रुचिर[१५] ।
स्वयें केला पूर्ण प्रणत सुखवायास सुचिर ॥ १३ ॥

इति युद्धकांडः

---

## स्रग्धरावृत्त

सांगे रामा कथा श्रीघटज[१६] सुत पुलस्त्यर्षिचा विश्रवा या ।
आद्या वित्तेश[१७]माता विमळमति भरद्वाजपुत्री सुजाया ॥
राजा झाले दशास्यप्रमुख सुत तिघे त्या दुजा कैकसीतें ।
उग्रत्व ब्रह्मदत्तें दशवदनिं वरें होय जें ऐकसी तें ॥ १ ॥
आधीं लंकापहारा करुनि गुरुसि दे ताप जिंकूनि पापी ।
त्याच्या घे पुष्पका[१८]तें द्रविणपति[१९] तसा तो हि नंदीश[१००] शापी ॥
बाहू कैलासमूळीं रगडि विनवितां आशुतोषेश[१] सोडी ।
पावे तैं रावणाख्या[२] दशमुख न वधी त्यासि जो हात जोडी ॥ २ ॥
जीतें झोंबे सकाम त्यजुनि विनय तो केवळ क्रूर पापी ।
जन्मेन त्वद्वधा मीं गुरुतनयसुता[३] ती असें त्यासि शापी ॥
आत्मा वन्हींत होमी तदुपरि खिजवी त्या मरुत्ता हि राजा ।
त्यातें संवर्त्त वारी वाधि मख[४]मिलिता सन्मुनीच्या समाजा ॥ ३ ॥
मद्वंशोत्पन्नतेजस्विवरदशरथापत्यरामप्रतापें ।
युद्धीं होशील भस्म स्वजन सह महादुर्मदा तूं स्वपापें ॥
ऐसें शापी महात्मा नरपति अनरण्याख्य दिक्कंठ[५] पाडी ।
ज्यातें पाणिप्रहारें न गणुनि हृदयीं वाक्शरांनीं हि ताडी ॥ ४ ॥
घाता काळ स्वकीय प्रहरण[६]वर घे त्यासि वारी विधाता[७] ।
जिंकी सर्पेश्वरा[८]चें पुर मणिपुर जें होय त्यातें हि जाता ॥
ब्रह्मा सांगे निवातोत्तर कवच बळी सख्य यांशीं कराया ।
आरंभी काळकेयां सह रण भगिनीप्राणनाथा[९] मराया ॥ ५ ॥

---

१४ रुचि=कांति. १५ रुचिर=सुंदर. १६ घटज=अगस्त्य. १७ वित्तेश=कुबेर. १८ पुष्पक=विमान विशेष. १९ द्रविणपति=कुबेर. १०० नंदीश=शिव. १ आशुतोषेश=लवकर प्रसन्न होणारा शिव. २ आख्या=नांव. ३ गुरुतनयसुता=बृहस्पति-पुत्र-कन्या. ४ मख=यज्ञ. ५ दिक्कंठ=दशमुख. ६ प्रहरण=आयुध. ७ विधाता=ब्रह्मा. ८ सर्पेश्वर=शेष. ९ भगिनीप्राणनाथ=बहिणीचा नवरा.

ऐके सत्यस्थ नीराधिप वरुण असें तत्सुतांतें चि मोडी ।
जीच्या दुग्धाब्धि दुग्धें निरखुनि सुरभी[१०] तो तितें हात जोडी ॥
पाहे ज्या रम्यरूपा दशमुख हरि त्या देवराजर्षिकन्या ।
त्या तैं हो स्त्रीनिमित्तें तव वध ह्मणाति क्रोध पावोनि धन्या ॥ ६ ॥
ऐके लंकेंत धाम प्रचुर मिळविलें मेघनादें तपोनी ।
ब्रह्मादीशांसि भावें भजुन बहु महा यज्ञकर्मीं जपोनी ॥
बाळा कुंभीनसी ही उडविलि मधुनें स्वस्वसाहें हि कोपें ।
संगें अक्षौहिणी घे खयुगशतमिता[११] लोक ज्या सर्व सोपे ॥ ७ ॥
दैवें आश्चर्य ओजस्वि[१२] मधु सह घडे सख्य रंभा बळानें ।
भोगी भ्रातृव्य[१३] शापी बळरति करितां या मरावें खळानें ॥
देवांशीं युद्ध होतां घनरव धरि ने शक्र लंकेसि गोडी ।
ब्रह्मा त्याशीं करी दे वर मखज रथा मृत्यु तेव्हां चि सोडी ॥ ८ ॥
त्या ही बांधोनि हाय व्यसु[१४] वर ह्मणवी अर्जुन[१५] क्षोणिपाळ[१६] ।
रोधी कक्षेंत वाळी प्लवगपति हि जों अंबुधिस्नानकाळ ॥
सेवीं श्रीमारुतीचें चरित शिशु उडे जो फळ ब्रध्न[१७] मानी ।
पाडी वज्री[१८] हि कोपे पवन चुकवि ती आत्मभू[१९]प्राणहानी ॥ ९ ॥
प्रेषी पूजूनि राजद्वय पवनसुता सद्वर श्रीश अर्पी ।
निंदा ऐकोनि सीता त्यजि लवण[२०]वधें सद्यशें विश्व तर्पी ॥
शूद्रा मारी द्विजाचा मृत सुत उठवी श्वेत सत्कीर्ति सेवी ।
काव्यज्ञ[२१] स्वाश्वमेधीं कुश लव सुत दे जाय भूमींत देवी[२२] ॥ १० ॥
आठां पुत्रांसि दायें[२३] प्रभु सदय दे आठ राज्यें तदा ते ।
काळें केले सुबंधु त्यजवुनि विरस श्रीश जाया पदातें ॥
श्वा[२४]लूक[२५]न्यायकर्ता परम सदयधी आणवी भक्त सर्व ।
प्रेमें सांत्वी प्रजांतें प्रिय करि नुरवी काम तो जेंवि शर्व ॥ ११ ॥
सर्वां जीवांसि धीरासुलभ सुगति दे ने प्रजा गोप्रतारीं[२६] ।
तीर्थीं स्नातां विमानीं बसवि वसवि संतानकीं[२७] लोकसारीं ॥
झाले दिव्यस्वरूप प्लवग [२८]किटिखर[२९]श्वानमार्जारदेही ।

---

१० सुरभी=कामधेनु. ११ खयुगशतमित=४०००. १२ ओजस्वि=तेजस्वी. १३ भ्रातृव्य=भावाचा मुलगा. १४ व्यसु=मृत. १५ अर्जुन=कार्तवीर्य. १६ क्षोणिपाळ=भूपति. १७ ब्रध्न=सूर्य. १८ वज्री=इंद्र. १९ आत्मभू=पुत्र. २० लवण=राक्षसविशेष. २१ काव्यज्ञ=वाल्मीकि. २२ देवी=सीता. २३ दाय=वांटा. २४ श्वा=कुत्रा. २५ उलूक=घुबड. २६ गोप्रतार=तीर्थविशेष. २७ संतानक=कल्पवृक्ष. २८ किटि=डुकर. २९ खर=गाढव.

त्या पर्वीं पावले ती गति खनि सरयू कांठ जे धन्य ते ही ॥ १२ ॥

जो ठेवी भक्तनाम प्रणतसमवनां[30] जाय वैकुंठलोका ।
श्रीमद्वाल्मीकिगीत स्वयश हि सकळा संहरायासि शोका ॥
त्या रामें उत्तराख्य द्रवुनि लिहविला सातवा कांड हा कीं ।
जे प्रेमें सेवितील स्तवितिल अमृत प्राशिते त्यांसि नाकीं ॥ १३ ॥

इत्युत्तरकांडः

---

## उपसंहार

शार्दूलविक्रीडितवृत्त

जो अत्यद्भुत साधुगीत महिमा गंगाप्रवाहीं वसे ।
प्रेमें स्वल्प कुपींत गांगें[31] भरिलें जें त्यांत ही तो असे ॥
श्रीरामायणवर्तिसत्सुकृत या ग्रंथांत आहे तसें ।
श्रीरामप्रियभक्त साधु रसिक स्वांतांत पाहे रसें ॥ १ ॥
भावें वंदुनि रामचंद्रचरणीं म्यां ग्रंथ हा वाहिला ।
कीं या चि प्रभुनें प्रपन्न[32] जन जो तो बंधुसा पाहिला ॥
उच्छिष्टें बदरें[33] महामखपुरोडाशाधिकें लक्षिलीं ।
ताराया शबरीस साधु ह्मणती अत्यादरें भक्षिलीं ॥ २ ॥
श्रीरामायण सर्व साधुमतिस स्त्रीधीस माहेरसें ।
कीं हो प्राकृत संस्कृत प्रिय चि तें पाहोनि पाहे रसें ॥
जो ऐसा प्रभु त्या जना न विचकूं दे दांत बाहे रहा ।
वैकुंठीं च ह्मणे प्रसन्न चि सदा ही आंत बाहेर हा ॥ ३ ॥

## स्रग्धरावृत्त

स्तैन्य[34] स्वस्थ प्रसूचें सकळ हि करितांना च आ बाळ लाहे ।
वार्ता कोणी न मानी कुशळ सुरभिचा वत्स आबाळला हे ॥
प्रेमें पाळी कधीं ही निज गुण न म्हणे माय गा बाळकाला ।
व्हावा चि श्रीधरास प्रिय बहु जरि हा ग्रंथ गाबाळ काला ॥ ४ ॥

## शार्दुलविक्रीडितवृत्त

मानील प्रभु रामभद्र हृदयीं या तोक विप्रा कृत ।
ग्रंथा वानिल तो म्हणेल न वृथा गातो कवि प्राकृत ॥

---

३० समवन=रक्षण. ३१ गांग=गंगेचें पाणी. ३२ प्रपन्न=पीडित. ३३ बदरें=बोरें. ३४ स्तन्य=स्तनांतलें दूध.

ऐसा नित्य अति प्रसन्न दुसरा दाता न दीनावरी ।
ज्याची पादभवा[३५] हि इष्टवरदा हाता नदी नावरी ॥ ५ ॥

## शिखरिणीवृत्त

जशी देवा सेवा स्तुति बहु रूचे साधु वदती ।
नसे अन्या धन्या मिळवुनि न दे क्षिप्र पद ती ॥
सदा नव्यें भव्यें प्रभुयश चि दे देति सव[३६] ते ।
फळें आमें नामें प्रभु चि न असे यज्ञ सवते[३७] ॥ ६ ॥
सदा गावें सीतारमणयश हा योग बरवा ।
रवा या साधी जो जन धरि पराची न परवा ॥
रवा नामाच्या भी भव कलि कथा काय गमला ।
मला न श्रेष्ठा ही गुरू ह्मणुनि देवर्षि रमला ॥ ७ ॥

## शार्दूलविक्रीडितवृत्त

गावें रामचरित्र सादर सदा म्यां हा वराया वर ।
श्रीरामप्रियभक्त हो विनवितों प्रेमा करा यावर ॥
जैसा वारिद[३८] चातका प्रति सुधेचीं[३९] त्या खगां[४०] आकर[४१] ॥
युष्मत्सद्गुण ही तसा म्हणतसे रामात्मजा[४२] आ कर ॥ ८ ॥
नामातें प्रभुच्या मयूर विनवी चित्ता भरीं या भरीं ।
श्रीरामायण गायिलें तरि पुन्हा गावें चि ऐसें करीं ॥
पापाचा परिहार फार बरवा व्यापार हा साधुनी ।
गावायासि सदैव या मम मुखीं बापा रहा साधुनी ॥ ९ ॥

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं रम्यमंत्ररामायणं संपूर्ण.



३५ पादभवा=पायासून निघालेली. ३६ सव=यज्ञ. ३७ सवते=वेगळे. ३८ वारिद=[मे]घ. ३९ सुधा=अमृत. ४० खग=पक्षी. ४१ आकर=खाण. ४२ रामात्मज=रामचं-[द्र]पुत्र मोरोपंत.

## ७४ वें द्वितीयं[1] दोहारामायण.

श्रीरामाचें चिंतितां प्रेमें पदराजीवें[2] ॥
बा वेद ह्मणे सर्वथा पावे न दरा[3] जीव ॥ १ ॥
श्रीरामाचें वारितें पातक सारें नाम ॥
सकृदु[4]च्चारें तारितें सर्व पुरवितें कामा[5] ॥ २ ॥
निववीतें जें पावतें बहु मानस खेदास ॥
पावति या प्रभुचे जसे बहु मान सखे दास ॥ ३ ॥
पीयूषा[6]हुनि शतगुणें रामाचें यश गोड ॥
याचें उदारपण ह्मणे मंदरा[7] कर जोड ॥ ४ ॥
गाधितनुजमख[8] रक्षिला उद्धरिले मुनिदार[9] ॥
ईश्वर[10]धनु भंगुनि दिलें सुख सीतेला फार ॥ ५ ॥
भृगुरामा[11]चा शमविला प्रळयानळसख[12] कोप ॥
लोक स्वयशीं रमविला करुनि असत्पथलोप ॥ ६ ॥
गुरुसत्यव्रतरक्षणा[13] करितां तत्क्षण राम ॥
प्राप्त हि राजपद त्यजी गतसार[14] जसें दामें[15] ॥ ७ ॥
सीतालक्ष्मणसह निघे त्यजुनि अयोध्याधाम ॥
वनवासा बहु आदरी तनवासा[16] श्रीराम ॥ ८ ॥
देता झाला पादुका सेवालाभरतास[17] ॥
देउनि तिळजळ दशरथा देवाला भरतास ॥ ९ ॥
भरत परतला मुनिजनीं पीडा मग पाहून ॥
निघे चित्रकूटाख्य जो प्रभू त्या नगपा[18]हून ॥ १० ॥
निववी घटज[19]प्रमुख जे सुव्रत नव नव संत ॥

---

१ माधव चंद्रोबा यांनीं जें रामायणांचें एक पुस्तक छापलेलें आहे त्यांत एक दोहारामायण आहे. तें याहून अगदीं भिन्न आहे. त्यांत १०९ दोहरे आहेत व यांत ८४ आहेत. २ राजीव=कमल. ३ दर=भीति. ४ सकृत्=एकवार. ५ काम=इच्छा. ६ पीयूष=अमृत. ७ मंदर=कल्पवृक्ष. ८ गाधितनुजमख=विश्वामित्राचा यज्ञ. ९ दार=स्त्री. १० ईश्वर=शिव. ११ भृगुराम=परशुराम. १२ प्रळयानळसख=प्रळय काळचे अग्नीसारखा तीव्र. १३ गुरुसत्यव्रतरक्षणाकरितां=बापाचें वचन खरें करण्या करितां. १४ गतसार=वाळलेली. १५ दाम=माळ. १६ तनवास=वल्कलें धारण करणारा. १७ सेवा-लाभ-रत=सेवेची प्राप्ति इच्छिणारा. १८ नगप=पर्वतश्रेष्ठ. १९ घटज=अगस्त्य.

[20] मुनिवृंद प्रभु शोभवी तैसें न वन वसंत ॥ ११ ॥
वधुनि विराधा राक्षसा जो गृध्रांचा राय ॥
पितृसख सुखवुनि तन्मतें पंचवटीला जाय ॥ १२ ॥
तो दाशरथि प्रभु करी गोदातीरीं धाम* ॥
नासाकर्ण छेदवी शूर्पणखेचे राम ॥ १३ ॥
त्रिशिरा खरदूषण असे आले राक्षस शूर ॥
ते केले रघुनंदनें चवदा हजार चूर ॥ १४ ॥
प्रेषी मारीचा खळा शिकवुनि राक्षसभूप ॥
भ्रमवी सीतानयनमन तो कांचन[21]मृगरूप ॥ १५ ॥
सीता प्रभुसि ह्मणे पहा कनकमृग धरा जा च ॥
किंवा याचा सांपडुनि परम खळ करा जाच ॥ १६ ॥
होय समजुनि हि ती एणता[22] तसा मान्य ॥
स्त्रैणें[23] हिताहित हें जसें नेणतात सामान्य ॥ १७ ॥
हा सीते हा लक्ष्मणा गर्जुनि ऐसें प्राण ॥
सोडी तो मृग लागतां हृदयीं प्रभुचा बाण ॥ १८ ॥
वदली सीता लक्ष्मणा धांव न उटजीं[24] ठाक ॥
हा कठिना स्वस्थत्व हें ऐशी ऐकुनि हाक ॥ १९ ॥
लक्ष्मण वदला देवि हे राक्षसमाया[25] जाण ॥
स्वस्थ रहा प्रभुच्या करीं आहे कार्मुक[26]बाण ॥ २० ॥
ती बहु कोपें त्या ह्मणे खळा मरावा राम ॥
ऐसें चिंतिसि तूं मनीं माझा धरूनि काम ॥ २१ ॥
लक्ष्मण तीतें करि नमन गमन हि तेथुनि दूर ॥
पूर अश्रुंचा आंवरूं न शके तो जरी शूर ॥ २२ ॥
तों उटजीं यतिरूप दशवदन शिरे तत्काळ ॥
त्या स्त्रीरत्नातें हरी तो तस्कर सत्काळ[27] ॥ २३ ॥
केला विरथ जटायुनें तो क्षतविग्रह[28] चोर ॥
तत्पक्ष च्छेदुनि निघे न गणी अधर्म थोर ॥ २४ ॥
फिरतां मागें भेटला लक्ष्मण शोकें दीन ॥
त्यासि प्रभु ह्मणे बोल कां दिससी तेजें हीन ॥ २५ ॥

---

२० वृंद=समूह. * धाम=घर. २१ कांचनमृग=सोन्याचा हरिण. २२ एणता=हरिपणा. २३ स्त्रैण=स्त्रीवश. २४ उटज=पर्णशाळा. २५ माया=कपट. २६ कार्मुक=धनुष्य. २७ सत्काळ=सज्जनांचा शत्रु. २८ विग्रह=शरीर.

संचरती या राक्षस--श्वापदसंघ वनांत ॥
त्यजिली कशि ती एकटी जी मृदु भीरु[२९] वनांत ॥ २६ ॥
कसें मदाज्ञाभंग हें आलें आंग[३०] मनास ॥
वत्सा कारण कोणतें झालें आगमनास ॥ २७ ॥
सांग जें वदलि सती तें होऊनि पदलीन ॥
राम ह्मणे कदलीस ती गुणें समा वदली न ॥ २८ ॥
हाय ह्मणत उटजाकडे जाय रघूंचा राय ॥
घाय विरहदुःसह उरीं काय करील उपाय ॥ २९ ॥
राम ह्मणे न दिसे नसे या उटजाबाहेर ॥
वात पुरे आंत प्रिया तूं उठ जा बा हेर ॥ ३० ॥
आंत हि नसतां प्रियतमा हाय म्हणे रघुवीर ॥
सानुज साश्रु पुनःपुन्हा शोधी गोदातीर ॥ ३१ ॥
करितां शोध वनीं दिसे क्षतविग्रह तो तात ॥
झाले शोकाकुळ तसे जसे पुत्र होतात ॥ ३२ ॥
केली हे गति रावणें नेली सीता जाण ॥
विकळ जटायु असें कथी तत्क्षण सोडी प्राण ॥ ३३ ॥
तातसखाचें करुनियां दाहाद्युत्तरकार्य ॥
सद्गति देता नाहला न्हाया प्रमुदित आर्य ॥ ३४ ॥
पुनरपि फिरति वनांत तों योजनबाहु कबंध ॥
धरि असिनीं[३१] तद्भुज मथिति ते हरिते भवबंध ॥ ३५ ॥
शबरीस बरी भेट दे सद्गति कीर्त्ति हि राम ॥
बदरें[३२] पदरें घे तिचीं ज्याचें अमृत चि नाम ॥ ३६ ॥
पंपातीरीं मग वसे शंपा[३३]शतरुचि[३४]चापें[३५] ॥
संपाया धृति विरह दे कंपा उठवुनियां ताप ॥ ३७ ॥
भेटे मारुति मग करी सुग्रीवाची भेट ॥
झाले चिंतासागरीं अन्योन्या ते बेट ॥ ३८ ॥
वाळी[३६] भ्रात्या दुष्ट जो वाळी त्याचे प्राण ॥
श्रीराम प्रभु घे पळें एक चि हाणुनि बाण ॥ ३९ ॥
दुर्लभ तैल हि ज्यास तो जैसा आज्यप[३७] दास ॥
सुगळ योग्य केला तसा प्रभुनें राजपदास ॥ ४० ॥

---

२९ भीरु=भित्री. ३० आग=अपराध. ३१ असि=तरवार. ३२ बदरें=बोरें. ३३ शंपा=वीज. ३४ रुचि=कांति. ३५ चाप=धनुष्य. ३६ वाळी=टाकी. ३७ आज्यप=तूप पिणारा.

हटकि सुगळ बहु भेटती कीशें[३८] आसविल यास ॥
जे पटु अरिची न्यावया रणीं आस विलयाँस[३९] ॥ ४१ ॥
धाडी सुगळ करावया जनकसुतेचा शोध ॥
पूर्वोत्तर पश्चिम दिशा हुडकुनि आले योध ॥ ४२ ॥
जांबवदंगदमारुतिप्रमुख ऋक्षकपिवीर ॥
दक्षिण दिशेसि धाडिले बहु तेजस्वी धीर ॥ ४३ ॥
सांगे बंधु जटायुचा संपाती तो शोधें ॥
लंकेंत तिचा दशमुखें केला आहे रोधें[४०] ॥ ४४ ॥
मारुति शतयोजन जलधि लंघुनि गेला पार ॥
फार तयासि न वाटला दुर्घट हा व्यापार ॥ ४५ ॥
मनीं म्हणे कपि देखतां सती अशोकवनांत ॥
ग्रथिली उपनिषत्[४१]प्राकृता कशी पशो कवनांत ॥ ४६ ॥
रात्रौ परिसे शिंशपागत कवि कपि सारें च ॥
घे उतरुनि सतीमुखें हतभ विकपिसा रेंच ॥ ४७ ॥
क्षुद्रापगमें[४२]मावरि तिला मुद्रा[४३] दे हरि खेद ॥
रुद्रात्मा हित कथि जसा मुद्राशिप्रद[४४] वेद ॥ ४८ ॥
चूडामणि पाठवि जणों मूर्तिमंत अनुराग ॥
काककथा खुण कथि म्हणे अरिवरि[४५] करु धनु रागें[४६] ॥ ४९ ॥
कपि वन भंगुनि करि रणीं लक्ष अक्ष सह चूर ॥
भ्रमवुनि दशमुख विधिकडे दवडि पुरीचा धूर ॥ ५० ॥
पुसुनि सतीस पुन्हा उडे जेंवि शर प्रभुमुक्त ॥
लंघुनि जलनिधि होय तो अंगदादिकपियुक्त ॥ ५१ ॥
वंदुनि चूडामणि करीं प्रभुच्या दे कपिहीर[४७] ॥
आलिंगुनि मी तव ऋणी असें वदे रघुवीर ॥ ५२ ॥
प्रभुवर भाग्यें लागतां जनकसुतेचा शोध ॥
योध अमित घेउनि करी जवळ जलधिचें रोधें[४८] ॥ ५३ ॥
दशवदनें धिक्कारितां प्रभुतें वंदुनि पाय ॥
विनवि बिभीषण यासि दे अभय रघूंचा राय ॥ ५४ ॥
तो शरणागत निववला देउनि लंकाराज्य ॥

---

३८ कीश=वानर. ३९ विलय=नाश. ४० रोध=अटकाव. ४१ उपनिषत्=वेदांचे शेवटचे भाग. ४२ अपगम=निघून जाणें. ४३ मुद्रा=अंगठी. ४४ मुद्राशिप्रद=( मुत्+राशि+प्रद) आनंदाचा राशि देणारा. ४५ अरि=शत्रु. ४६ राग=क्रोध. ४७ हीर=श्रेष्ठ. ४८ रोध=तीर.

तें प्रेम तया वाढवी जेंवि ज्वलना आज्य ॥ ५५ ॥
प्रार्थुनि सागर युक्ति कथि निजजललंघनहेतु[४९] ॥
आज्ञापुनि नळवानरा करवि प्रभु वर सेतु ॥ ५६ ॥
प्रभु सेतुपथें उतरुनि प्रेषी अंगद दूत ॥
तन्मंत्रें[५०] खळ खवळला जेंवि अति मलिन भूत ॥ ५७ ॥
रामाज्ञेनें घालिती त्या कपिपृतना[५१] कास ॥
देती राक्षस हर्ष बहु होउनि मृत नाकास[५२] ॥ ५८ ॥
दशवदनाचे मारिले सचिव सुत हि समरांत ॥
अमरांत तनन[५३] होय विभु जय पद्म भ्रमरांत ॥ ५९ ॥
आकारें घटकर्ण[५४] तो केवळ पर्वत साचें[५५] ॥
प्रभुशर निजतेजोगुण प्रकटी सर्व तसा च ॥ ६० ॥
रुद्रबिभीषणयुत करी लक्ष्मण घननादान्त[५६] ॥
गुरुसत्संगाश्रित जसा षडहित[५७]हनना दांत[५८] ॥ ६१ ॥
शक्र[५९]रथीं बैसुनि करी श्रीश समरसत्रास[६०] ॥
क्षणमुदित क्षण जाहले सर्व अमर सत्रास[६१] ॥ ६२ ॥
धरणें पडे करावया यश परमायाकाय ॥
पर मायाधिपतिस[६२] करील वश परमाया[६३] काय ॥ ६३ ॥
कवि म्हणति विप[६४] प्रभुशरा दशानना कालाहि[६५] ॥
सोसे ती दुर्व्यसन[६६]जा दशा न नाकाला हि ॥ ६४ ॥
शंका हरुनि बिभीषणा रंका संगरधीर ॥
पंकापह[६७]गुणसिंधु दे लंका श्रीरघुवीर ॥ ६५ ॥
अरि वधिल्यावरि आणवी सीतेतें बाहेर ॥
करुनि प्रेम न आठवूं दिलें जिला माहेर ॥ ६६ ॥
प्रभु तिस ह्मणे धुवावया सोडविलीस[६८] यशास ॥
जन त्यजिलीस परकरगता व्हाविस मला कशास ॥ ६७ ॥

---

४९ हेतु=कारण, उपाय. ५० मंत्र=मसलत, उपदेश-पक्षीं भूत घालविणरा मंत्र. ५१ पृतना=सेना. ५२ नाक=स्वर्ग. ५३ तनन=आनंद दर्शक गानादि चिन्ह. ५४ घटकर्ण=कुंभकर्ण. ५५ साच=खरोखर. ५६ घननाद=इंद्रजित्. ५७ षडहित=काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, दंभ हे साहा शत्रु. ५८ दांत=जितेंद्रिय. ५९ शक्र=इंद्र. ६० समरसत्र=युद्धयज्ञ. ६१ सत्रास=भीतियुक्त. ६२ मायाधिपति=परमेश्वर. ६३ परमाया=दुसऱ्याचें कपट. ६४ विप=गरुड. ६५ कालाहि=काळसर्प. ६६ व्यसन=संकट. ६७ पंकापह=पापनाशक. ६८ यशास धुवावया ( म्यां तूं ) सोडविलीस=अपकीर्ति दूर करण्याकरितां म्यां तुला सोडविलें, म्यां तूं सोडविलीस, त्यजिलीस, अशा प्रकारचे कर्मणि प्रयोग मोरोपंताचे काव्यांत बरेच आढळतात. ते निरंकुशाः कवयः या न्यायानें आदरणीय होत.

यन्मन पतिच्या चिंतनीं स्मरणीं अनळसें[६९] तीस ॥
दिव्यें[७०] काय अवघड शिवों न शके अनळें[७१] सतीस ॥ ६८ ॥
दिव्यार्थ ज्वलनीं[७२] शिरे न च वचके उग्रास ॥
तिस तो होय तसा जसा ग्रीष्मीं जलमुग्रास[७३] ॥ ६९ ॥
शंकर विधि वदले विभो अंक[७४]रहित हें रत्न ॥
स्वीकारीं रघुनंदना निष्फळ न करीं यत्न ॥ ७० ॥
दशरथ हि ह्मणे न छळीं शुचिरुचि रुचिर सुदार ॥
रामा स्वीकारीं इचा महिमा परम उदार ॥ ७१ ॥
शक्र ह्मणे वधिला भला अरि क्रारि ताप मांग[७५] ॥
श्रीरामा जगदभयदा सुयशस्कर वर माग ॥ ७२ ॥
राम ह्मणे उठिव प्रभो दशशत[७६]नयना कीशीं[७७] ॥
उठवी वर्षुनि अमृत तो अदितितनय[७८] नाकीशीं[७९] ॥ ७३ ॥
करवी दिव्य प्रभु असें लोकप्रत्यय[८०]काम ॥
वाम अंकीं[८१] मग शोभवी श्रीतें स्थापुनि राम ॥ ७४ ॥
बसुनि विमानीं ऋक्ष कपि राक्षसपति[८२] सह राम ॥
प्रमुदित भरत कराया निघे त्रिजगदभिरामें[८३] ॥ ७५ ॥
प्रभुजी अंकीं प्रियतमा सेतु लक्षवी[८४] तीस ॥
म्हणे सुखाचे अविरहीं हेतु लक्ष वीतीस[८५] ॥ ७६ ॥
दाखवुनि स्वसहायें[८६] जे त्यांचें सांगे नाम ॥
तत्तद्विक्रम[८७]सत्कथा वर्णी जगदभिरामें ॥ ७७ ॥
श्रीसीतेतें निज पुटीं अंगद कळवी उक्त ॥
प्लवग[८८]वरांच्या पातल्या दारा तारायुक्त ॥ ७८ ॥
गोदावरीस पाहतां मोदीं[८९] वरी सदार[९०] ॥
न त्यजि मुक्ति वरावया ज्याच्या अटीस दार ॥ ७९ ॥

---

६९ अनळस=आळसरहित. ७० दिव्य=Ordeal. ७१ अनळ=अग्नि. ७२ ज्वलन=अग्नि. ७३ जलमुग्रास=जलमुच्+रास मेघसमूह. ७४ अंक=कालिमा. ७५ माग=पूर्वी. ७६ दशशत=सहस्र. ७७ कीश=वानर. ७८ अदितितनय=इंद्र. ७९ नाकीश=स्वर्गाचा स्वामी ( वस्तुतः नाकेश असें पाहिजे. यमकाकरितां नाकीश असें कवीनें लिहिलें आहे ). ८० लोकप्रत्ययकाम=सर्व लोकांची खातरी व्हावी अशी इच्छा ज्याची होती असा. ८१ अंक=मांडी. ८२ राक्षसपति=बिभीषण. ८३ अभिराम=सुंदर. ८४ लक्षवी=दाखवी. ८५ अविरहीं सुखाचे लक्ष हेतु वीतीस=समागम असला म्हणजे लक्षावधि सुखें देतेस. ८६ सहाय=मदतनीस. ८७ विक्रम=पराक्रम. ८८ प्लवग=वानर. ८९ मोद=आनंद. ९० सदार=सस्त्रीक.

दर्शन देउनि निववीला तो गुहनाम निषादें[११] ॥
सकळ हि पुरजन सह भरत हतवियोगविषादें[१२] ॥ ८० ॥
प्रभुचें प्रभुला नमुनी दे राज्य भरत भरतप्त ॥
स्तवि निज कुलतिलकासि तो सप्ति[१३] जयाचे सप्त ॥ ८१ ॥
अभिषेकमहें[१४] प्रोच्चें[१५] जो इतर निपट[१६] तो खर्व[१७] ॥
वर्णिति पुण्ययशःसुधा तृषित ऋषि तया सर्व ॥ ८२ ॥
श्रीराम सरसें[१८] मुदिर[१९] जे भक्त सकळ नर मोर ॥
साकेत[१००] असे प्रिय तैसें प्रभुदृष्टिस न रमोरें[१] ॥ ८३ ॥
निवुनि सुर सुखें नाचती प्रभुच्या दृष्टिसमोर ॥
प्रभुमूर्तिस कवि सेविती जैसे वृष्टिस मोर ॥ ८४ ॥

इति श्रीदोहारामायणं समाप्तम्

---

११ निषाद=भिल्ल, कोळी. १२ हतवियोगविषाद=नष्ट झालें आहे वियोगदुःख ज्याचें असा. १३ सप्ति=घोडे. १४ मह=आनंद. १५ प्रोच्च=मोठा. १६ निपट=अगदीं. १७ खर्व=लहान, ठेंगणा. १८ सरस=सजल. १९ मुदिर=मेघ. १०० साकेत=अयोध्या. १ रमोर=लक्ष्मीचें ऊर.

### मोरोपंतकृत

## सावित्रीआख्यानाचीं गीतें.[1]

मद्रदेशीं होता राजा महामती । नामें अश्वपती साधुमान्य ॥ १ ॥
आलें वृद्धपण नाहीं पुत्ररत्न । केले बहूयत्न करावे ते ॥ २ ॥
सावित्रीदेवीचें करी आराधन । देह दारा धन समर्पुनी ॥ ३ ॥
निष्ठेनें सर्वदा अष्टादश वर्षें । जप होम हर्षें चालवीतां ॥ ४ ॥
अग्निकुंडातूनी प्रकटली देवी । अश्वपती ठेवी पायीं शीर ॥ ५ ॥
देवी ह्मणे माग राजा ह्मणे माते । पुत्रदानें दाते लाजवावे ॥ ६ ॥
सावित्री ह्मणे म्यां स्वामी दयानीधी । वीनवीला विधी[2] तुज साठीं ॥ ७ ॥
दिली तूज पुत्रशताहूनी धन्या । पतिव्रता कन्या विचारूनी ॥ ८ ॥
ऐसें सांगोनि ती देवी गुप्त झाली । कन्या पोटीं आली मानवीच्या ॥ ९ ॥
पुत्राचें तैसें च विधीनें बा रसें[3] । सुदीनीं बारसें तीचें करी ॥ १० ॥
जिणें पूर्ण केला वरदानें काम । ठेवी तीचें नाम कन्यकेसी ॥ ११ ॥
रूपें गुणें कांहीं ऊणी न सावित्री । तशी नसावि त्रीभुवनांत ॥ १२ ॥
तिला न मागती राजपुत्र गुणें । स्वरूपासी ऊणें जाणोनीयां ॥ १३ ॥
राजा चिंता करी झाली उपवरें[4] । अनुरूप[5] वर न ये कोणी ॥ १४ ॥
सावित्रीला ह्मणे वत्से लग्नकाळ । आला न भूपाळ कोणी मागों ॥ १५ ॥
तूं ची वर स्वयें योग्य पहा जा गे । कोणी ही न मागे येऊनीयां ॥ १६ ॥
या माझ्या वचनें तुवां न कोपावें । तूज म्यां ओपावें योग्य हस्तीं ॥ १७ ॥
सावित्री पीत्याची आज्ञा मान्य करी । ठेवी पायांवरी मस्तकातें ॥ १८ ॥
पीत्याचा प्रधान कूळगूरू दाया । आप्तसमूदाया सह नीघे ॥ १९ ॥
गेली पृथ्वीवरी पहावया वरा । करी शोध बरा देशोदेशीं ॥ २० ॥
शोधी ती मानेसा नवरा जीवाला । नव राजीवाला[6] जैशी भृंगी ॥ २१ ॥
रसीकास जैशी कवीता ती सती । पाहे योग्य सती जनीं वनीं ॥ २२ ॥

---

१ मोरोपंती प्रकरणांच्या पहिल्या भागाच्या आरंभीं जें मोरोपंताचें चरित्र आम्हीं लिहलें आहे त्याचे १३ वे पृष्टांतील दुसऱ्या कलमाचे अखेरीस बायकांच्या ओव्यांच्या चालीवर मोरोपंतांनीं रुक्मिणीगीत व सीतागीत केलें त्याप्रमाणेंच सावित्रीआख्यान ही केलें आहे असें ऐकितों म्हणून लिहिलें आहे. तें पंढरी येथील पंतांचे वंशज मयूर पंडित यांनीं कृपा करून आम्हांस दिलेलें आमच्या वाचकांस आज सादर केलें आहे.
२ विधि=ब्रह्मा. ३ रसें=आनंदानें. ४ उपवर=लग्नास योग्य. ५ अनुरूप=योग्य. ६ राजीव=कमल.

एके दिवशीं आला संसारपारद । श्रीमुनी नारद मृत्युलोकीं ॥ २३ ॥
अश्वपतीला तो भेटे तपोधन । चातकाला घनँ स्वयें जैसा ॥ २४ ॥
अश्वपती पात्रे सूखास नमूनी । सूखासन मुनी अंगीकारी ॥ २५ ॥
सूधारस तूपें कीं सागर कूपें । तैसा मुनी भूपें सत्कारीला ॥ २६ ॥
उद्धाराया अश्वपतीराय कवी । कथा आयकवी पुरातना ॥ २७ ॥
अशा समयांत सावित्री ही आली । पायीं नम्र झाली दोघांच्या ही ॥ २८ ॥
नारद वीलोकी करूनीयां कृपा । ह्मणे तूझी नृपा कन्या कीं हे ॥ २९ ॥
कोठें गेली होती कोठोनी ही आली । सत्य श्रींची आँली रूपें गुणें ॥ ३० ॥
अहा उजवीलें कां न कन्यकेला । ईणें धन्य केला न कां कोणी ॥ ३१ ॥
राजा म्हणे स्वामी हे ची भूमीवर । पहावया वर धाडीली म्यां ॥ ३२ ॥
आतां ची आली हे सावित्री या धाँमीं । ईचें वाक्य स्वामी आयकावें ॥ ३३ ॥
वत्से सांग कोण वर त्वां पाहीला । ऐकाया राहीला स्वस्थ मुनी ॥ ३४ ॥
सावित्री ह्मणे हो शाल्वदेशपती । द्युमत्सेन अती विख्यांताहे ॥ ३५ ॥
धर्मन्यायनिष्ठ दाता सत्यसंधँ । झाला दैवें अंध वृद्धपणीं ॥ ३६ ॥
आलें अंधपण पुत्र तो ही बाळ । असा कष्ट काळ प्राप्त होतां ॥ ३७ ॥
शत्रूनें हरूनी राज्यभ्रष्ट केला । सस्त्रीपुत्र गेला तपोवनीं ॥ ३८ ॥
साहोनीयां वर्षा हिमा आतपाँला । तो महा तपाला करीतसे ॥ ३९ ॥
त्याचा पुत्र नामें सत्यवान् सुमती । वरीला तो पती भावें मनें ॥ ४० ॥
मुनी ह्मणे केलें सावित्रीनें खोटें । यांत पाप मोठें काय सांगों ॥ ४१ ॥
सत्य बोलतसे द्युमत्सेन राजा । बोले त्याची भार्जाँ तें ही सत्य ॥ ४२ ॥
स्वयें ही तो सत्य सर्वदा बोलतो । सत्वें चि डोलतो तपोवनीं ॥ ४३ ॥
चित्रीं लीहीं अश्व मृत्तिकेचा घडी । हा ची घडीघडी छंद त्यास ॥ ४४ ॥
ह्मणोनी सत्यवान् चित्राश्व हीं नावें । मुनींनीं स्वभावें ठेवीयेलीं ॥ ४५ ॥
आह्मां ठावें आहे त्याचें वृत्त सारें । आमूच्या विचारें चूकली हे ॥ ४६ ॥
राजा ह्मणे रूपें बरा आहे तो कीं । मुनी ह्मणे लोकीं तसा कैंचा ॥ ४७ ॥
राजा ह्मणे जाणे विद्या कळा कांहीं । मुनी ह्मणे नाहीं तैसा सुज्ञ ॥ ४८ ॥
राजा ह्मणे शौर्य कसा असे बोला । मुनी ह्मणे तोला महेंद्राशीं ॥ ४९ ॥
राजा ह्मणे आहे गूरूविप्रभक्त । मुनी ह्मणे व्यक्त भक्तीरस ॥ ५० ॥
राजा ह्मणे तरी नसेल तो दाता । मुनी ह्मणे हाता त्याच्या गावें ॥ ५१ ॥

---

७ घन=मेघ. ८ श्री=लक्ष्मी. ९ आलि=सखी. १० धाम=घर. ११ विख्यात=प्रसिद्ध. १२ सत्यसंध=खरी आहे संधा म्ह० प्रतिज्ञा ज्याची असा. १३ आतप=उष्ण. १४ भार्जा=स्त्री ( भार्या ).

राजा ह्मणे तरी क्षमा नाहीं काय । मुनी ह्मणे हाय नायकों हें ॥ ५२ ॥
राजा ह्मणे पाहे हरीहरां भेद । तेणें तूज खेद वाटतसे ॥ ५३ ॥
मुनी म्हणे शीवशिव हरीहरी । त्याची फार बरी दृष्टी आहे ॥ ५४ ॥
राजा म्हणे त्याच्या कोण दोष आंगा । स्पर्शलासे सांगा तुम्ही स्वामी ॥ ५५ ॥
मुनी म्हणे गूणग्रांमा[15] एक थोर । दोष चंद्रा घोर राहू जैसा ॥ ५६ ॥
त्या गूणमंदरें[16] वर्षमात्र आयु । जातां काळ वायू उन्मूळीलें[17] ॥ ५७ ॥
राजा म्हणे तृषा हरी त्या सुसरीं[18] । सेवावें दूसरा पहा बाई ॥ ५८ ॥
सावित्री म्हणे जो वरीला मीं मनें । तो ची गुरूजनें द्यावा मज ॥ ५९ ॥
तो सत्यवान् सत्य पती हो कल्पायू । किंवा हो अल्पायू अन्य पीता ॥ ६० ॥
त्याला ची वरील तूमची हे कन्या । तुम्हा सम अन्या पहातसे ॥ ६१ ॥
मुनी म्हणे राया स्थीरबुद्धी कन्या । हे सावित्री कन्या निश्चयाची ॥ ६२ ॥
सत्यवंता ऐसा गुणी नाहीं कोणी । पाहीली म्यां क्षोणी[19] वीचारूनी ॥ ६३ ॥
चित्राश्वाकारणें द्यावें कन्यादान । कांहीं अनमान करूं नको ॥ ६४ ॥
धर्में वर्त्ते त्याचा ईश्वर कैवारी । सर्वानर्थ वारी धार्मीकांचे ॥ ६५ ॥
तुम्हां समस्तांचें कल्याण असावें । जातों मीं बसावें स्वस्थ तुवां ॥ ६६ ॥
ऐसें बोलोनी तो मुनी स्वर्गा जाय । गेला तो ही राय तपोवना ॥ ६७ ॥
द्युमत्सेना भेटे म्हणे अश्वपती । तूझ्या पुत्राप्रती कन्या देतों ॥ ६८ ॥
द्युमत्सेन म्हणे आमूची हे गती । अन्य क्षीतीपती काय थोडे ॥ ६९ ॥
तुझी एकूलती कन्या भाग्यवती । सुखोचिता अती सुकूमारी ॥ ७० ॥
नाहीं सूखगंध राज्यभ्रष्ट अंध । अशाशीं संबंध कां रूचला ॥ ७१ ॥
अश्वपती म्हणे सत्यशीलधन । हें चि सुज्ञजन इच्छितात ॥ ७२ ॥
संकटाला भीऊं नये सत्वरतें । जातें सत्वर तें सोडूनीयां ॥ ७३ ॥
निश्चयें घेऊनी आलों कन्यकेला । अर्थी[20] धन्य केला पाहिजे हो ॥ ७४ ॥
द्युमत्सेन म्हणे अतीथी तूं पूर्ण । तुझा कामें[21] पूर्ण करावा ची ॥ ७५ ॥
पाचारीले त्यांहीं सर्व तपोनीधी । लग्न यथावीधी संपादीलें ॥ ७६ ॥
परमार्थदृष्टा हिमालया परी ॥ कन्यादान करी अश्वपती ॥ ७७ ॥
कन्या निरखीतां पडे महीवर । राया गहींवर आंवरेना ॥ ७८ ॥
सावित्री पित्याच्या नेत्रांतें पदरें । पूसूनी आदरें समजावी ॥ ७९ ॥
घेऊनी निरोप नीघे अश्वपती । ती सावित्री सती स्वस्थ राहे ॥ ८० ॥
हर्षली पावोनी जशी सती भर्गी[22] । वनाहूनी स्वर्गा तुच्छ मानी ॥ ८१ ॥

---

१५ ग्राम=समूह. १६ मंदर=स्वर्गवृक्ष, कल्पवृक्ष. १७ उन्मूळील=उपटून टाकील. १८ सुसर=उत्तम सरोवर. १९ क्षोणी=पृथ्वी. २० अर्थी=याचक. २१ काम=इच्छा. २२ भर्ग=शिव.

तशी च सावित्री आनंदली मनीं । क्रीडे तपोवनीं पतीसंगें ॥ ८२ ॥
वांटी बहू स्वल्प वस्त्र नग[२३] ठेवी । वल्कलें ती देवी सुखें नेसे ॥ ८३ ॥
श्वशूरांची[२४] आज्ञा जशी च वेदाची । तीळ ही भेदाची बुद्धी नाहीं ॥ ८४ ॥
कुळदेवता ची ती श्वश्रू[२५] मानीली । पूजीली वानीली सावित्रीनें ॥ ८५ ॥
केवळ अतीथी अभ्यागत बाळ । करी प्रतीपाळ माता सती ॥ ८६ ॥
मानीयला शाकफळमूळकंद । रसाहूनि मंद सुधारस[२६] ॥ ८७ ॥
बोलावें सस्मित[२७] मृदू परीमीत । सत्य प्रिय हित बोलवील्या ॥ ८८ ॥
सर्वांच्या मागूनी तृणशय्ये वरी । सुखें निद्रा करी ऊठे आधीं ॥ ८९ ॥
एकांतीं पतीचें हृदय रमवी । संताप शमवी सेवाधर्मे ॥ ९० ॥
न पडे विसर मनींच्या शद्बाचा । अवधी अब्दांचा[२८] सदा मोजी ॥ ९१ ॥
जसा तो अवधी होय देह ऊणा । नित्य ताप दूणा सावित्रीचा ॥ ९२ ॥
उरले दीवस अवधीचे चार । व्रताचा विचार करी मनीं ॥ ९३ ॥
उपोषण तीन दीवस करावें । शेवटीं मरावें पतीसह ॥ ९४ ॥
त्रिदनव्रताचा संकल्प करूनी । बैसली धरूनी नियमातें ॥ ९५ ॥
दुःख पावे राजा तीच्या त्या निश्चयें । आहारार्थ स्वयें असें प्रार्थी ॥ ९६ ॥
म्हणे बाई मज अंधाकडे पाहें । उपोषण कां हें आरंभीलें ॥ ९७ ॥
मुली हा उपास तिसरा कीं आहा । कां हे कष्ट महा करीतीस ॥ ९८ ॥
गुर्वाज्ञापालनव्रत[२९] कुलीनेतें । बाई मुली नेतें सुखें स्वर्गा ॥ ९९ ॥
सावित्री म्हणे जी नका होऊं श्रमी । उद्यां व्रतास मी उजवीन ॥ १०० ॥
कळेल करीतें व्रत ज्या कारणें । करीन पारणें उद्यां याचें ॥ १ ॥
राजा म्हणे तरी घडो हें अव्यंग । कोणी व्रतभंग करूं नये ॥ २ ॥
न भोगीतां अशी संतापतीव्रता । संतां पतिव्रता सदा मान्या ॥ ३ ॥
ऐसें सांगोनीयां हीत ऊगा राहे । राजा वाट पाहे उदयाची ॥ ४ ॥
चवथे दीवशीं प्रातःकाळीं सती । समाप्त व्रत ती करी भावें ॥ ५ ॥
नमस्कारी श्वश्रूश्वशूरचरणा । पतीच्या मरणा चुकवाया ॥ ६ ॥
म्हणती सौभाग्यवती पुत्रवती । चिरकाळ पती सह नांदें ॥ ७ ॥
ऐसें च म्हणती तपोधन मुनी । मागतां नमूनी आशीर्वाद ॥ ८ ॥
आशीर्वादवर गुरूंचे साधिले । पदरीं बांधिले सावित्रीनें ॥ ९ ॥
आली तपोधना करूनी प्रणती । वडील म्हणती भक्ती करी ॥ १० ॥
विनवी जोडूनी हात त्या कारणें । करीन पारणें अस्तमानीं ॥ ११ ॥

---

२३ नग=अलंकार. २४ श्वशुर=सासरा. २५ श्वश्रू=सासू. २६ सुधा=अमृत. २७ स्मित=किंचित् गालांत हंसणें. २८ अब्द=वर्ष. २९ गुरु=वडील माणसें.

मनीं च सावित्री वाहे काळजीला । दिसे काळ जीला क्षणक्षणा ॥ १२ ॥
सत्यवंत स्कंधीं परशू[30] वाहोनी । स्त्रीकडे पाहोनी वना निघे ॥ १३ ॥
सावित्री म्हणे जी मी येथें वनाला । वियोग मनाला न सोसवे ॥ १४ ॥
तो म्हणे त्वां केलीं उपोषणें तीन । झाला शक्तिहीन देह तूझा ॥ १५ ॥
वर्णावीं पाऊलें तुझीं नवनीतें[31] । मग न वनीं तें कठीनांचें ॥ १६ ॥
सुखद नव्हे तें दुःखद काननें[32] । म्हणसी कां न न आतां येतों ॥ १७ ॥
सती म्हणे मज दुःखांत ची सूख । तुमचें श्रीमूख विलोकीतां ॥ १८ ॥
स्वामीसंगें मज न बाधेल ताप । जसा भवताप संतसंगें ॥ १९ ॥
सत्यवंत ह्मणे कांते न रूसावें । तुवां हें पूसावें वडीलांस ॥ २० ॥
सासूसासऱ्यांतें म्हणे न कोपावें । मज हें ओपावें वरदान ॥ २१ ॥
फळें आणावया जातांना वनांत । माझ्या ही मनांत वाटे जावें ॥ २२ ॥
वर्ष झालें आल्या सोडूनी माहेर । आश्रमा बाहेर गेल्यें नाहीं ॥ २३ ॥
स्वामीसमागमें तपस्वी शरण्यें[33] । पाहेन अरण्य आज्ञा द्यावी ॥ २४ ॥
राजा म्हणे बाई वर्षांत त्वां कांहीं । मागीतलें नाहीं आह्मांपाशीं ॥ २५ ॥
वन पाहावया आज्ञा मागतीस । पायां लागतीस तरी जावें ॥ २६ ॥
वत्से उपवासी सुकूमारी बाळा । शीघ्र या सांभाळा अन्योन्यातें ॥ २७ ॥
वंदूनीयां सती नीघे झडकरी । धैर्य घड करी हृदयातें ॥ २८ ॥
पुष्पीत फलीत तरू मृग पक्षी । वनांतरीं लक्षी राजकन्या ॥ २९ ॥
पतीच्या सुखार्थ बळें आणी हास्य । मयूराचें लास्यें[34] विलोकूनी ॥ ३० ॥
विनोदवचनें पतीतें डोलवी । दाटूनी बोलवी पुण्य कथा ॥ ३१ ॥
एके नेत्रें प्रिया एके नेत्रें काळा । पाहे राजबाळा हृष्टा[35] भीता ॥ ३२ ॥
चित्राश्व वेंचूनी फळें पात्र भारी । मग काष्ठावरी घाव घाली ॥ ३३ ॥
शक्तींहूनी बहू घडतां आयास । तयाच्या कायास घर्म आला ॥ ३४ ॥
कठीणा काष्ठाच्या करीतां भेदना । उठली वेदना शिरीं भारी ॥ ३५ ॥
म्हणे प्रिय शूळ ऊठला मस्तकीं । धांवूनीं हस्तकीं साध्वी धरी ॥ ३६ ॥
म्हणे कधीं झाला ऐसा खेद नाहीं । शिरोवेदनांहीं धैर्य गेलें ॥ ३७ ॥
जाणों शूलाघातें मस्तक फाटतें । मनांत वाटतें निजावेंसें ॥ ३८ ॥
पतीच्या मस्तकाखालीं घाली मांडी । जाणो ऊशी मांडी कुसूमांची[36] ॥ ३९ ॥
धरूनी मस्तक मनीं म्हणे बाळा । आला ठोकताळा भविष्याचा ॥ ४० ॥
तों पुरूष पाशहस्त ऊभा आहे । असें साध्वी पाहे पुण्यबळें ॥ ४१ ॥

---

३० परशु=कुऱ्हाड. ३१ नवनीत=लोणी. ३२ कानन=अरण्य. ३३ शरण्य=रक्षक. ३४ लास्य=नाचणें. ३५ हृष्टा=आनंदी. ३६ कुसुम=फूल.

रक्तनेत्र कृष्णवर्ण तेजें अर्क । काळ असा तर्क मनीं केला ॥ ४२ ॥
हळू चि मस्तक उतरूनी ठेवी । उठोनी ती देवी हात जोडी ॥ ४३ ॥
म्हणे वा तूं देव काय तूझें नाम। कोण कार्य काम मज सांग ॥ ४४ ॥
काळ म्हणे शुद्धा म्हणोनी च तूज । सांगतों मी गूज पतीव्रते ॥ ४५ ॥
करिता जीवाची प्राणहानी यम । जाण हा नियम व्रतसिद्धे ॥ ४६ ॥
सरलें आयुष्य नीयत मान्या या । प्रियतमा न्याया तूझ्या आलों ॥ ४७ ॥
पतिव्रता म्हणे दूत कीं येतात । जीवाला नेतात तुजकडे ॥ ४८ ॥
स्वयें कां आलास काय केले दूत । प्रभूस प्रभूत[37] श्रम झाला ॥ ४९ ॥
यम म्हणे पितृभक्त सत्यवंत । यासि सर्व संत मानवती ॥ ५० ॥
कोणी रूपें गूणें नाहीं असा मान्य । सत्य असामान्य सत्यवंत ॥ ५१ ॥
दूत कैसा धाडूं न्यावया आशाला । रक्षाया यशाला स्वयें आलों ॥ ५२ ॥
ऐसें बोलोनीयां तो देव कीनाश* । घालोनीयां पाश बळें ओढी ॥ ५३ ॥
पुरूषांसी[38] राजा काढी गेहांतूनी । तसा देहांतूनी काढीयेला ॥ ५४ ॥
पुरूषं[38] काढीतां अंगुष्ठप्रमाण । निष्प्रभ[39] निष्प्राण देह झाला ॥ ५५ ॥
पाशांनीं बांधोनी सूक्ष्म पुरूषाला । घेऊनी नीघाला धर्मराज ॥ ५६ ॥
यापरी होऊनी कृतकार्य काळ । निघाला तत्काळ दक्षीणेला ॥ ५७ ॥
त्या मागूनी साध्वी तशी च नीघाली । न तीच्या नीघाली मनीं शंका ॥५८॥
सतीव्रतें तीच्या अंगा सिद्धी आली । आकाशांत झाली गती प्राप्त ॥ ५९ ॥
करी मनुष्यत्वापासूनी सूटका । जड ही गूटका न कां धर्म ॥ ६० ॥
यम म्हणे दूर पावीत आलीस । सावित्री झालीस उतराई ॥ ६१ ॥
जा उत्तम लोक प्राप्त व्हाया प्रिया । करीं सांग क्रिया यथाशक्ती ॥ ६२ ॥
सावित्री म्हणे गा देहा सवें छाया । जशी तशी जाया पती सवें ॥ ६३ ॥
प्राण जाऊं द्यावे पती न सोडावा । स्वधर्म जोडावा मुख्य हा ची ॥ ६४ ॥
गुरूंच्या तूझ्या ही प्रसादें आजी या । गतीला माझीया विघ्न नाहीं ॥ ६५ ॥
सात पदें गांठी जरी मार्गीं पडे । तरी मैत्री घडे सज्जनाशीं ॥ ६६ ॥
या न्यायें तूजशीं सख्य झालें वाटे । दोघें एके वाटे चालतसों ॥ ६७ ॥
तुजशीं बोलत्यें कांहीं मित्रभावें । तें त्वां आयकावें धर्मराजा ॥ ६८ ॥
इंद्रियें जिंकील्या विना केलें कर्म । त्यासी संत धर्म न ह्मणती ॥ ६९ ॥
गृहास्थाश्रमांत सर्व धर्म घडे । तेणें मळ झडे अंतरींचा ॥ ७० ॥
विषयवासनामळ जातां ज्ञान । होय समाधान आत्मलाभें ॥ ७१ ॥
गृहस्थाला सोपें न तसें अन्यास । न लागे सन्यास ज्ञाना साठीं ॥ ७२ ॥

---

३७ प्रभूत=पुष्कळ. * कीनाश=यम. ३८ पुरुष=आत्मा. ३९ निष्प्रभ=निस्तेज.

असें म्यां ऐकिलें ऐसें च कीं बा हें । विचारूनी पाहें धर्मराजा ॥ ७३ ॥
धर्म म्हणे बाई मदालसा धन्या । कीं तूं नसे अन्या आढळली ॥ ७४ ॥
रोमांच माझीया देहीं ऊभारती । तुझी सुभारती[४०] आकर्णितां[४१] ॥ ७५ ॥
पतीविना देतों एक वर मागें । जा फिरोनी मागें भागलीस ॥ ७६ ॥
साध्वी म्हणे देसी जरी आज वर । तरीं राजवर द्युमत्सेन ॥ ७७ ॥
त्याचें अंधपण वृद्धपण जावें । गेलें तेज यावें अनायासें ॥ ७८ ॥
यम म्हणे हें म्यां दिलें महाभागे । परतोनी जा गे भागलीस ॥ ७९ ॥
साध्वी म्हणे मला कांहीं नाहीं श्रम । पतीसमागम सुखमय ॥ ८० ॥
दुर्लभ सत्संग दैवें प्राप्त जाला । सत्संगानें धाला नाहीं कोण ॥ ८१ ॥
सत्संग दीना श्री वना दे वसंत । धना देव संत ज्ञाना देती ॥ ८२ ॥
सत्संग दुर्लभ कामप्राप्तिहेतू । सत्संग हा सेतू भवार्णवीं[४२] ॥ ८३ ॥
यम म्हणे बाई तुझी दिव्य दृष्टी । अमृताची वृष्टी तुवां केली ॥ ८४ ॥
बोलतीस तैसें श्रुतीनें[४३] बोलावें । ऐकतां डोलावें जडांनीं ही ॥ ८५ ॥
वेधील विधीला बाई बोल तूझा । पतीविना दूजा वर मागें ॥ ८६ ॥
पतिव्रता म्हणे स्वराज्या आसरा । हो माझा सासरा द्युमत्सेन ॥ ८७ ॥
कोणा ही निमित्तें स्वधर्मातें जोडूं । सज्जानाच्या जोडूं प्रसादातें ॥ ८८ ॥
धर्म म्हणे दीलें जा बाई आश्रमा । त्वत्तनू या श्रमा योग्य नव्हे ॥ ८९ ॥
सावित्री म्हणे जे ज्ञानातें जोडीती । न तयां सोडीती तूझे पाश ॥ ९० ॥
नरकीं जीवास भोगवीसी ताप । केलें असे पाप ज्यांहीं जैसें ॥ ९१ ॥
त्वां पापी सर्व हीं निरयांसि[४४] नेला । यातना तयाला भोगावया ॥ ९२ ॥
शुद्ध पूरवूनी काम सभाजीला[४५] । तामस भाजीला कुंभीपाकीं[४६] ॥ ९३ ॥
जो द्रोह न करी कोणा ही भूताचा । त्या तूझ्या दूतांचा धाक नाहीं ॥ ९४ ॥
जो कोणी सर्वत्र करी अनुग्रहा । त्यासी अनुग्र[४७] हा तुझा देह ॥ ९५ ॥
सर्वत्र अद्रोह अनुग्रह दान । हें त्रय निधान[४८] कल्याणाचें ॥ ९६ ॥
संताच्या ठायीं हें धर्मत्रय वसे । इतरत्र नसे क्षणमात्र ॥ ९७ ॥
संतांसी जो आला शत्रू ही शरण । तयासी मरण न ते देती ॥ ९८ ॥
सर्वां ही संतांत मुख्य तूं बा धर्म । तूझें पुण्यकर्म काय वर्णूं ॥ ९९ ॥
यम म्हणे जशी तान्हेल्यासी सूधा । तूझी वाणी बूधा मज तशी ॥ २०० ॥
पतीविना इष्ट वर माग तीजा । पर मागती[४९] जा श्रमी न हों ॥ १ ॥

---

४० भारती=वाणी, भाषण. ४१ आकर्णितां=ऐकतां. ४२ अर्णव=सागर. ४३ श्रुति=वेद. ४४ निरय=नरक. ४५ सभाजीला=पूजीला. ४६ कुंभीपाक=नरकविशेष. ४७ अनुग्र=उग्र (क्रूर) नव्हे असा. ४८ निधान=ठेवा. ४९ मागती=परत.

सती म्हणे ताता दे औरस शत । पुत्र धर्मरत वंशाकर ॥ २ ॥
यम म्हणे शुचिव्रतारंभरते[50] । भ्राते शंभर ते पहाशील ॥ ३ ॥
स्वस्थाना जा शीघ्र दूर तूं आलीस । श्रमी कीं झालीस बाढ[51] वेळ ॥ ४ ॥
साध्वी म्हणे आहे पतीसान्निधानें[52] । अती सन्निधान[53] सुखाचें हें ॥ ५ ॥
तुझा उत्पादक[54] विश्व भासवीता[55] । देव हा सवीता जगदात्मा ॥ ६ ॥
अत्यंत हीत तूं सम पुण्यकाम । सत्य तूझें नाम धर्मराज ॥ ७ ॥
फळतो दगड धरीतां विश्वास[56] । हें आहे विश्वास[57] अवगत ॥ ८ ॥
मग संतीं दृढ ठेवूनी विश्वास । सोडीला निश्वास उष्ण कोर्णी ॥ ९ ॥
यम म्हणे बाई धन्या तूं सुशीला । आलीस कुशीला जीच्या ती ही ॥१०॥
दिलें त्वां सूख हें वर्णवे दान न । वर्ण[58] वेदानन[59] व्यालें असे ॥ ११ ॥
तूझ्या शब्दामृता तृप्तीच्या हेतूला । प्राशून हे तूला कर्ण गाती ॥ १२ ॥
पतीविना वर मागें चवथा न । मागें चव थान ठेवी पार्नी ॥ १३ ॥
ती सती मुरली गायें[60] कृष्णसार[61] । काय कृष्ण सार यमधर्म ॥ १४ ॥
चित्राश्वाची जाया योग्य पुत्रशत । पावो सती व्रत स्वस्थ राहो ॥ १५ ॥
म्हणे दिले पुत्र शंभर हीताचे । दंभरहीताचे धर्म जैसे ॥ १६ ॥
आतां तरी बाई सावित्री परतें । भूमीला भर तें झालें शव ॥ १७ ॥
साध्वी म्हणे देवा जी धर्मसंतती । इच्छीती संत ती धर्मासाठीं ॥ १८ ॥
संतांची शाश्वत धर्मीं चित्तवृत्ती । अधर्मीं प्रवृत्ती स्वप्नीं नसे ॥ १९ ॥
संतांची संसारनदीनौका कथा । त्या संतांसी व्यथा कासयाची ॥ २० ॥
साधू संतगंगायमूनांचे ओघ । हा संगम मोघ[62] कधीं नाहीं ॥ २१ ॥
संतांपासूनीयां संतां भय झालें । असें काना आलें नाहीं कधीं ॥ २२ ॥
संत चालवीती सत्यें तरणीतें[63] । तपें धरणीतें धरीताती ॥ २३ ॥
किंबहूना संत सर्वांची ही गती । संत मुक्तीपती संत ज्ञान ॥ २४ ॥
व्रत चालवी तें एक संतराय । नामें अंतरायें[64] जाती दूर ॥ २५ ॥
प्रसाद शाश्वत अर्थ बहू मान । यांचें मूलस्थान संत तुम्ही ॥ २६ ॥
यम म्हणे वाणी[65] नव्हे बोलकी ती । बाई बोलें[66] कीती तूझे वर्णूं ॥ २७ ॥
तूज वर्णावया नाहीं मज शक्ती । तूझे ठायीं भक्ती माझी झाली ॥ २८ ॥
पांचवा अद्भूत वर महाभागे । माग न हा भागे वर देतां ॥ २९ ॥

---

५० शुचिव्रतारंभरते=पवित्र व्रत आरंभण्या विषयीं प्रीति आहे जीची अशे. ५१ बाढ=पुष्कळ. ५२ संनिधान=समीपता. ५३ सन्निधान=उत्तम ठेवा. ५४ उत्पादक=बाप. ५५ भासविता=प्रकाशविता. ५६ विश्वास=भाव. ५७ विश्व=जगत्. ५८ वर्ण=अक्षरें, शब्द. ५९ आनन=मुख. ६० गाय=गाई, गात असे. ६१ कृष्णसार=हरिण. ६२ मोघ=निष्फल. ६३ तरणी=सूर्य. ६४ अंतराय=विघ्न. ६५ वाणी=सरस्वती. ६६ बोल=शब्द.

सावित्री म्हणे बा देवा वरदान । तूझें वरदा न व्यर्थ व्हावें ॥ ३० ॥
स्वसत्य सांभाळा मत्पती वांचवा । द्या वर पांचवा हां ची मज ॥ ३१ ॥
स्वर्गीं भाग्य सूख शत पुत्र जीणें । नको पतीविणें मज देवा ॥ ३२ ॥
वांचवावा माझा भर्त्ता सत्यवंत । देवा सत्यवंत त्वां ही व्हावें ॥ ३३ ॥
शतपुत्रवर दयेनें देऊनी । पतीला घेऊनी कसा जासी ॥ ३४ ॥
धर्म म्हणे बाई प्रताप हा भला । जिंकीलें त्वां मला पतिव्रते ॥ ३५ ॥
मार्कंडेया जशी तारी शंभुभक्ती । तशी तुझी शक्ती सत्यवंता ॥ ३६ ॥
बाई म्यां तूझा हा भर्त्ता केला मुक्त । याशीं तूं हो युक्त चीर काळ ॥३७॥
पती सह राज्य चार शत वर्षें । करीशील हर्षें धर्मन्यायें ॥ ३८ ॥
षड्रिपू होतील नत पतिव्रते । न तप तीव्र ते साहतील ॥ ३९ ॥
ऐसें सांगोनी तो गुप्त झाला धर्म । प्रकटलें शर्म[६७] सतीमनीं ॥ ४० ।
आली जेथें होतें वनीं कलेवर[६८] । मनीं केले वर चमत्कार ॥ ४१ ॥
बैसे घेऊनी तें शिर मांडीवर । चिर मांडी वरशुश्रूषा[६९] ती ॥ ४२ ॥
संज्ञा पावोनी तो उघडी नयन । करूनी शयन उठलासा ॥ ४३ ॥
वाटे जाऊनी तो आला परदेशा । सती वरदेशा मनीं वंदी ॥ ४४ ॥
पदरें पूसूनी मूख घाली वारा । जपे सती दारा मातेपरी ॥ ४५ ॥
म्हणे कांते तूज चिर भागविलें । कां न जागवीलें तुवां मज ॥ ४६ ॥
पुरूष ओढीत होता मज श्याम । तो कोठें तन्नाम काय सांग ॥ ४७ ॥
पाहीला स्वप्नीं कीं सत्य तो देखीला । म्यां मनीं लेखीला सत्य काळ ॥४८॥
सावित्री म्हणे तो पापपुण्यकर्म । फळदाता धर्मराज देव ॥४९ ॥
गेला स्वस्थानाला आम्ही जाऊं चला । तुम्हीं न ऊचला भार कांहीं ॥५०॥
रात्र झाली गुरू चिंतेला वाहात । वाटेला पाहात असतील ॥ ५१ ॥
निजलों त्वदंकीं बहू घोरत मी । तसा घोर तमीं देखीला तो ॥ ५२ ॥
स्वप्न कीं सत्य हें कसें काय सांग । आठवीतां अंग थरारतें ॥ ५३ ॥
साध्वी म्हणे तुम्हीं न धरावी व्यथा । सांगेन हे कथा उद्यां सारी ॥ ५४ ॥
सत्यवंत म्हणे अंधकार दाट । वनीं कशी वाट सांपडेल ॥ ५५ ॥
सती म्हणे शुष्क वृक्षीं तो दहन[७०] । दीसतो गहन[७१] प्रकाशीतो ॥ ५६ ॥
उपाय दीसाया वाट भली तमीं । चला अलातें[७२] मीं हातीं घेतें ॥ ५७ ॥
अथवा नसेल शक्ती तरी राहूं । प्रात:काळीं पाहूं गुरूपती ॥ ५८ ॥
सत्यवंत म्हणे वृद्ध मायबाप । पावतील ताप वियोगानें ॥ ५९ ॥

६७ शर्म=सुख. ६८ कलेवर=शरीर. ६९ वरशुश्रूषा=नवऱ्याची सेवा. ७० दहन=अग्नि. ७१ गहन=अरण्य. ७२ अलात=कोलीत

घर्डीत शतदां मज स्मरतील । शोकें मरतील निःसंदेह ॥ ६० ॥
मी शोकें हा प्राण सोडीन हें जाण । सत्य तुझी आण वाहातसें ॥ ६१ ॥
ऐसें म्हणोनी तो पितृभक्त रडे । सत्यवंत पडे स्त्रीच्या गळां ॥ ६२ ॥
सावित्री म्हणे म्यां स्वधर्म जोडीला । असेल सोडीला दुष्ट मार्ग ६३ ॥
तरी यांसी त्यांसी सुखें भेटी घडो । संकट न पडो कोणा कांहीं ॥ ६४ ॥
सत्यवंत म्हणे कसें तरी करीं । सावित्री उद्धरीं दुःखांतूनी ॥ ६५ ॥
उठोनी प्रथम स्वकेश सांवरी । सावित्री त्यावरी सत्यवंता ॥ ६६ ॥
चित्राश्व तो तीच्या बळें उभा राहे । पात्राकडे पाहे फळांच्या तो ॥ ६७ ॥
सती म्हणे येव्हां वृक्षीं राहो पात्र । प्ररशू हा मात्र मी च घेत्यें ॥ ६८ ॥
जेणें सर्प शुंडाकार तो तोडावा । पतीचा तो डावा रम्य बाहू ॥ ६९ ॥
वाहे वाम[७३]स्कंधीं आपूल्या ती सती । स्वदक्षी[७४]नें पती आलिंगूनीं ॥ ७० ॥
निघाली तों वनीं चंद्रिकीं[७५] दीवटी । होउनी नीवटी[७६] अंधकारा ॥ ७१ ॥
एरीकडे आली द्युमत्सेना दृष्टी । दीसे सर्व सृष्टी यथापूर्व ॥ ७५ ॥
गेलें अंधपण नूमजला तो हें । झाला पुत्रमोहें पुन्हा अंध ॥ ७३ ॥
भार्येसह नृपें सर्वां ही ऋषींतें । पूशीलें ऋषी ते जसें पाणी ॥ ७४ ॥
शोधूनी सस्त्रीक भूप तो रडला । मूर्छीत पडला पुत्रशोकें ॥ ७५ ॥
करीती वीलाप जेव्हां ते दंपती[७७] । समाधी संपत्ति ब्राह्मणांचे ॥ ७६ ॥
मिळाले पावोनि ताप सखे दहा । तापस खेद हा नीवाराया ॥ ७७ ॥
स्त्रीसह तो राजा आश्रमांत नेला । त्यांहीं बोध केला परोपरी ॥ ७८ ॥
सुवर्चा गौतम दाल्भ्य मुनीराज । धौम्य भरद्वाज आपस्तंब ॥ ७९ ॥
ह्मणती संताप हा जाईल क्षणें । उत्तम लक्षणें सावित्रीचीं ॥ ८० ॥
सूचवीतो दृष्टीलाभ महोदया । ऐका अहो दया देवाची हे ॥ २८१ ॥
धरीं ब्राह्मणाच्या वचनीं विश्वास । बा उष्ण निश्वास सोडूं नको ॥ २८२ ॥
ऐसें जों बोले ती मंडळी मावली । तों साध्वी पावली पतीसह ॥ २८३ ॥
भूपाहूनी बहू ब्राह्मण हर्षले । मेघसे वर्षले आशीर्वादें ॥ २८४ ॥
राजासी म्हणती आलें कीं प्रत्यया । बोलतो सत्य या मूखें वेद ॥ २८५ ॥
पुसती वत्सा कां विलंब लागला । नृपाळ भागला चिंताभारें ॥ २८६ ॥
शिरीं बाधा झाली फोडीतां लांकडें । नीजलों सांकडें पडलें हें ॥ २८७ ॥
नाहीं जागवीलें ईणें घोर तमीं । सुखें घोरत मी नीजलों च ॥ २८८ ॥
गौतम म्हणे बा बोलीलासि खरें । परी तत्व बरें नेणसी तूं ॥ २८९ ॥

---

७३ वाम=डावा. ७४ दक्ष=उजवा. ७५ चंद्रिका=चांदणें. ७६ निवटी=नाशी. ७७ दंपती=नवराबायको.

अकस्माद्दृष्टीचा लाभ असा अंधा । राया सत्यसंधा द्युमत्सेना ॥ २९० ॥
सांवित्री बाई तूं * * * *
ती सती तें सर्व वृत्त आयकवी । तेव्हां काय कवी विसरले ॥ २९२ ॥
करिती ते बंदीसम स्तव मुनी । समस्त वमूनी मानविष ॥ २९३ ॥
अश्वपतीकन्या सावित्री हे धन्या । अशी नाहीं अन्या पतिव्रता ॥ २९४ ॥
सावित्रीनें दोनीं कूळें उद्धरीलीं । कीर्तीनें हरीलीं पापदुःखें ॥ २९५ ॥
स्तवूनी पूसोनी मनांत नमूनी । सनातनं[७८] मुनी स्थळा गेले ॥ २९६ ॥
प्रातःकाळीं प्रजा येऊनी प्रणती । करूनी म्हणती द्युमत्सेना ॥ २९७ ॥
तुमच्या प्रधानें मारीला अराती[७९] । सनाथा करीं ती राजधानी ॥ २९८ ॥
न्यावयासी आलें चतुरंग[८०] सैन्य । शत्रुपक्षीं दैन्यदुःख गेलें ॥ २९९ ॥
गौतमादि सर्व तपोधन वंदी । प्रेमें होय बंदी[८१] द्युमत्सेन ॥ ३०० ॥
करी मुक्त करीसम स्तवनातें । समस्त वनातें प्रदक्षिणा ॥ ३०१ ॥
बैसे राजपदीं होय पूर्णकाम । तो जसा श्रीराम अयोध्येंत ॥ ३०२ ॥
सावित्रीची कथा सज्जनांसी तशी । मयूरास जशी मेघमाला ॥ ३०३ ॥
सावित्रीच्या कथा गातील ज्या स्त्रिया । होतील त्या प्रिया बहू मान्या ॥३०४॥
सावित्री सावित्री असें जे म्हणती । कल्याणा गणती नाहीं त्यांच्या ॥३०५॥
सावित्रीस्मरण सावित्रीपूजन । सावित्रीकीर्तन सत्यसार ॥ ३०६ ॥
पतिव्रता तरे पतिव्रता तारी । पतिव्रता नारी जगदंबा ॥ ३०७ ॥

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं प्राकृतओवीबद्धं सावित्रीचरितं समाप्तं

---

७८ सनातन=पुरातन. ७९ अराती=शत्रु. ८० चतुरंग=हत्ती, घोडे, पायदळ, व रथ हीं आहेत चार अंगें ज्याचीं असें. ८१ बंदी=स्तुति करणारा. * आमच्याकडे आलेल्या हस्तलिखित प्रतींत ही ओवी अशीच अपुरी आहे.

## मोरोपंतकृत

# गदाधरस्तुति

श्रीवैकुंठीं देसी पितरां सह तूं गदाधरा वास[1] ॥
नमुनि स्तवुनि प्रेमें पूजुनि हृदयीं सदा धरावास ॥ १ ॥
व्हावे परम शुचि तुझ्या नामस्मरणें गदाधरा पतितें[2] ॥
त्यजुनि तुतें न भजावें देतां ही निज पदा धरापतितें[3] ॥ २ ॥
त्वां प्रभुनें वैकुंठ चि केलें वसवूनि फल्गु[4]तीर सदा ॥
तुज सिंधु[5] हे जशी श्री[6] जी बोले बोल[7] वल्गु[8] ती रसदा[9] ॥ ३ ॥
म्हणती गततापें[10] मुदितें[11] ऋणभारें सर्व मोड कळलाहो ॥
प्रभुजी भवत्प्रसादें[12] भवतरूंचा[13] संग मोडकळला हो ॥ ४ ॥
पाप्यास हि मुक्तिप्रद तूं जेंवि गदाधरा पवित्रास ॥
बा त्वत्प्रणाम देतो संसारगदाधरा[14] पवित्रास[15] ॥ ५ ॥
आणुनि तुज भेटविती तारिति जीवांस जे गयावळ ते ॥
त्वद्रूप चि हे नसते तरि करुनि कसे वनीं[16] दया वळते ॥ ६ ॥
प्रल्हादा तेंवि दिला त्वां याला कीर्तिसाज[17] वरदानें[18] ॥
बहुतांसि देत आले हे सद्गतिचीं च आजवर दानें ॥ ७ ॥
देवा गदाधरा त्वां प्रभु केले बंधमुक्ति ओपाया ॥
सर्वांस म्हणति जन हो याचि पथें सुगति हा चि सोपा या ॥ ८ ॥
केले स्वसम चि वरदा देवा त्वां विप्र हे गयावासी ॥
यांतें बद्धकर सकळ मुख यांची व्हावया दया वासी ॥ ९ ॥
छळिला बळि लागे हा शब्द दहांचा प्रभो तुला हितसा ॥
बहुधा गयावळा ही हित ही न गमे पिता मुला हि तसा ॥ १० ॥
देवा गदाधरा तूं स्वविभूतिद्विजसमाज हा वाळिव ॥
माळिव न यश करुणास्पद[19] निज भक्त मयूर हें चि बा काळिव ॥ ११ ॥
पाव गदाधर देवा नांव तुझें मम मुखीं सदा राहो ॥
भाव तव पदीं च वसो नाव भवाब्धींत तूं सदारा[20] हो ॥ १२ ॥

---

१ वास=राहणें. २ पतित=पापी. ३ धरापति=राजा. ४ फल्गु=नदीविशेष. ५ सिंधु=नदी. ६ श्री=लक्ष्मी. ७ बोल=शब्द. ८ वल्गु=सुंदर, गोड. ९ रसदा=आवडणारी. १० गतताप=गेले आहेत ताप ज्यांचे. ११ मुदित=आनंदित. १२ भवत्प्रसाद=तुझी कृपा. १३ भवतरु=संसारवृक्ष. १४ संसारगदाधर=संसाररोगरूपी पर्वत. १५ पवित्रास=वज्रापासून होणारी भीति. १६ वन=उदक, अरण्य. १७ कीर्तिसाज=कीर्तिरूपीपोषाग. १८ वरदानें=वरद जो तूं त्या त्वां. १९ करुणास्पद=दयेस योग्य. २० सदार=स्त्रीसह.

वाहे विपत्प्रवाहीं त्या आप्त हि भुज न दे वदे वाहें ॥
तैसा न दीनबंधो तूं गाती सुजन देवदेवा हें ॥ १३ ॥
प्रभुचीं नामें चिन्हें सप्रेम मुखें वदा धरा देहें ॥
यश गा वशगा होइल मुक्ति कवि म्हणति गदाधरा दे हें ॥ १४ ॥
पळ ही गदाधरा तुज ऋणभाराकुळ न लक्षवे दास ॥
आढळलें त्वद्यशसें यश न त्रिजगीं वलक्ष[21] वेदास ॥ १५ ॥
नमुनि गदाधर देवा हे वाणी वाहिली तुझ्या चरणीं ॥
दुसरी न घडे सेवा दे वात्सल्यें मना रुचि स्मरणीं ॥ १६ ॥
उडवीं पितरांचें जें ऋण तें तृण तेंवि पूर्वी काम ॥
हे श्रीगदाधरस्तुति ऋणतृणवात्या[22] असें इचें नाम ॥ १७ ॥
इति श्रीरामनंदनमयूरविरचिता श्रीगदाधरस्तुति

---

## बिंदुमाधवस्तुति

श्रीबिंदुमाधवा तूं सदय सदा मज पदा नता पावें ॥
शरणागतें तुझ्या वा लक्ष्मीरमणा कदा न तापावें ॥ १ ॥
दीनोद्धार महाव्रत विश्वेश प्रभुवरें जसें काय ॥
स्वीकारिलें तुवां ही स्वीकारुनियां दया रसें[23] काय ॥ २ ॥
दिसतां भिन्न परि तुम्ही एक चि पाहे तुझांत नो भेद ॥
वेद स्पष्ट म्हणतसे प्राप्त तया होय भय महा खेद ॥ ३ ॥
उद्धरिले बहु पापी तुझिया श्रीबिंदुमाधवा नांवें ॥
विश्वेश्वरयशसें चि त्वद्यश ही अत्युदार वानावें[24] ॥ ४ ॥
ताप हरुनि सुख देतें तुमचें सत्कीर्तिगायनव्यंजन[25] ॥
वर्णी असें पुराणीं श्रीव्यास न हा चि गाय नव्य[26] जन ॥ ५ ॥
आराधुनि स्वयें त्वां ईशा विश्वेश्वरा सदाराध्या ॥
उपदेशिलें त्रिजग कीं, या श्रितकल्पद्रुमा[27] सदारा ध्या ॥ ६ ॥
त्वां शिवपदपद्मावरि नियमें प्रेमें हि दृढतरें अमलें[28] ॥
उच्चारुनि शिवनामें तितुकीं च सहस्र वाहिलीं कमलें ॥ ७ ॥
निववावया बहु भरुनि साधूंचे निजयशोगुणें कान ॥
करिल सहस्रांत कमल एक प्रभु कौतुकी उणें कां न ॥ ८ ॥

---

२१ वलक्ष=शुभ्र. २२ वात्या=वावटळ. २३ रसें=प्रेमानें. २४ वानावें=वर्णावें. २५ व्यजन=पंखा. २६ नव्य=नवा. २७ श्रितकल्पद्रुम=भक्तांचे मनोरथ पुरविणारा कल्पवृक्ष. २८ अमल=स्वच्छ.

तूं हि महा शैव प्रभुचरणावरि नेत्र[२९]पद्मैं वाहूनी ॥
सत्यप्रतिज्ञ विष्णो जालासि शिवप्रसाद लाहूनी ॥ ९ ॥
संरक्षिला [३०]करींद्र प्राण[३१]व्यसनीं वधूनि [३२]नक्रातें ॥
शक्रातें असुर मथुनि सुखवी त्या गाति साधु चक्रातें ॥ १० ॥
तूं हरि भजसि शिवातें भजतो तुज मुक्तिदायका [३३]पुरहा ॥
[३४]युष्मद्यशोजित [३५]विधु हि म्हणतो न म्हणेल काय कापुर [३६]हा ॥ ११ ॥
भजतो शिव आराध्या तुज तूं हि भजसि शिवा चि आराध्या ॥
म्हणतां मुमुक्षु जे त्यां अस्मद्वेदाचि वेदसारा ध्या ॥ १२ ॥

---

## विश्वेशस्तुति

श्रीकंठा विश्वेशा बा तूं [३७]निरवधि [३८]दयासुधासिंधू ॥
ऐसें करीं न माझ्या हृदयातें [३९]विषमशर शरें [४०]विंधू ॥ १ ॥
बा घालिता न झाला कोणी ही तुजसमान सत्रास ॥
[४१]संसृति पासुनि पावे कोणाचें ही न मानस [४२]त्रासें ॥ २ ॥
जो सुव्रत साधु तया भजतां वेदांत देतसे मुक्ती ॥
पापिजनें हि तुझी बा नाहीं ऐशी न ऐकिली उक्ती ॥ ३ ॥
जी मुक्ति दुर्लभा तूं देसि तनु सोडितां चि [४३]उरगां ती ॥
[४४]तुरगां ती [४५]नागां तीं [४६]कीटां ती हे सुकीर्ति सुर गाती ॥ ४ ॥
सर्वांसि सम चि देसी [४७]अमृत प्रभु तूं [४८]वदान्यवर साचा ॥
नरसा चाळविशिल कां उचितज्ञा त्यासि भेद न रसाचा ॥ ५ ॥
तें हि अमृत [४९]ओगरितां करि सुज्ञ हि विष्णु पंक्तिभेदातें ॥
परि तें हरितें हरिचें कर्म कविमनासि हरुनि खेदातें ॥ ६ ॥
सर्वस्व समर्पिसि बा मरण[५०]वसरीं द्रवोनि अनतातें ॥
धन तातें हि न द्यावें जाणतसे सुप्रसिद्ध [५१]जनतां तें ॥ ७ ॥
क्षीरसमुद्र दिला त्वां त्या उपमन्युद्विजासि या दानें ॥
भरिलें विश्व सुकविनें संतत सर्वत्र [५२]साधुवादानें ॥ ८ ॥

---

२९ पद्म=कमल. ३० करींद्र=गजेंद्र. ३१ व्यसन=संकट. ३२ नक्र=मगर. ३३ पुरहा=शिव. ३४ युष्मद्यशोजित=तुमच्याकीर्तीनें जिंकलेला. ३५ विधु=चंद्र. ३६ हा=हाय हाय. ३७ निरवधि=अमर्याद. ३८ दयासुधासिंधु=कृपामृतसागर. ३९ विषमशर=मदन. ४० विंधू=जखम करो. ४१ संसृति=संसार. ४२ त्रास=भीति. ४३ उरग=साप. ४४ तुरग=घोडा. ४५ नाग=हत्ती. ४६ कीट=किडा. ४७ अमृत=मोक्ष पक्षीं मधुर पेय. ४८ वदान्य=दाता. ४९ ओगरितां=वाढितां. ५० अवसर=समय. ५१ जनता=जनसमूह. ५२ साधुवाद=स्तुति.

मरणावसरीं सर्व प्राण्यांचा होय दक्ष[५३] कान वरी ॥
उपदेश करिसि ज्या तो मुक्तीस विचारदक्ष कां न वरी ॥ ९ ॥
**शंभो** अंभोधर[५४] तूं **काशी**गत सर्व जीव चातक हा ॥
पाजिसि सदमृत म्हणवी अज्ञात ज्ञात ही न पातक हा ॥ १० ॥
त्वां केलें जीवाच्या पूर्ण न आशींत काय **विश्वेशें** ॥
धन्य चि तो जरि खाती तोडुनि **काशीं**त काय विश्वे शें ॥ ११ ॥
सत्व किमपि न विसरसि कीं पळ हि न बाप लाडकें विसरे ॥
भिवुनि व्याकुळ जालें तें सोडुनि वा पलाडें केंवि सरे ॥ १२ ॥
घ्याया वितान[५५] जो दे तव शीर्षीं मूढ दस्यु[५६]जन पाय ॥
तो हि समुद्धारिला त्वां **विश्वेशा** त्वत्प्रसाद अनपाय[५७] ॥ १३ ॥
ज्याचें एक शुभ अशुभ विश्वेशतशासनासनादरिता ॥
होऊं न देसि बा तूं विश्वेश तशासनासनादरिता ॥ १४ ॥
जो मूढ व्याध तुझ्या वदनींचें तोयें[५८] मस्तकीं थुकला ॥
मुकला न गतिस वाटे तुज कीं अभिषेकविधि न तो चुकला ॥ १५ ॥
तूं बंधु दीन मी हें जाणें येतें असें चि वदनातें ॥
ठावें असेल दुसरें तरि सर्वज्ञा स्वयें चि वद नातें ॥ १६ ॥
**वाल्मीकिव्यासादि** श्रेष्ठ कवि तसे चि वेद हे तूतें ॥
पुसतां तात हि म्हणती सर्वज्ञा मुख्य विश्वहेतूतें[५९] ॥ १७ ॥
तुज साधु पतितपावन[६०] ऐसें म्हणतात पतितपावनता ॥
हे प्रत्ययास येऊ मज जाणुनि पादपतित पाव नता ॥ १८ ॥
सर्वजडोद्धारव्रत वरुनि **विभो** सोडिसी न टेंकेला ॥
त्वां पण सिद्धिस नेला **शंभो** इतरें जसा नटें केला ॥ १९ ॥
भाटपण **प्रभु**वर्या कोणा दिधलें नसे तुवां काविला ॥
वांकविलें जग एक चि सद्धर्माचा न सेतु वांकविला ॥ २० ॥
त्वद्गुण न रूचति कोणा बहु रूचले नायका कवीला जे ॥
त्यजुनि सुधा सुज्ञ रसिक सेवूनि न काय काकवी लाजे ॥ २१ ॥
मज दीना अर्थिजना स्वभजन सप्रेम या महा दे वा ॥
**काशीं**त मरण **वरद**प्रवरा **विश्वेश्वरा महा**देवा ॥ २२ ॥
तुज भोळानाथ असें म्हणती कीं मुक्त करिसि अमितांतें[६१] ॥

---

५३ दक्ष=उजवा. ५४ अंभोधर=मेघ. ५५ वितान=छत. ५६ दस्यु=चोर. ५७ अनपाय=अविनाशी. ५८ तोय=उदक. ५९ विश्वहेतु=सर्वोत्पादक. ६० पतितपावन=पाप्यांस पवित्र करणारा. ६१ अमित=असंख्य.

जें शत अपराधांचें घालिसि पोटांत पाय नमितां तें ॥ २३ ॥
बहु तव यशासि लाजे यश शिबिमुख[62] जे तयां उदारांचें ॥
फार अगत्य नतांचें बा तुज सुपातिस जसें सुदारांचें ॥ २४ ॥
करिती मुक्त मग करिल काय न पटु तव उपासना कवनीं ॥
दीक्षित अमृत प्राशी पावेल न कां तुपास नाकवनीं[63] ॥ २५ ॥
अमृतातें लाजवितें साजवितें त्रिभुवना भवद्यश तें ॥
करितां आ शुचि आशु चि करितें त्या मलिन जो अवद्य[64] शतें ॥ २६ ॥
काशींत दिलें त्वां जें न दिलें कोणीं हि दक्षदमना[65] तें ॥
भुलविसि तूं चि वदान्यप्रवर कवींच्या न लक्षद[66] मनातें ॥ २७ ॥
शंभो सत्य जडात्मा मलिन सदा पंक[67]हेतु तोयद[68] या ॥
नाहीं विवेक याची बा सुखदा दुःखदा हि होय दया ॥ २८ ॥
म्हणवी वदान्य आपण हा पण घन वर्षला हि ओसरला ॥
शंभो म्हणतां चि सदा देती च त्वदभयोक्ति ओ सरला ॥ २९ ॥
हर्षसि सुजडाच्या ही केल्या निजकीर्तिवर्णना तुंडें ॥
एकात्मज* जीर्ण[69] जसा वदतां अव्यक्त[70] वर्ण[71] नातुंडें ॥ ३० ॥
योगरतां यागरतां[72]हूनि म्हणे धन्य वेद नामरतां ॥
ज्यांच्या वदनीं करणीं शिव न शिवे त्यांसि वेदना मरतां ॥ ३१ ॥
आपण न भजति तुजला करिती त्वद्भक्तसाधुकुत्सा[73] ही ॥
तदपि तशांच्या ही तूं उद्धारीं बा सदैव उत्साही ॥ ३२ ॥
आप्त हि भवप्रवाहीं पर साधन ही न दे वदे वाहे ॥
तारिसि तूं चि जगत्प्रभु पर साधनहीन देवदेवा हें ॥ ३३ ॥
सर्वस्व नतां देतां नलगे पुत्रप्रियादिकां पुसणें ॥
उसणें न देसि अधिकें फुगणें न्यूनें हि बा नसे रुसणें ॥ ३४ ॥
दुःखित जनीं कृपेचा प्रभुस न येईल कां बरा ऊत ॥
चोरत्रस्तां[74] सोडुनि न भला राहेल लांब राऊत[75] ॥ ३५ ॥
नमितां दीनें टेकुनि महिवरि उर पाद हस्त शिर गुडघे[76] ॥

---

६२ शिबि=राजविशेष. ६३ नाकवन=स्वर्गांतील उपवन. ६४ अवद्य=निंद्य. ६५ दक्षदमन=दक्षप्रजापतीचा हंता. ६६ लक्षद=एक लाख देणारा. ६७ पंक=पाप. ६८ तोयद=मेघ. * एकात्मज=एकच आहे पुत्र ज्यास असा. ६९ जीर्ण=म्हातारा. ७० अव्यक्त=अस्पष्ट. ७१ वर्ण=शब्द, अक्षरें. ७२ यागरत=यज्ञप्रिय. ७३ कुत्सा=निंदा. ७४ चोरत्रस्त=चोरांपासून भय पावलेला. ७५ राऊत=घोडेस्वार. ७६ उर, पाद, हस्त, शिर, गुडघे=साष्टांग ( नमस्कार करितांना हे आठ अवयव भूमीस लागतात. )

म्हणसी घे मोक्ष जसा तात म्हणे शिशुं[७७]सि जीव[७८] चिर[७९] गुड[८०] घे ॥ ३६ ॥
सिरसीभरी प्रभु कसा तरि वारावासवारणारानीं ॥
न वळे तो अरिच्या दे जरि बारावासवारणारानीं ॥ ३७ ॥
भीती काशीवासी प्राण्यांचें पाहतां वदन माया ॥
लागे दूरुनि देवा अपराध स्मरुनियां पद नमाया ॥ ६८ ॥
जे झाले मागें जे होणार महेश्वरा नवे दाते ॥
त्वच्चरणरे[८१]णुसम ही गमति तव स्तवरता न वेदा ते ॥ ३९ ॥
विश्वेश्वर शिव शंकर भव हर मृड शर्व देवदेव असें ॥
म्हणाति तयां मोक्षातें देसि म्हणसि मीं सदा ऋणी च असें ॥ ४० ॥
काशींत रणांत मरण जो न तुजपुढें करुनि आ इच्छी ॥
साधुसभा चि न केवळ देवा त्यातें म्हणेल आइ च्छी ॥ ४१ ॥
सांगे सर्वस्वाचा तुज तव दयितीं[८२] दया लुट कराया ॥
तूं अद्वितीय तुजशीं कोणी हि नसे दयालु टकराया[८३] ॥ ४२ ॥
पात्रापात्रविचार न करितां पशुला हि मुक्ति कां देतो ॥
सर्वज्ञ म्हणाति खातो ज्याची हे काय उक्ति कांदे तो ॥ ४३ ॥
व्हाया स्वख्याति जगीं ऐसें काशी च कराविती कार्य ॥
वश करुनि पतिस उडविति सर्वस्व स्त्री असें वदाति आर्य ॥ ४४ ॥
काशी तुज आवडती न तशी गंगा न अद्रि[८४]ची कन्या ॥
धन्या हे चि त्रिजगीं कीं त्वां न च सोडिली दिली अन्या ॥ ४५ ॥
यत्न दिवोदा[८५]स करी विट[८६]पुरुष सतीस जेंवि भोगाया ॥
सोडवुनि सुय[illegible] केलें रुचलें सुकवींस जें विभो गाया ॥ ४६ ॥
दयिता बहु विनयवती अंकीं[८७] जडली न मस्तकीं चढली ॥
न कळे कोणापासुनि विद्या काशीपुरी पुरी पढली ४७ ॥
श्रीकाशी बहुत भली माथां श्रीचरण सर्वदा वाहे ॥
त्वत्प्रेम अतुळ असतां न करि सपत्नीं[८८]त गर्व दावा[८९] हे ॥ ४८ ॥
प्राणी तुज पूर्वभवीं[९०] भजतां काशींत अतितपा मरतो ॥
लोकांस चरम[९१]जन्मीं दिसतो तनु तों चि पतित पामर तो ॥ ४९ ॥
पूर्वभवीं जें घडतें तीर्थ व्रत दान पूजन स्मरण ॥

---

७७ शिशु=बालक. ७८ जीव=जिवंत रहा. ७९ चिर=दीर्घ काल. ८० गुड=गूळ. ८१ रेणु=कण. ८२ दयिता=प्रिया, आवडती. ८३ टकराया=बरोबरी करण्यास. ८४ अद्रि=पर्वत. ८५ दिवोदास=राजविशेष. ८६ विट=जार. ८७ अंकीं=मांडीवर. ८८ सपत्नी=सवती. ८९ दावा=द्वेष. ९० भव=जन्म ९१ चरम=शेवटचा.

तेणें तव प्रसादें काशींत प्राप्त होतसे मरण ॥ ९० ॥
मुक्त चि करि शंभो जो नाचे वाजवुनि गल्ल वाद्या या ॥
मग काय स्तवित्यातें जड मोक्ष तवांघ्रिपल्लवा द्याया ॥ ९१ ॥
जीवांचें कर्म तुझ्या दृष्टिपुढें प्रभुवरा कसें उरतें ॥
झुरतें चिंतेनें बहु मस्तक बडवूनि ताडितें उर तें ॥ ९२ ॥
काशींत मुक्ति देसी हें यश सर्वांसि तडक हटकीतें ॥
जड भजति अविद्येतें प्रभु तूं त्या मानिसी न बटकीतें ॥ ९३ ॥
तव यश काशी मरणीं जीवांचें सर्व कर्म चट करितें ॥
अस्त्र तुझें तेज हरूनि पाडिलसें जेंवि दैत्यकटकें रितें ॥ ९४ ॥
देवा वेदादि वदति निजभक्ति प्रेमयुक्त नव दे हा ॥
न वदे हा भक्त कधीं पावे भजनार्थ मुक्त नव देहा ॥ ९५ ॥
प्रभुजी व्हाया पूर्ण स्वपथीं जड करूनि युक्ति लाव रिते ॥
तुज तव कृपा न म्हणती तरि कैसे जीव मुक्तिला वरिते ॥ ९६ ॥
तुज नत रूचे प्रसूलीं जेंवि जरि न चरम तोकें विनयज्ञ ॥
हें ज्या श्रुत अविमुक्ताहूनि म्हणे परम तो कवि न यज्ञ ॥ ९७ ॥
अज्ञान हरिसि जेणें दुःसह जनिं मृत्यु हा उपद्रव तें ॥
परदुःखें काशींत त्वन्मन दहनें जसें तुप द्रवतें ॥ ९८ ॥
प्रतिभा देवुनि देवा त्वत्कीर्ति त्वत्प्रसाद वर्णवितो ॥
विद्यापति तूं तो जो प्रणव स्वरसहित सर्व वर्ण वितो ॥ ९९ ॥
म्हणसी जन अविमुक्तीं स्थिर निश्चय करूनि गाढ वस मान ॥
हें तव शासन न करी जो तो नर सत्य गाढवसमान ॥ ६० ॥
शिव शिव वद कठिन नसे उच्चारा हें सदैव हो शील ॥
गुरु म्हणति पावुनि पदा उच्चा राहें सदैव होशील ॥ ६१ ॥
त्वन्नामीं सादर जो तो मुक्ति म्हणेल जरि नको पावे ॥
षडरि सुदारूण तरि तव नामाश्रित साधुवरि न कोपावे ॥ ६२ ॥
तव नाम हि उद्धरितें कुतुकें सर्वत्र सर्वदा सर्वां ॥
शर्वा देवा इतरा साधन संपत्ति या पुढें खर्वा ॥ ६३ ॥

---

९२ अंघ्रि=पाय. ९३ हटकीतें=बलावितें, विचारितें. ९४ अविद्या=अज्ञान. ९५ बटकी=दासी अविद्या. ९६ कटक=सैन्य. ९७ प्रसू=आई. ९८ चरम=शेवटचा. ९९ तोक=बालक. १०० विनयज्ञ=गरीब, सुशील. १ अविमुक्ता=काशी. २ दहन=अग्नि. ३ द्रवतें=वितुळतें. ४ प्रतिभा=ज्ञान. ५ प्रणव=ओंकार. ६ वर्ण=अक्षरें. ७ शासन=आज्ञा. ८ सुदारुण=अति भयंकर. ९ कुतुकें=कोडेनें, लीलेनें, सहज, श्रम न पडतां. १० खर्वा=नीच.

लुब्धाचें जेंवि धनीं तेंवि विटो हें तुझ्या न मन नामीं ॥
शंभो असें करीं कीं जाणें श्रवणा तुज्या न मनना मीं ॥ ६४ ॥
जेंवि सुवासें सुरसें [11]मधुपीतें हरुनि [12]तामरस नेतें ॥
नेवू भुलवूनि तसें माझ्या तव भव्य नाम [13]रसनेनें ॥ ६५ ॥
दाता प्रभु तूं कीं तव परम प्रिय भक्त विष्णु मुक्तीचा ॥
जोंवरि सेवा तोंवरि शतमख[14]मुख [15]लेखें एक भक्तीचा ॥ ६६ ॥
न पहासि [16]आशुतोषा दोषा [17]दोषाकरा वहासि शिरीं ॥
तव लीला सर्वजना जेंवि [18]रविद्युति सुखा [19]शिशिरीं ॥ ६७ ॥
सप्रेम गावया मज तव [20]सुखजनका येशा कळावि कळा ॥
ज्यांत त्वच्चरित नसे मिरविति जन कायशा कळा विकळा ॥ ६८ ॥
मन वश तव नामातें होय विभो जेंवि [21]हरि लगामातें ॥
तुजपासुनि पावाया ते संत चि भूमि वरिल गा मातें ॥ ६९ ॥
दात्यातें [22]अर्थिमुख स्तवन करुनि जेंवि शंकरा गातें ॥
तें अति धन्य तुज पुढें गाय तसें जें [23]विशंकें [24]रागातें ॥ ७० ॥
दास तुज पुढें प्रेमें गाय न समजोनि ताळ आलापी ॥
तो [25]अमृतातें देवा [26]स्तन्यातें जेंवि बाळ आला पी ॥ ७१ ॥
भक्त चि बहु आवडतो तेंवि तुज न आवडे उमा [27]रमणी ॥
ते ही संश्रितरक्षक विद्यातेजोनिधी [28]कुमार मणी ॥ ७२ ॥
जो न त्वच्छरणागत तो या लोकांत आपदा उकळी ॥
त्याला कां नरकपथ पदरीं बांधोनि पाप दाउ कळी ॥ ७३ ॥
नलगे नमने ध्यावे आठा अंगांत करुनि आठ वण ॥
उद्धरिसी दीनातें देवा करितां मनांत आठवण ॥ ७४ ॥
हरिती संत तमातें संतत मातें तदीय संगातें ॥
दे देवा प्रिय करिती सत्संगति जें करी न गंगा तें ॥ ७५ ॥
जेंवि तुझ्या संतांच्या कथिता झाला कथा परा व्यास ॥
कीं हे स्वीयास जसे दाखविती हित [29]पंथा [30]पराव्यांस ॥ ७६ ॥

---

११ मधुपी=भ्रमरी. १२ तामरस=कमल. १३ रसना=जीभ. १४ शतमखमुख=इंद्रादिक. १५ लेख=देव. १६ आशुतोषा=हे लवकर संतुष्ट होणाऱ्या देवा. १७ दोषाकर=चंद्र-पक्षीं दोषांची खाण. १८ रविद्युति=सूर्यकांति. १९ शिशिर=माघ व फाल्गुन हे दोन महिने मिळून होणारा ऋतु. २० सुखजनक=सुखोत्पादक. २१ हरि=घोडा. २२ अर्थिमुख=याचकाचें तोंड. २३ विशंक=निर्भीडपणें. २४ राग=प्रेम. २५ अमृत=मोक्ष. २६ स्तन्य=स्तनांतील दूध. २७ रमणी=स्त्री. २८ कुमार=पुत्र. २९ पथ=मार्ग. ३० पराव्यास=परक्यास.

झाले होते व्याप्त त्रिदश[31] नर महर्षि ही विषादें[32]नें ॥
ते शरणागतनाथा त्वां हर्षविले महाविषादानें[33] ॥ ७७ ॥
एकें चि शरें केलें भस्म पुरत्रय[34] तुवां अगाध बळें ॥
स्वयशें लज्जा दिधली विधुला[35] तुहिनालया[36] अगा[37] धवळें[38] ॥ ७८ ॥
करिता झालासि विभो दृक्पातलवें चि कामदाहातें[39] ॥
विधिशिरिं[40] हरिलें हरिशिल मग अन्याच्या न कां मदा हातें ॥ ७९ ॥
म्हणसि भवा मद्भक्ता न शिव करीं नमन एक फटकाळा ॥
भीतो मोह तुज जसा गरुडासि महाहि[41] नैकफट[42] काळा ॥ ८० ॥
वेद वदति ज्यातें प्रभु बसला बांधुनि करांत कांकण[43] तो ॥
तज्ज्ञ म्हणति जीवनिकर[44] पावुनियां भवगरांत[45] कां कणतो ॥ ८१ ॥
स्मरतां तव चरणांबुजरज[46] चि करुनि सेवकां कणव[47] धूतें ॥
वरकड असो न देइल काय मनुजदेव[48] कांकण वधूतें[49] ॥ ८२ ॥
प्राप्तभय महाकाळा वा तुजपासुनि न होय काळ कसा ॥
तूं सार्वभौमसा तो कर देता दास देशपाळकसा ॥ ८३ ॥
देतोसि मोक्ष नेउनि मोहासि अहो दयानंदा[50] विलया ॥
त्वदितर ऐशा दीना जीवासि महोदया न दाविलें या ॥ ८४ ॥
स्वांतःपात्यखिलांच्या[51] जीचें सुसमर्थ तोय[52] उद्धारा ॥
सुरसिंधु[53] अधोधारा[54] शंभो त्वत्कीर्ति होय उद्धारा[55] ॥ ८५ ॥

---

३१ त्रिदश=देव. ३२ विषाद=दुःख ३३ महाविषादान=मोठ्या विषाचें भक्षण. ३४ पुरत्रय=त्रिपुरासुराचीं तीन शहरें. ३५ विधु=चंद्र. ३६ तुहिन=हिम. ३७ अग=पर्वत. ३८ धवल=शुभ्र. ३९ कामदाह=मदनास जाळणें. ४० विधिशिर=ब्रह्मदेवाचें मस्तक. सरस्वती उत्पन्न केल्यावर ब्रह्मदेव तिचें रूप पाहून तिचा अभिलाष करूं लागला. तेव्हां तिनें भीतीनें रोहिणीचें ह्म० हरिणीचें रूप घेतलें. तें पाहून ब्रह्मदेव मृगाचें ह्म० हरिणाचें रूप घेऊन तिचे पाठीस लागला. ब्रह्मदेव हें दुष्कर्म करीत आहे असें पाहून सर्व देवांनीं आपापल्यांतील क्रूर अंश देऊन त्यांपासून रुद्र देव उत्पन्न केला. नंतर त्या रुद्रानें व्याधरूप धारण करून त्या मृगाचें मस्तक कापिलें तें आकाशांत मृगशीर्ष या नांवानें नक्षत्रांत प्रसिद्ध आहे. हरिणी झालेली सरस्वती रोहिणी नांवानें व रुद्र हा लुब्धक या नांवानें आकाशांत तारारूपानें प्रसिद्ध आहे. रोहिणी, मृगशीर्ष, व लुब्धक या ताऱ्यांचा संबंध दाखविणारी ही कथा ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणांत आहे. वनपर्वांतही पुढील वचनांत या कथेचा उल्लेख आढळतो:—अन्वधावन्मृगं रामो रुद्रस्तारामृगं यथा ॥ २० ॥ अ० २७८. ४१ महाहि=मोठा साप. ४२ नैकफट=अनेक फडा आहेत ज्याला असा. ४३ कांकण=बिरुद. ४४ निकर=समूह. ४५ गर=विष. ४६ रज=धूलि. ४७ कणव=दया, कृपा. ४८ मनुजदेव=राजा. ४९ वधू=स्त्री. ५० दयानंद=कृपासागर ५१ स्वांतःपात्यखिलांच्या=आपणांमध्यें स्नान करणाऱ्या सर्वांच्या. ५२ तोय=उदक. ५३ सुरसिंधु=देवनदी गंगा. ५४ अधोधारा=खालीं आहे धार जीची. ५५ उद्धारा=वर आहे धार जीची.

दीनासि तव पदांबुजयुग करितां नवस दावि काशी तें ॥
दुर्लभ जें सुख देतो त्वन्महिमा नव सदा विकाशीतें ॥ ८६ ॥
नियति[५६] तव मतासि जशा श्वशुरांच्या[५७] कुलवती सुना टपती ॥
प्रेमें समसंगोपन करिसी तूं ईश्वरा जुनाट पती ॥ ८७ ॥
नेती दूर तृणादिक तिळ हि टिकायास बळ न दे वात्या[५८] ॥
तेंवि तव स्मृति उडवी जें दुष्कृत करुनि चळन देवा त्या ॥ ८८ ॥
देवा तूं शंकर हित पंक[५९]रहित जीव निजयशें करिसी ॥
हरिसी भ्रम श्रम क्रम न पहासी दीन पोटिशीं धरिसी ॥ ८९ ॥
त्वद्यश म्हणतें प्राण्या प्रभु रक्षितसे नता मुलावाणी ॥
म्हण शिव शिव कर जोडुनि सोडुनि भय काय रे तुला वाणी[६०] ॥९०॥
विश्वशरण्या[६१] करुणें तव दृक्पातें शरण्य शिबि केला ॥
त्वत्स्मृतिला तापत्रय सुखलंघ्य[६२] जसें अरण्य शिबिकेलीं[६३] ॥ ९१ ॥
प्रणतीं उमा प्रसन्ना अन्नाच्छादन नता जना अर्पी ॥
तर्पी ज्ञान तव दया त्यांत भजन पायसीं जसें सर्पी[६४] ॥ ९२ ॥
श्रुति म्हणती उद्धरितो प्रभु काशीतें त्यजूनि आळस या ॥
भर्गाख्या[६५] जीवदशा न सहाति कदापि जेंवि आळ सया ॥ ९३ ॥
काशींत दीनबंधो केलासि सदा अधीन दीनांहीं ॥
अमृतेच्छूसि[६६] तव पुरी न म्हणे जैसी कधीं नदी नाहीं ॥ ९४ ॥
बा त्वत्प्रणाम निवटी मोहातें जेंवि कृष्ण कंसातें ॥
कळिकाळ तव यशातें कर जोडी जेंवि काक हंसातें ॥ ९५ ॥
मंदा मंदार[६७] रुचे न च दे सुरपूज्य हि नग[६८] मोक्ष महा ॥
चिंतामणि म्हणति जया प्रभुजी कोणास हि न गमो क्षम हा ॥ ९६ ॥
अन्यवदान्ययश शिवा लाजुनि बसलें धरूनि कोणीं[६९]तें ॥
कोणा तें विश्राम न दे न रुचे सत्कवींत कोणातें ॥ ९७ ॥
विश्वेशा तूं साक्षी कर्म शुभाशुभ तुला सकळ कळतें ॥
तव मन जेंवि पित्याचें दुःखित देखुनि मुलास कळकळतें ॥ ९८ ॥
प्रभु तूं प्रसन्न दीनत्राणाची[७०] कां न जाणसी सोय ॥
जो बहु आंबा पिकतो कां बा पिकतोषकर[७१] न तो होय ॥ ९९ ॥

---

५६ नियति=दैव. ५७ श्वशुर=सासरा. ५८ वात्या=वावटळ. ५९ पंक=पाप, चिखल. ६० वाणी=कमताई. ६१ शरण्य=रक्षक, शरण जाण्यास योग्य. ६२ सुखलंघ्य=सुखानें उल्लंघन करण्यास योग्य. ६३ शिबिका= पालखी. ६४ सर्पी=तूप. ६५ आख्या=नांव ६६ अमृत=मोक्ष-पक्षीं पाणी. ६७ मंदार=कल्पवृक्ष. ६८ नग=वृक्ष. ६९ कोण=कोंपरा. ७० त्राण=रक्षण. ७१ पिकतोषकर=कोकिलास संतोष देणारा.

झाला सुतृप्त वरदा देवा पावोनि तुज अगाधाला[७२] ॥
ऐसा सुर कोण तया सेवुनि कल्पाभिधा अगा धाला[७३] ॥ १०० ॥
चिंतामणिकल्पद्रुमसुरभीसान्निध्य[७४] ज्यां सुर सदा त्यां ॥
करिसि यशें तृप्त भजति तुज कवि चातक जसेसुरसेंदात्यां[७५] ॥ १ ॥
त्वत्कीर्तीत बुडावें अपमानुनि शंकरा सुधासरसी[७६] ॥
कीं तूं चि पुढें द्याया मुक्ति जडा ही जशी बुधा सरसी ॥ २ ॥
स्वर्गीं न सत्यलोकीं प्राणी काशींत मात्र सुखवासी ॥
या वासार्थ तुजपुढें अमरसहित हरि विरिंचि[७७] मुख वासी ॥ ३ ॥
जो विषयसमृद्धि जना देतो स्वर्गस्थ उत्तमाग[७८] तितें ॥
त्वत्पादच्छायाश्रित पावे होऊनि उत्तमा गतितें ॥ ४ ॥
त्वद्यश चि सेव्य न तसें प्राज्यें[७९] हि मिळतां सुधासरोवर तें ॥
जें म्हणतें अमृत लघु नरा हो तुळित्या बुधा सरो वरतें ॥ ५ ॥
त्वन्नाम म्हणे सुजतें वपु तुज व्हावें कशास जें कुजतें ॥
बहु कर्म ज्यांत रुजतें जीवा मद्वारका नसो तुज तें ॥ ६ ॥
खळसंबंध त्यागुनि भजली जें पद भजे तदेव सती ॥
त्वत्पादपद्म ऐशा निष्ठे वांचुनि मना न दे वसती ॥ ७ ॥
नाम महादेव तुझें हें तुज चि प्रभुवरा सदा साजे ॥
ते काय न करितां छळ अर्थ हि देती कधीं न दासा जे ॥ ८ ॥
त्वां ही छळ केला हें साधु पुराणज्ञ वृद्ध वदतात ॥
परि तूं देसी दासा सत्पुत्रा जेंवि आत्मपद तात ॥ ९ ॥
भावें भक्तमयूरें स्तवबिल्व समर्पिला तुला सेवा ॥
घे वात्सल्यें मानुनि सकृपा विश्वेश्वरा महादेवा ॥ ११० ॥
इति श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचितं श्रीमद्विश्वेश्वरस्तवनं संपूर्ण

---

## अथ प्रयागस्तुतिः

श्रीशातें प्रेमें जे वर्णिति तुज ही कवि प्रयागा ते ॥
हरिहरयशसें तव यश नसतें जरि तरि न विप्र या गाते ॥ १ ॥
बा त्वत्समीप देवी गंगा यमुना सरस्वती वसती ॥
त्यजिति न तुज व्रतास क्षण हि जशा प्रीतिनें अतीव[८०] सती[८१] ॥ २ ॥

---

७२ अगाध=खोल, जाणण्यास कठिण. ७३ धाला=तृप्त झाला. ७४ सुरभी=कामधेनु. ७५ सुरस=उत्तम रस ( पाणी ). ७६ सरसी=सरोवर. ७७ विरिंचि=ब्रह्मा. ७८ उत्तमाग=चांगला वृक्ष. ७९ प्राज्य=पुष्कळ. ८० अतीव=अतिशय. ८१ सती=पतिव्रता.

विषय विष यम ज्वलन चि न भंजुनि शुक विप्र या गरा[८२] जाला ॥
व्हायासि तसें सेविति तुज बहु सुकवि प्रयागराजाला ॥ ३ ॥
भुलविसि सुकविसि चुकविसि संसारवनांत अटन[८३] हे यमुने ॥
त्वत्तीरस्थमुनिस सुर म्हणति तुला वपु चि तट न हेय[८४] मुने ॥ ४ ॥

**इति प्रयागस्तुतिः**

---

## अथ काशीस्तुतिः

श्रीकाशि तुझें दर्शन परम अमृत कीं अनंत शिवें[८५] वीतें ॥
जिववीतें जें लघु तें हें तों सर्वा जनासि निववीतें ॥ १ ॥
श्रीकाशि तुझें दर्शन घडलें झडलें अशेष ही पाप ॥
आपत्सिंधुतरणि[८६] तूं न उरों देसी निजाश्रितीं ताप ॥ २ ॥
श्रीकाशि तुझें दर्शन अत्यद्भुत वर्णिती असें सुकवी ॥
कीं हें अमृत असोनि प्रबळा संसारपादपा[८७] सुकवी ॥ ३ ॥
श्रीकाशि तुझें दर्शन सर्व सुखाधिक म्हणे सदाशिव तो ॥
स्वशिरोमणिकिरणांहीं[८८] सुरगण ज्याच्या पदा सदा शिवतो ॥ ४ ॥
श्रीकाशि तुझें दर्शन मातेचें जेंवि बाळका कविला ॥
अन्य पुरी सेवी तो सोडूनि सुधेसि बाळें[८९] काकविला ॥ ५ ॥
श्रीकाशि तुझें दर्शन हर्ष न दे बहुत तेंवि कवणातें ॥
अलवण-भोजन-पीडित पात्रीं पाहोनि जेंवि लवणातें ॥ ६ ॥
श्रीकाशि तुझें दर्शन बहु हर्षद निर्धना जसें निधिचें[९०]
लिहितें भाग्य ललाटीं लिहिणें मोडूनि सर्व ही विधिचें[९१] ॥ ७ ॥

**इति काशीस्तुतिः**

---

## अथ चांगदेवस्तुतिः[+]

श्रीराम असें म्हणतों मलिन गणुनि न म्हण चांगदेवा हूं ॥
बा तव पदपद्मावरि मज उत्तम नाम आंग दे वाहूं ॥ १ ॥
भूवरि कल्पलतेहुनि अधिका होसी न देवि तापि कसी ॥
पुण्यफळांहीं सर्व हि तृप्त करायासि सेवितां पिकसी ॥ २ ॥

**इति चांगदेवस्तुतिः**

---

८२ गर=विष. ८३ अटन=फिरणें. ८४ हेय=टाकण्यास योग्य. ८५ शिव=कल्याण. ८६ आपत्सिंधुतरणी=विपत्तिरूप समुद्रांतली नौका. ८७ पादप=वृक्ष. ८८ स्वशिरोमणि-किरण=आपल्या मस्तकांतील मण्याचें तेज. ८९ बाळ=मूर्ख. ९० निधि=द्रव्याचा ठेवा. ९१ विधि=ब्रह्मा. + तापीतीरीं पुण्यस्तंभ ( पुणतांबे ) क्षेत्रीं चांगदेव होता. तो शा० शक १२४७ त समाधिस्थ झाला.

## * अहल्यास्तुतिः

श्रीहरिहरभक्ता तूं देवि अहल्ये वरा धराभूषा[९२] ॥
पूषा[९३] तुज साधु म्हणे ख्याता तुजसम न बाणतनुभूषा[९४] ॥ १ ॥
देवि अहल्याबाई झालीस जगत्त्रयांत तूं धन्या ॥
न न्यायधर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या ॥ २ ॥
जाणे धर्म करीना त्या स्तवितो कोण पंडितंमन्या ॥
न न्यायधर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या ॥ ३ ॥
धर्मार्थ गोत्रजन्या[९५] किंवा झालीस तूं धराजन्या[९६] ॥
तुज देवि भेटली जी सत्कीर्ति कधीं च हे न राजन्यां[९७] ॥ ४ ॥
न त्यजिसि नर्मदेतें देवि तुझी हे बहुप्रिया आली[९८] ॥
गंगेची हि सखी हो कीं उभयमनांत सत्क्रिया आली ॥ ५ ॥
श्रीविष्णुपदा स्तविली त्वद्भक्ता हें तुला हि मानावें ॥
विश्व जिला वानितसे कां न मयूरें हि तीस वानावें ॥ ६ ॥

### इत्यहल्यास्तुतिः

---

## अथ भैरवस्तुतिः

श्रीकालभैरवा त्वां विघ्न निवारूनि रक्षिल्या यात्रा ॥
गात्रास तसा जपसी जैसा शरणागता कृपापात्रा ॥ ॥
मंगळवारीं वांटिति भावें तुज नमुन शेरणीलीं[९९] जे ॥
त्यांस प्राकृतजनता[१००] जेंवि सुरतरूंसि शेरणी[१] लाजे ॥ २ ॥
जन कृतकृत्य स्मरतां नमितां तुज काळभैरवा होतो ॥
कीं म्हणासि स्वस्थ रहा तुच्छ कळि यथेष्ट वैर वाहो तो ॥ ३ ॥
तज्ज्ञ म्हणति जन पावे काशीतें नमुनि दंडपाणीतें ॥
स्मरण तुझें सुख देतें न ग्रीष्मीं[२] मधुर थंड पाणी तें ॥ ४ ॥
स्तविति प्राकृत जन तुज काशीचा कोतवाल या नांवें ॥
विश्वेश्वरप्रतिनिधे प्रेमें त्वां तेंहि योग्य मानावें ॥ ५ ॥

---

* जरी मोरोपंती प्रकरणांच्या पूर्वार्द्धाच्या आरंभींच्या चरित्रांत हें प्रकरण आलें आहे तर तें एकंदर प्रकरणांत सामील असावें असें वाटल्यावरून एथें दिलें आहे. ९२ धराभूषा=पृथ्वीस शोभविणारी. ९३ पूषा=सूर्य. ९४ बाणतनु-भूषा=बाणासुराची कन्या उषा. ९५ गोत्रजन्या=पार्वती. ९६ धराजन्या=सीता. ९७ राजन्य=राजा. ९८ आली=सखी. ९९ शेरणी=खिरापत. १०० प्राकृतजनता=सामान्य जनसमूह. १ शेरणी=वृक्ष विशेष. २ ग्रीष्म=उन्हाळा.

श्रीकाळभैरवा मज अंतीं काशीपुरींत दे वास ॥
जो शरणागत तुजला तो बहुमत विश्वनाथ देवास ॥ ६ ॥
तो धन्य जो तुज करी काशीच्या नमन कोतवालास ॥
अघनाशीं त्वद्द्युतिच्या उद्योगश्रम नकोत वालास[३] ॥ ७ ॥
तूं दीनबंधु देवा मीं दीन खरें असें असे नातें ॥
मज रक्ष भैरवा बा तुज कार्य अशक्य जें असेना तें ॥ ८ ॥
सुज्ञ म्हणाति विघ्न पळति भय पावुनि काळभैरव-ध्यानें ॥
काय करावें प्रभुशीं अपराध करूनि वैर वध्यानें ॥ ९ ॥
श्रीकाळभैरवा तव चरणें चि प्रणतदोष दापावे ॥
त्वदनुमतें विश्वेश प्रभु बापा दीनतोषदा पावे ॥ १० ॥

इति भैरवस्तुतिः

---

## अन्नपूर्णास्तुतिः

जय देवि अन्नपूर्णे भगवति विश्वेश्वरप्रिये वरदे ॥
परदेवते भवार्णव[४]पतिता शरणागता जना कर दे ॥ १ ॥
प्रणतांसि अन्नपूर्णे करिति तुझे देवभूप[५] पाय सदा ॥
संतर्पिसि वात्सल्यें तूं भक्तिज्ञानरूपपायस[६]सदा ॥ २ ॥
काशींत अन्नपूर्णे निवविसि देवूनि वस्त्र अन्न मना ॥
पाय तुझे पात्र सदा जे साधु असाधु जीव तन्नमना ॥ ३ ॥
तूं माय अन्नपूर्णे देता विश्वेश आत्मपद तात ॥
द्याया स्वास्थ्य मज जडा हें नातें सकल साधु वदतात ॥ ४ ॥
करिसि गुह[७]मयूरेश्वर[८] यांचें प्रेमें करूनि जेंवि हित ॥
तैसा चि अन्नपूर्णे मीं हि करावें असेल जें विहित ॥ ५ ॥

इत्यन्नपूर्णा स्तुतिः

---

## मणिकर्णिकास्तुति

श्रीहरिहरांसि म्हणाति शक्रादि जसे तसे अजित यांतें ॥
जे त्वद्भक्त बहु वदति कविवर मणिकर्णिके अजि तयांतें ॥ १ ॥
मणिकर्णिके हरिहर चि होतात न सुरसमानवपु[९] न्हाते[१०] ॥

---

३ वाल=वजन विशेष. तोळ्याचा चाळिसावा भाग. ४ अर्णव=समुद्र. ५ देवभूप=इंद्र. ६ पायस=खीर. ७ गुह=कार्तिकेय. ८ मयूरेश्वर=गणपति. ९ सुरसमान वपु=देवांसारखें आहे शरीर ज्यांचें. १० न्हाते=स्नान कर्ते.

तव जळ सेविति न म्हणाति अमृतातें सुरस मानव पुन्हा ते ॥ २ ॥
मध्यान्हीं तुजमाजि स्नानें सुर सर्व नित्य करितात ॥
मणिकर्णिके तुज भजुनि तीर्थें पुण्यें अघौघें[11] हरितात ॥ ३
जें सत्पद पावावें स्नानें मणिकर्णिके शवें हि तया ॥
त्वन्मज्जन सज्जनमत मानियलें नित्य केशवें हित या ॥ ४ ॥
शरणागता मयूरा भगवति मणिकर्णिके करीं मुक्त ॥
उक्त प्रणतांचें तूं आदरिसी हें चि तव यशा युक्त ॥ ५ ॥

इति **मणिकर्णिकास्तुतिः**

---

॥ आर्ति **विश्वेश्वराची** ॥

त्वत्क्षेत्रप्राप्ति जना तुझिया नवसांनीं ।
तत्व कथिसि जंतूच्या कानीं अवसानीं[12] ॥
ज्या दहनीं न उरावें पातकयवसांनीं[13] ।
तव नामें देति फळें मोठीं सव[14] सानीं[15] ॥ १ ॥
जयदेव जयदेव श्रीकाशीनाथा ।
त्वत्पदपद्मीं सुरमुनि मधुप करिती माथा ॥ ध्रु० ॥
देती सर्व जनास श्रीदेवी भुक्ती ।
करुणार्णव विश्वेश्वर तूं देसी मुक्ती ॥
मुक्ताढ्या त्वन्नगरी लाजविति शुक्ती ।
हे तुज मात्र रुचो या बाळाची उक्ती ॥ २ ॥ ज० ॥
प्रार्थावासि जडांनीं तूं रवि कोकांनीं[16] ।
उपदेश तुझा वरिला अगणित लोकांनीं ॥
व्हावें पात्र पित्याच्या वित्ता तोकांनीं[17] ।
या भक्तमयूराच्या सांग चि तो कानीं ॥ ३ ॥ ज० ॥

**श्रीकाशीनाथार्पणमस्तु**

---

११ अघौघ=पापाचा ओघ. १२ अवसान=मरण. १३ यवस=गवत. १४ सव=यज्ञ. १५ सान=लहान. १६ कोक=चक्रवाक १७ तोक=बालक.

मोरोपंतकृत

# अंबरीषाख्यान.

---

### साक्या

रविवंशीं अंबरीष राजा होता भगवद्भक्त ॥
विषयविरक्त द्विजदेवचरणंपरिचरणीं[1] आसक्त ॥ १ ॥
यश भुवनवनवसंताचें गावें नव नव संतांचें ॥ ध्रु ॥
तो साधन द्वादशिया नामें व्रत आरंभी नेमें ॥
आचरला भगवत्प्रीत्यर्थी नृप वर्ष भरि प्रेमें ॥ २ ॥
विहित व्रतावसानीं[2] भगवान् दुर्वासा मुनि आला ॥
नेवुनि धन्य करा मज ऐसें राजा विनवी त्याला ॥ ३ ॥
मान्य करोनि स्नान कराया यमुनातीर्थी गेला ॥
अघमर्षणीं[3] बृहद्ध्यानपरें तेणें विलंब केला ॥ ४ ॥
नियतपारणासमयलंघनें हानि व्रतास होय ॥
यास्तव तेव्हां तो नृप सेवी श्रुतिसाधुमतें[4] तोयें[5] ॥ ५ ॥
जलपानीं निज लंघनें[6] मानुनि तो मुनि कोपा पेटे ॥
कोप नव्हे तो साक्षान्मारुत[7] या दवदहना[8] भेटे ॥ ६ ॥
दंडाहत[9] अहिसा[10] तो उष्ण श्वास महात्मा सोडी ॥
भस्म नृपासि कराया स्वजटा कोपावेशें तोडी ॥ ७ ॥
त्या मुनिराजजटेची झाली परम भयंकर कृत्या[11] ॥
धांवे भस्म कराया भुजगी तैशी श्रीहरिभृत्या[12] ॥ ८ ॥
तों प्रभुभक्तत्राणानलस[13] प्रभुचें धांवे चक्र ॥
भस्म करी कृत्येला पाहे जों साधुकडे वक्र ॥ ९ ॥
कृत्येची गति पाहुनि तो मुनि घेउनि धाक पळाला ॥
लागे मागें चक्र प्रभुमत[14] विप्र म्हणुनि न जळाला ॥ १० ॥
धांवे चक्रभयें प्राणार्थी मुनि होउनि हतदर्प ॥
जैसा गरुडभयानें गरुडापत्यागस्कर[15] सर्प ॥ ११ ॥

---

१ परिचरण=सेवा. २ अवसान=शेवट, समाप्ति. ३ अघमर्षण=जप. ४ श्रुति=वेद. ५ तोय=पाणी. ६ लंघन=अपमान. ७ मारुत=वायु. ८ दवदहन=वणवा. ९ दंडाहत=काठीनें मारलेला. १० अहि=साप. ११ कृत्या=असत् दैवत, राक्षसी. १२ भृत्य=सेवक. १३ प्रभुभक्तत्राणानलस=प्रभुच्या भक्तांचें रक्षण करण्याविषयीं आळस नाहीं ज्यास असें. १४ मत=मान्य. १५ गरुडापत्यागस्कर=गरुडाच्या पिल्यांना अपराध करणारा.

लोकत्रयीं शरण्य[१६] न भेटे मग विधि[१७]समीप गेला ॥
शरणागतमव[१८] मामीश असें प्रार्थुनि वंदुनि ठेला ॥ १२ ॥
द्रुहिण[१९] ह्मणे तुज चक्रापासुनि रक्षाया मी न शकें ॥
शशकें[२०] सिंह कसा वारावा कीं पक्षीश्वर[२१] मशकें[२२] ॥ १३ ॥
शरणागत ही हरिजन[२३]वैरी विधिनें त्यजिला स्पष्ट ॥
नष्टप्रज्ञ[२४] ब्राह्मण तेव्हां पुष्कळ पावे कष्ट ॥ १४ ॥
मग तो मुनि कैलासीं जाउनि काळाच्या काळाला ॥
शरणागतमव मामीश म्हणे भूतप्रतिपाळाला[२५] ॥ १५ ॥
मृत्युंजय[२६] हि म्हणे वाराया दुर्बळ मी या अरिला[२७] ॥
याहुनि अन्या वारिन तूझ्या काळात्युग्रा[२८] अरिला[२९] ॥ १६ ॥
केली स्पष्ट उपेक्षा त्याची जैशी पद्मभवानें[३०] ॥
परिभवरोगचिकित्सकपति[३१]चें कथिलें सद्म[३२] भवानें[३३] ॥ १७ ॥
वैकुंठीं जाउनि जोडुनि कर मुनि वैकुंठासि[३४] म्हणे ॥
शरणागतमव मामीश हरे सकृप वरदमूर्धमणे[३५] ॥ १८ ॥
शरणागतवत्सल[३६] हि प्रभु हि ब्रह्मण्य[३७] ही परि हरि तो ॥
सच्छलकासि उपेक्षी जरि निजारिपु भव[३८] ही परिहरितो ॥ १९ ॥
विष्णु म्हणे म्यां काय करावें येथें ताप सराया ॥
ताप सरा[३९] यादा[४०] एक तसा तुज मज तापसराया ॥ २० ॥
शरणागत रक्षावा उचित चि परि म्यां भक्ताधीनें ॥
व्रतप्रभुत्व हि भक्तासि दिलें स्वीकृतभक्ताधीनें[४१] ॥ २१ ॥
विश्वाचे माझे प्रभु संत चि मजवरि त्यांची सत्ता ॥
सत्ता नसती तरि सोसवती काशि संतांची[४२] लत्ता ॥ २२ ॥
मजवरि माझी सत्ता नाहीं कैंची चक्रा वरिती ॥
सद्वृत्ता सत्कीर्ति मज हरा बह्या शक्रा वरिती ॥ २३ ॥

---

१६ शरण्य=रक्षक. १७ विधि=ब्रह्मा. १८ शरणागतमव मामीश=( हे ईश शर शरणागतं मांअव ) हे प्रभो शरण आलेला जो मी त्या मजला रक्ष. १९ द्रुहिण=ब्रह्मा. २० शशक=ससा. २१ पक्षीश्वर=गरुड. २२ मशक=घुंगुर्डें. २३ हरिजन=विष्णुभक्त. २४ नष्टप्रज्ञ=गेलें आहे शहाणपण ज्याचें (वेडा झालेला). २५ भूतप्रतिपाळ=पिशाचांचें रक्षण करणारा शिव. २६ मृत्युंजय=शिव. २७ अरि=सुदर्शन. २८ काळात्युग्र=काळाहूनही उग्र. २९ अरि=शत्रु. ३० पद्मभव=ब्रह्मा. ३१ परिभवरोगचिकित्सकपति=पराभवरूपी रोगाची चिकित्सा करणाऱ्यांत श्रेष्ठ. ३२ सद्म=गृह. ३३ भव=शिव. ३४ वैकुंठ=विष्णु. ३५ वरद-मूर्ध-मणे=हे वरदश्रेष्ठा. ३६ वत्सल=दयाळु. ३७ ब्रह्मण्य=ब्राह्मणहितैषी. ३८ भव=संसार. ३९ सर=सरोवर. ४० याद=जलचर. ४१ स्वीकृतभक्ताधि=स्वीकारलें आहे भक्ताचें दुःख ज्यानें असा. ४२ संत=साधु भृगु.

मज बहुमत संत चि न हर न विधि न बहु मता हे कमला[४३] ॥
किं बहुना न बहु मता माझी मज हे मूर्ति हि अमला[४४] ॥ २४ ॥
शरणागतरक्षणदक्ष प्रभु संत चि हरिती तापा ॥
संत क्षमादयाशांतीचे सागर विनवीं बापा ॥ २५ ॥
जनतापा अमृतकर[४५]द्वारां तपना[४६]चा कर[४७] हरितो ॥
माझा प्रसाद साधुद्वारां तैसा लाभे जरि तो ॥ २६ ॥
मदतिक्रम[४८] चक्रक्षोभाचा कीं सदतिक्रम[४९] हेतू ॥
जेथें भेटल जल बांधावा माझें तेथें सेतू[५०] ॥ २७ ॥
श्रवण करुनि भगवद्वचन असें मुनि वैकुंठीं न टिके ॥
संत चि सत्य शरण्य म्हणे तो तदितर सर्व हि लटिके ॥ २८ ॥
शरणार्थी संवत्सरभरि तो मुनि सर्वत्र भ्रमला ॥
गेला साधुप्रति नौदंडा[५१]प्रति खग[५२] तैसा गमला ॥ २९ ॥
शरणागतमव मामार्य असें वदत नृपाच्या जवळीं ॥
जाय पाय वंदाया तो नृप त्यासि भुजांनीं कवळी ॥ ३० ॥
बसवुनि वरासनीं मुनिला नृप चक्राला कर जोडी ॥
पीडित पाहुनि पीडा पावे बहु संत चि तो थोडी ॥ ३१ ॥
भूप म्हणे सासूचें धरिती जैसें सुमति सुना भें[५३] ॥
तैसें द्विज भय जरि धरित असो द्यावें अभय सुनाभें[५४] ॥ ३२ ॥
मज पर्यंत रविकुलज नृप जरि धर्मन्यायाचरणीं ॥
चुकले नसतिल स्वप्नीं ही गुरुविप्रांच्या चरणीं ॥ ३३ ॥
श्रुतिसाधूदित शक्य विहित म्यां केलें असेल कार्य ॥
तरि त्या पुण्यें सुदर्शना त्वां रक्षावा हा आर्य ॥ ३४ ॥
प्रणताभयदमुकुंदबहुमता चक्रा द्विज रक्षावा ॥
हें जरि करणें नसेल आधीं अंबरिषच भक्षावा ॥ ३५ ॥
स्वापत्या वरि हित काम पिता किंवा माता क्षोभे ॥
तदधिककृप नृप त्यासि दंडितां तो न सुनाभा शोभे ॥ ३६ ॥
ऐसें प्रांजलि सज्जन वदतां चक्र प्रभुचें शमलें ॥
झालें शांत सुदर्शन सद्वागमृतें चि असें गमलें ॥ ३७ ॥

---

४३ कमला=लक्ष्मी. ४४ अमल=पवित्र. ४५ अमृतकरद्वारां=चंद्राच्या द्वारें. ४६ तपन=सूर्य. ४७ कर=किरण. (या साकींत चंद्र परप्रकाशित असून त्यास सूर्यापासून प्रकाश मिळतो ही गोष्ट पंतांनीं व्यक्त केली आहे.) ४८ मदतिक्रम=माझा अपमान. ४९ सदतिक्रम=साधूंचा अपमान. ५० सेतु=पूल, बांध. ५१ नौदंड=वल्हें. ५२ खग=पक्षी. ५३ भें=भय. ५४ सुनाभ=सुदर्शन चक्र.

पाद्यें अर्घ्यें स्नानें वस्त्रें गंधें धूपें दीपें ॥
पूजुनि जेववला मुनि केलें भोजन मग त्या भूपें ॥ ३८ ॥
मुनि हनु धरूनि म्हणे हें सद्यश लोकीं संतत राहो ॥
तारुनि जड जीव भवांत तुम्हीं सुकृती संत तरा हो ॥ ३९ ॥
भक्त मयूर देव करुणाघन दासाचा अभिमानी ॥
स्वातिक्रमापरीस स्वजनातिक्रम दुःसह मानी ॥ ४० ॥

अंबरीषाख्यान समाप्त.

---

## विठ्ठलस्तुति.

### दोहावृत्त.

श्रीमद्विठ्ठलमस्तकीं वसे सर्वदा त्र्यक्ष[५५] ॥
जाणों निज निधि[५६]वैरि जागतो पुंडरीकाच्या यक्ष[५७] ॥ १ ॥
पुंडरीकाचा हेत होता या धनीं प्रभूत[५८] ॥
जाणों ब्राह्मण झाला उग्र पंचमुख भूत[५९] ॥ २ ॥
पादोदक घे मस्तकीं शिरीं त्यासि ठाव ॥
प्रियभूषण निज जन चि हा विठ्ठल कळवी भाव ॥ ३ ॥
काय हरिशिरीं हर नव्हे हर हर पडली भूल ॥
आलें मुनिरोपितसुकृततरू[६०]ला उज्ज्वल फूल ॥ ४ ॥
संतत भवदवदग्धतनू[६१] जन भेटती प्रभूत ॥
करुणामृतकलशासी या आलाहे ऊत ॥ ५ ॥
भक्तासि न तुळे हरि हर हि मुनींचा राय ॥
विधि अद्यापि पाहतसे शोधुनि तिसरा काय ॥ ६ ॥
स्थळ न मिळे बैसावया परि सुक्षेत्रीं वास ॥
उचित कलियुगीं कळविती कैलासाब्धिनिवास[६२] ॥ ७ ॥
अजरामर चि करावया स्वचरणनतजनमात्र ॥
सदय विठ्ठलें वाहिलें शिरीं अमृतरसपात्र ॥ ८ ॥
महाराष्ट्र भाषेंत ही दोहा रीति नवी च ॥
रची मयूरेश्वर इला मनीं धरील कवी च ॥ ९ ॥

---

५५ त्र्यक्ष=शिव. ५६ निधि=ठेवा. ५७ यक्ष=कुबेर. ५८ प्रभूत=पुष्कळ. ५९ भूत=पिशाच्य. ६० मुनिरोपितसुकृततरु=मुनीनें लाविलेला पुण्यरूपी वृक्ष. ६१ भवदवदग्धतनु=संसाररूपी वणव्यानें जळालें आहे शरीर ज्याचें असे. ६२ कैलासाब्धिनिवास=कैलास व क्षीरसागर एथें राहणारे शिव व विष्णु.

# वाङ्मनःप्रार्थनापंचाशती.

## वसंततिलकावृत्त.

श्रीरामनाम जपतां तरशील लाटीं । हूं काय पाहसि असो भलतें ललाटीं ॥
राहें घरीं च न शिरें हि कडेकपाटीं । तें बैसवील तुज मुक्तिशि एकपाटीं ॥ १ ॥
नैकौघकोटिनग[६३] नाम पवि[६४] त्रपा[६५] हे । तीर्थांसि दे परम नाम पवित्र पाहें ॥
श्रीरामनाम गुरु संतत पावनांत । त्यागूनियां न करि संत तपा वनांत ॥ २ ॥
चित्ता धरीं न दुसरी तिळ आस राहें । श्रीरामनाम चि करीं दृढ आसरा हें ॥
रक्षील पूरवुनि काम हि मान गानीं । स्वर्गीं किजे वरि फिका महिमा नगानीं॥३॥
नासावया स्मरणिं मानसखेद येतें । नामापरी न करिती च सखे दयेतें ॥
हे सत्सुधांबुनिधिची भजकास वीची[६६] । ते न्यून दृष्टि गमत्ये मज कासवीची॥४॥
नामीं च सोडुनि दुजा पथ वावरावें । रामायणादिकृतिला अथवा वरावें ॥
हे सूपदेश मनिं भव्य वहा रसाचे । त्याहूनियां इतर न व्यवहार साचे ॥ ५ ॥
झालीं भवांत रघुनायकनांवनौके । गेले तरोनि सहजें चि मना वनौके[६७] ॥
तारी क्षणांत चि न तें करवि प्रयास । साक्षी पुरातन दयाकर विप्र यास ॥ ६ ॥
चिंता नसे चि तुज लेश हि आतराची[६८] । तें स्पर्शतां जुरवि भीति हि कातराची[६९] ॥
विश्वास तूं धरिं मना सुखलंपटा कीं । साधूक्त सत्य न मृषा[७०] भय कंप टाकीं ॥७॥
श्रीरामनाम[७१]तरि अद्भुत आढळेना । ऐशी दुजी स्वपद सोडुनियां ढळेना ॥
दावी सदा सुगति हे चि नमज्जनांतें[७२] । दे पावली बहु भरें[७३] हि न मज्जनांतें[७४] ॥८॥
देवासुरीं विमथितां सह सागरातें । विश्वावनार्थ[७५] शिव पी सहसा गरांतें[७६] ॥
तैं रामनाम चि महत्तर लाभ वानी । भर्ता विषार्तिस[७७] म्हणे तरला भवानी ॥ ९ ॥
श्रीरामनामधन सत्सुखबीज नाशा । पावे न वेच करितां पुरवी जनाशा ॥
दे वाहता श्रम न अल्पहि हे नसोनी । पावे हि पावतिल आठवितां न सोनीं[७८] ॥१०॥
वर्तो प्रपंचविषयांत अवासवा[७९] ही । भी नामनिष्ठ न नृपास न वासवा ही ॥
या वांचुनि श्रम सुनिष्फळ तापसांचे । ताप क्षयार्थ तपतां मनिं ताप सांचे ॥११॥
ज्या रामनाम अमृतोत्तम नाचवीतें । तो जाणतो शिव चि एक मना चवीतें ॥
तैसे चि ते रसिक सेविति या रसा जे । लोभी रसज्ञपण त्यांसि च फार साजे॥१२॥
जो यासि वित्तवपुच्यावरि दास वेंचे । श्रीरामनाम तरि होय सदा सवेंचे ॥

---

६३ नैकाघ-कोटि-नग=अनेक पापांचे कोटि पर्वत. ६४ पवि=वज्र. ६५ त्रपा=लज्जा.
६६ वीचि=लहरी, लाट. ६७ वनौके=वनांत राहणारे तपस्वी. ६८ आतर=नौकेंतून उतरण्या-
बद्दल नौकेच्या मालकास जें भाडें देतात तें. ६९ कातर=भितरा. ७० मृषा=खोटें, व्यर्थ.
७१ तरि=नौका. ७२ नमज्जन=नमस्कार करणाराजन ७३ भर=भार, ओझें, वजन. ७४ म-
ज्जन=बुडणें. ७५ अवन=रक्षण. ७६ गर=विष. ७७ आर्ति=दुःख. ७८ सोनीं="सोनें" या
शब्दाचें अनेक वचन. ७९ अवासवा=पाहिजे तितका, यथेच्छ.

हे प्रेमळप्रिय दयाळु कदा रुसेना । या जिंकिती न दहना[८०] अघ[८१]दारु[८२]सेना ॥ १३ ॥
जो नामनिष्ठ घडल्या हि न पातकांनीं । ऐकेल तो नरकगर्तनिपात[८३] कानीं ॥
कीं तें स्मृतींत हि अघाचळ[८४] कांपवीतें । धाकेल धीर धरुनी करि[८५] कां पवी[८६] तें ॥१४॥
श्रीरामनाम सुमहा करवाळ[८७] वीतो[८८] । तीव्र स्फुलिंगें[८९] सुभयंकर वाळवीतो ॥
कामादिशत्रुवदनें मन कांपवीतो । हें शस्त्र सोडुनि धरी हरि[९०] कां पवी तो ॥१५॥
जो कीर्तनें चि वधि शत्रु असा वधातें । नामासि उग्र परिपाळि असावधातें ॥
कानीं मुखीं मनिं वसोनि न काय कापी । जो तो महा रसिक या सुखदायका पी ॥१६॥
अत्यंत उग्र अहितासि सदा हि तासी । नामासि हा प्रिय अनुग्र सदा हितासी ॥
प्रेमें मिळे सुलभ होय कसा धनातें । अत्यंत दुर्लभ अमोलिक साधनातें ॥१७॥
मूढासि नाम चि तदन्य अपाय साचे । बाळासि दे अशन[९१] पुष्टि न पायसाचें ॥
दुग्धें जमे[९२] शिशु[९३] न तो नवनीत[९४]पानें । नामें तरे जन तसा न वनीं तपानें ॥१८॥
यामाष्टकांत[९५] हि पळार्ध हि आळसानें । माता जसें न विसरे निज बाळ सानें[९६] ॥
तैसे चि नामजननी बहु वत्सला[९७] हे । आनंद या सुरभि[९८]चा बहु वत्स लाहे[९९] ॥१९॥
श्रीरामनाम कुळदैवत सार साचें । या होय पाद्य मधु मानससारसाचें[१००] ॥
ज्याचे क्षयोपचयपात्र दुकान सोमीं । त्याला म्हणो तदनुगाधम कां नसो मीं ॥२०॥
नामामृत त्यजुनि सादर ओरपीती[१] । मानूनि दुर्लभ सुधाधिक थोर पीती ॥
स्त्री हाणिती जरि शिरीं हि सकोप टांचा । लागे तथापि रस गोड चि कोपटाचा ॥२१॥
ध्याया पलाशपति[२]च्या अरिला नगावें । त्याचें यश त्यजुनियां बरि लाज गावें ॥
ऐकें मना परिस तूं हि जिभे कशाला । व्यर्थोदितें[३] करिसि हें मुख भेक[४]शाला ॥२२॥
हो स्तोत्र[५]पात्र रसने[६] प्रभुनाम गा गे । मान्या शुनी[७] न नरि आठ हि याम[८] गागे[९] ॥
दे मान पुण्य पुरुषार्थ सुखादि सोपी । मुक्ती हि नामरस दुर्बळसा दिसो पी[१०] ॥२३॥
सेवूनि दाशरथिनामरसा दुधाला । श्रीशंकरप्रमुख सर्व हि साधु धाला ॥
देना सुतृप्ति रस अन्य उणाख[११] पानें । अज्ञात तो मिरवितो स्वगुणा खपानें ॥२४॥
नामान्य सर्व रसनें रस नेष्ट डाजे । नाची निघे बहुत सेविति त्या जडा जे ॥
हा रामनामरस अद्भुत कीं सुखानें । प्या या यथेष्ट अमित श्रवणें[१२] मुखानें ॥२५॥

---

८० दहन=अग्नि. ८१ अघ=पातक. ८२ दारु=काष्ठ, लांकूड. ८३ गर्तनिपात=खळग्यांत पडणें. ८४ अघाचळ=पातकरूपी पर्वत. ८५ करि=हत्ती. ८६ पवि=वज्र. ८७ करवाळ=तरवार. ८८ वीतो=प्रसवतो. ८९ स्फुलिंग=ठिणगी. ९० हरि=इंद्र. ९१ अशन=भक्षण. ९२ जमे=पुष्ट होई. ९३ शिशु=बालक. ९४ नवनीत=लोणी. ९५ यामाष्टक=आठ प्रहर. ९६ सान=लहान. ९७ वत्सला=दयाळू. ९८ सुरभि=कामधेनु. ९९ लाहे=पावे. १००सारस=कमल. १ ओरपिती=खाती, भुरकती. २ पलाशपति=राक्षसराजा. ३ व्यर्थोदित=व्यर्थ भाषण. ४ भेक=बेडूक. ५ स्तोत्र=स्तुति. ६ रसना=जीभ. ७ शुनी=कुत्री ८ याम=प्रहर. ९ गागे=ओरडे, भुंके. १० पी=प्राशन कर. ११ उणाख=हलका, कमी किंमतीचा. १२ श्रवण=कान.

जिकी रसांतर[१३] परंतु अवद्य[१४] पापें । दुःखें विशंक वसती बहु मद्यपापें[१५] ॥
नाचो रडो विभयलज्ज न साधु साजे ॥ तो दाखवी गुण तिहींच * जे ॥२६॥
जो होय नामरस सेवुनि मत्त मानी । त्या विश्व तो चि नमिजे गुरुसत्तमांनीं ॥
इंद्रादि ही म्हणाति वंदुनि पाद रक्षा । या मद्यपासि जन हाणिति पादरक्षा[१६] ॥२७॥
संतांसि वेड हरिनामनवासवाचें[१७] ॥ पीयूष[१८] तेंवि हरिनीं मन वासवाचें[२०] ॥
कीं तो तदन्य विषयांत रमे न केला । वेडा भजे परम सादर मेनकेला ॥ २८ ॥
जिव्हे उदार गुण नाम समस्त वाहें । कौशल्य योग्य रघुराम सम स्तवा[२१] हें ॥
नामें दिल्या न पळ कोप शुभा गतीस । वर्णूनियां इतर कां पशु भागतीस ॥२९॥
जे अज्ञ दैववश दुर्बळ बाळ ज्याची । ज्याच्या चले स्थिति जया बहु काळज्याची ॥
ते न स्तवार्ह[२२] हतकाम समस्त वाचे । रामांघ्रि सद्विषय रामसम स्तवाचे ॥ ३० ॥
भीती स्वशत्रु सम मानिति मागत्यांतें[२३] । धिक्कारिती न रसने धन माग त्यांतें ॥
जो दे धन स्वनुति[२४]च्या करित्या सदेहें । जिव्हे म्हणे मनिं असें तरि त्यास दे हें ॥३१॥
दे रामराज चि अनंत धना दरातें । पावे न तो प्रभु करी न अनादरातें ॥
जे नीतिचा प्रकट मोडिति कायदा ते । विद्यावयोद्रविणदुर्मद[२५] काय दाते ॥ ३२ ॥
गांवा दधीचि मुनि ने निज कायदानें[२६] । श्रीराम कल्पतरु देतिल काय दानें ॥
दे वर्ण[२७] दुःसह म्हणे न मुखें वदा न्या । सर्वस्वें ना शरण त्या चि सुखें वदान्या ॥३३॥
सर्वस्व दे परि उरे धन काय दात्या । रामा नसे चि उपमा धनकायदात्या ॥
ज्याच्या न विश्व सुखनिर्भर होय दानें । व्हावें कधीं रघुवरा सम तोयदानें[३०] ॥ ३४ ॥
त्याचा चि त्या सम जगन्नुत[३१] होय दास । स्तोत्रार्ह सद्गुण न तें पद तोयदास ॥
सत्कीर्तिनें म्हणाति सर्व हि ताप गेला । पीतां तशा परि न सर्वहितापगेला ॥ ३५ ॥
देती अनंत अमृत व्रत सर्वदा ते । संरक्षिती सम न दाविति गर्व दाते ॥
न क्षोभति क्षण न गर्जति हो सराया । जे दुर्दिन प्रभु न जाणति ओसराया ॥३६॥
गातां चि संत हरिति प्रखराघ[३२] वाचे । ध्यातां मनस्तम जसें नख राघवाचें ॥
जैसे अभिन्न नख संत तसे वनांत । गेलों जडोनि पदिं संतत सेवनांत ॥ ३७ ॥
सन्मूर्ति ती रघुपतिप्रतिमा जिभे दे । भद्रें[३३] न हे परि असन्मतिमाजि भेदे ॥
बिंबस्वरूप गुण जे न तदर्पणातें । शंकें पटुत्व न मळे हत दर्पणांतें[३४] ॥ ३८ ॥

---

१३ रसांतर=इतर रस. १४ अवद्य=निंद्य. १५ मद्यपापें=मद्य पिणारा जवळ. १६ पादरक्षा=जोडे. १७ हरिनामनवासव=हरिनामरूपी नवीन मद्य. १८ पीयूष=अमृत. १९ हरिना=हर्ष करीना. २० वासव=इंद्र. २१ स्तव=स्तुति. २२ अर्ह=योग्य. २३ मागत्यांतें=मागणारांतें, याचकांतें. २४ नुति=स्तुति. २५ विद्यावयोद्रविणदुर्मद=विद्या, द्रव्य, तारुण्य या संपत्तीनें मत्त झालेले. २६ काय-दान=शरीरदान. २७ वर्ण=अक्षर. २८ स्व=द्रव्य. २९ वदान्य=दाता. ३० तोयद=मेघ. ३१ नुत=स्तुत. ३२ प्रखराघ=तीक्ष्ण पाप. ३३ भद्र=कल्याण. ३४ दर्पण=आरसा. * मुळांत चार अक्षरें कमी आहेत.

श्रीरामचंद्रसम तत्प्रिय संतराय । ध्यातां तदंघ्रिरजें[35] नाशिल अंतराय[36] ॥
केलें तया नमन सोडुनि दर्प कानें । ऐकोनि तद्बळ महा खळ दर्पकानें ॥ ३९ ॥
ऐकोनि पाठ करिं दोन चि वर्ण वाचे । जे राम हे प्लवें[37] महाविपदर्णवाचे[38] ॥
तो सच्चकोरहित राघव इंदु[39] बा हे । जे सद्यामृत तदीय सुबिंदु वाहे ॥ ४० ॥
कीं यामुने[40] त्रिपथगौघ[41] मिळोनि वाहे । सूर्येंदु सुज्ञ तम ताप गिळो न वाहे ॥
दोषाटवीपरि शिखी[43] पवमान[44] साचे । कीं मूर्त भाग्य परमोत्सव मानसाचे ॥ ४१ ॥
कीं मायबाप हृतहृद्व्यथ[45] बांसुरांचे । श्रीरामलक्ष्मण धणी अथवा सुरांचे ॥
हे रामनाम युग[46] वर्ण[47] चि वर्ण वाचे । साक्षात् सुखप्रद तरंग[48] मुदर्णवाचे[49] ॥ ४२ ॥
संसाररोगविषमोदधिपारदासी[50] । नामासि साधिति सुबुद्धि न पारदासी[51] ॥
त्या प्रेममूर्छितजराविसरा[52] जपावें । तैसें न नाम चि खरा रसराज[53] पावे ॥ ४३ ॥
जो जाठरस्मरशिखी[54] बहु पेटवीतो । गले विकार रिपु दाटुनि भेटवी तो ॥
गोवी बळें चि सुरतव्यसनीं[55] चखोटा[56] । तो भव्य सेव्य रसराज जनीं नखोटा ॥ ४४ ॥
ज्ञाता म्हणे स्वहित दुःख दे हरो-गा । भोगें स्वपातक दिलें तुज देहरोगा ॥
सन्मान्य जो करि यथार्थ दया सखा या । मारूनि तो खवळि काम तयास खाया ॥ ४५ ॥
दावी अनंतगुणनाम सदोषधीचे[57] । क्षाळूनि राजस तामस दोष धीचे ॥
ऐसें रसायन सदिष्ट नसे व्ययातें । पावे हि ना म्हणाति सज्जन सेव्य यातें ॥ ४६ ॥
श्रीवैद्यनाथ[58] म्हणताति जया शिवाला । श्रीरामनामरस सेवुनि तो निवाला ॥
अद्यापि हा रस पाजितसे भवार्तां[59] । हे सांगती गुरुमुखें श्रुत साधु वार्ता ॥ ४७ ॥
श्रीरामनाम रसने तुज आवडावें । सद्रत्न शीघ्र कळतां गुण सावडावे ॥
चित्ता इला स्वहित ठाउक काय रानीं । गोपीं[60] विणें नुमजिजे हित गायरानीं[61] ॥ ४८ ॥
श्रीरामनामरस गोड तुला गमेल । स्वांतांतरीं[62] च रसना[63] सहजें रमेल ॥
जें सूत्रधारमतिसंमत कृत्य काय । व्यापारुनी न करि बाहुलि नृत्य काय ॥ ४९ ॥

मोहीं श्रीरामनामा निज मधुर गुणें सर्वदा या जिभेला ।
माशीला शर्करेचा स्ववश करि जसा चाखण्या माजि भेलों[64] ॥

---

३५ अंघ्रिरज=पादधूलि. ३६ अंतराय=विघ्न. ३७ प्लव=नौका. ३८ विपदर्णव=विपत्तिरूप सागर. ३९ इंदु=चंद्र. ४० यामुन=यमुनेचा. ४१ त्रिपथगौघ=भागीरथीचा ओघ. ४२ दोषाटवी=दोषरूपी अरण्य. ४३ शिखि=अग्नि. ४४ पवमान=वायु. ४५ हृतहृद्व्यथ=हरण केली आहे हृदयाची व्यथा ज्यानें. ४६ युग=चार ( संख्या ) किंवा दोन. ४७ वर्ण=अक्षरें. ४८ तरंग=लहरी, लाटा. ४९ मुदर्णव=आनंदरूपी सागर. ५० संसाररोगविषमोदधिपारद=संसाररोग हाच एक कठिण समुद्र त्याचे पार नेणारा. ५१ पारद=पारा. ५२ विसर=समूह. ५३ रसराज=उत्तम रसायन. ५४ स्मरशिखी=मदनाग्नि. ५५ व्यसन=संकट. ५६ चखोट=चांगला. ५७ सदोषधी=उत्तम वल्ली. ५८ वैद्यनाथ=याचा अपभ्रंश वैजनाथ. ५९ भवार्त=संसारपीडित. ६० गोप=गुराखी. ६१ गायरांनीं=गायरें (गुरें) या शब्दाच्या तृतीयेचें अनेक वचन. ६२ स्वातांतरीं=मनांत. ६३ रसना=जीभ. ६४ भेला=खडा.

गुंतो ही जीभ जैशी नव मधुसि जशी धांव घेऊनि हुंगी ।
राहो गुंतोनि लोभें त्यजुनि मरणभी विस्मृतज्ञाति भृंगी ॥ ५० ॥
सख्या रामनामा अशी एक आहे। मयूरेश्वराची तुला प्रार्थना हे ॥
पिता माय तूं सत्य मी बाळ साचा । नव्हे काळ साचार हा आळसाचा ॥ ५१ ॥

समाप्त.

---

## रामप्रार्थनादशक.

### अनुष्टुभ् वृत्त.

श्रीरामा नीरद[६५]श्यामा सुखधामा रघूत्तमा ।
त्वत्पादनख-चंद्राची ज्योत्स्ना[६६] माझ्या हरू तमा[६७] ॥ १ ॥
ज्यास्तव स्मरतों नित्य स्वामी तुज दयाकरा ।
तापा पासूनि हा दीन मुक्त होय असें करा ॥ २ ॥
सेवा करावया लावा देवा हा योग्य चाकर ।
या तप्ताच्या शिरीं आतपत्र[६८] हो तुमचा कर ॥ ३ ॥
शरणागत-संत्राणीं[६९] रामा तूं बहु सादर ।
ऐसें असोनियां दीन पावतो हा कसा दर[७०] ॥ ४ ॥
माया-नदींत श्रीरामा तुझे चरण सांगडी ।
बहु आवडले हे ची साधूंच्या मानसां गडी ॥ ५ ॥
मीनांचें[७१] जीवन जळ दीनाचें तूं चि केवळ ।
मी नाथा तापलों यत्नहीनांचें मुख्य तूं बळ ॥ ६ ॥
आलों शरण्या[७२] तुजला शरणागत-पातकी ।
न होसि तूं दीनबंधो शरणागत-घातकी ॥ ७ ॥
विश्वास[७३] विश्वास[७४] तुझा कीं तूं दीनासि रक्षिसी ।
कशा ही संकटीं धांव म्हणतां न उपेक्षिसी ॥ ८ ॥
तुझ्या प्रतापें आम्हांतें या काळीं जरि पाळिलें ।
तरी सांभाळिलें सर्व यश नातरि वाळिलें ॥ ९ ॥
गाय पंकांत रुतली राय तो तीस उद्धरी ।
पाय दीनासि रक्षीना काय श्रेष्ठत्व तें तरी ॥ १० ॥

---

६५ नीरद=मेघ. ६६ ज्योत्स्ना=चांदणें. ६७ तम=अंधकार, पातक. ६८ आतपत्र=छत्र. ६९ संत्राण=रक्षण. ७० दर=भीति. ७१ मीन=मासा ७२ शरण्य=रक्षक. ७३ विश्वास=भरंवसा. ७४ विश्वास=सर्व जगतास.

अमृतध्वनिछंद.

लंकापतिप्रमथनं कामतरूमंकाहितानत जैनं[७५] ।
पंकाब्धिपोतमकलंकाकर्ति सुत्हदलंकारमद्भुतगुणम् ॥
रंकावनादृतकरं कालकंठविनुतं कारणं त्रिजगताम् ।
तं काममीडयचरितं कामयेऽनवरतं कायानिर्जितघनम् ॥ १ ॥

---

## गणपतिप्रार्थनादूर्वा[७६].

श्रीगजवदना देवा दे वात्सल्यें[७७] करून दास्यवर ॥
त्वद्दासाचें चि सदा होतें विद्वत्सभेंत आस्य[७८] वर ॥ १ ॥
विघ्न निवारूनि करिसी संपूर्ण मनोरथ स्वदासांचे ॥
तव कारुण्य[७९] नतीं[८०] जळ जैसें निम्नाकडे[८१] सदा सांचे ॥ २ ॥
बा पावली अपर्णा[८२] भजुनि जशी देवकी वरें तूतें ॥
त्वच्चरितें अमृतफळें अतितृप्तिकरें वरें[८३] परें तूतें[८४] ॥ ३ ॥
धन्य करिसि सुज्ञानें तव चरणीं वाहती असु[८५] ज्ञानी ॥
सामान्य मानिलासि प्रभुवर तूं सर्वथा असुज्ञानीं[८६] ॥ ४ ॥
कृतकृत्य[८७] जीव होतो दूर्वांकुर तव पदीं निवेदून ॥
मग सर्वस्व निवेदुनि[८८] भावें कां न प्रभो निवे दूनें[८९] ॥ ५ ॥
होसी तृप्त शिवेच्या[९०] तूं श्रुतिचीं[९१] अति महा जनक थानीं ॥
झालासि शिशु गजवदन* वरिति तुझ्या गति महाजन कथांनीं ॥ ६ ॥
भजन बळद सांगति तें वचन असे तत्व जाणते दशमीं ॥
न शमीपत्र ह्मणसि लघु होतों तेणें चि पूजका वश मीं ॥ ७ ॥
पिटुनि प्रत्यूहातें[९२] देसी पुरुषार्थसिद्धि नम्रांतें ॥
[९३]ती सोडी त्या न कधीं देवा जसि कामुकी[९४] न कम्रातें[९५] ॥ ८ ॥
जो करितो कार्याच्या त्वत्पद हृदयीं धरूनि आरंभा ॥
रंजवि सिद्धि तया जशि शक्रा नाचुनि करूनि आ रंभा ॥ ९ ॥
जरि गजवदन बृहदुदर[९६] न दिससि तूं लोकनायक विपारा[९७] ॥

---

७५ या पादांत दोन अक्षरें कमी आहेत. ७६ रा. माधवचंद्रोबा यांनीं आपल्या सर्वसंग्रहांत मोरोपंतकृत स्फुट प्रकरणांत "गजाननस्तवदूर्वा" म्हणून एक आर्याबद्ध प्रकरण छापलें आहे. परंतु तें याहून भिन्न आहे. ७७ वात्सल्य=दयालुत्व. ७८ आस्य=मुख. ७९ कारुण्य=दयालुत्व. ८० नत=नम्र. ८१ निम्न=सखल, खोलगट, उतरण. ८२ अपर्णा=पार्वती. ८३ वरें=श्रेष्ठें. ७४ तूतें=तुतीचीं फळें. ८५ असु=प्राण. ८६ असुज्ञ=अजाण. ८७ कृतकृत्य=धन्य. ८८ समर्पुनि असाही पाठ आहे. ८९ दून=दुःखी. ९० शिवा=पार्वती. ९१ श्रुति=वेद. ९२ प्रत्यूह=विघ्न. ९३ ती=सिद्धि. ९४ कामुकी=कामवश स्त्री. ९५ कम्र=सुंदर पुरुष. * गजवदन=हत्तीचें आहे तोंड ज्याचें. ९६ बृहदुदर=मोठें आहे पोट ज्याचें असा. ९७ विपारा=कुरूप.

भवजलनिधिच्या जडसे पावति चिंतूनि पाय कवि पारा ॥ १० ॥
तव रूपें पांडित्यें नृत्यें गानें सदार शिव हर्षे ॥
तुज वरि दिव्य सुमननिकर सस्त्रीक सुरर्षि सिद्धगण वर्षे ॥ ११ ॥
तुझिया नृत्यें गानें पावति गंधर्व अप्सरा लज्जा ॥
किति हे श्रीविष्णु म्हणति या अमृताब्धींत दृष्टि हो मज्जा ॥ १२ ॥
अमितांडाश्रय अवयव तव नवल दिसति उगेचि आखुड बा ॥
सर्व म्हणति खर्व तदपि सुगुणमणींचा चि होय आखु डबा ॥ १३ ॥
देवा देवारि म्हणति रुद्र वृष जसा तसा चि आखुप तो ॥
नयनांत आमुच्या बहु कणसा पण साधितां सदा खुपतो ॥ १४ ॥
विद्वत्सभेंत उत्तर देतो स्वप्नीं हि होय न विकळ तो ॥
गणनाथा भक्त तुझा होउनि लोकत्रयांत कवि कळतो ॥ १५ ॥
गानकवित्वादि कळा ज्यांत सुधेची तशी च चव दात्या ॥
देसी देवा विद्या सर्वा पुरुषार्थहेतु सवदा त्या ॥ १६ ॥
मंगळमूर्ते करिती तुज पूजुनि मंगळक्रियारंभा ॥
त्यांच्या सिद्धि करितसे सुरनाथाच्या जशी प्रिया रंभा ॥ १७ ॥
जे तापवूनि म्हणती सुद्दा ही काळि जाउ लगडीतें ॥
होती विघ्न स्मरतां तुज शतशः संकटें उलगडीते ॥ १८ ॥
वदनांत नाम गवसो संहरिता सर्व गद नसो पारा ॥
अमृत हि न गमे तूं चि प्रिय देता आत्मसदन सोपारा ॥ १९ ॥
वाहति गृहभर न भजुनि तुज जेंवि वृष व्रणार्त कंठाळा ॥
पावसि केंवि कृपासह न म्हणवतां बाष्परुद्धकंठाला ॥ २० ॥
तव चरणधूलिस जशी स्वर्गींच्या गाइला सवे दानीं ॥
कविकवि यापरि देवा गणनाथा गाइलास वेदांनीं ॥ २१ ॥
स्तन्याद्यर्पुनि करिती न म्हणे प्रिय तोकें हाय तें माय ॥
न यशें त्रिजगीं पावुनि दिधलें त्वां भाग्य आयतें माय ॥ २२ ॥

---

९८ भवजलधि=संसारसमुद्र. ९९ पार=पलीकडचें तीर. १०० सदार=सस्त्रीक. १ सुमननिकर=पुष्पसमूह. २ अब्धि=समुद्र. ३ दृष्टि=डोळे. ४ मज्जा=बुडी मारा. ५ आखु=उंदीर. ६ अरि=शत्रु. ७ आखुप=गणपति. ८ हेतु=कारण. ९ सुरनाथ=इंद्र. १० सदन=गृह. ११ सोपारा=सोपा, कठिण नव्हे असा. १२ वृष=बैल. १३ व्रणार्त=ज्यांच्या पाठीवर जखम झाली आहे असे. १४ बाष्परुद्धकंठाला=अश्रु आल्यामुळें कोंडला आहे गळा ज्याचा अशाला. १५ सवे=संवय. १६ कविकवि=कवींचा कवि म्ह० श्रेष्ठ कवि. १७ स्तन्य=स्तनांतील दूध. १८ करिती=करस्ये. १९ तोक=बालक. २० माय=आई. २१ माय=मावे, राही.

दूर्वा समर्पिल्या श्रीगणपतिला एकवीस आर्यांहीं[२२] ॥
ज्यां ऐकोनि ह्मणावें बा आशी[२३] घे कवीस आर्यांहीं[२४] ॥ २३ ॥

इति गणपतिप्रार्थनादूर्वा समाप्त.

---

## कृष्णाप्रार्थना.

श्रीकृष्णे देवि तव स्मृतिनें ही जाड्यजन्य[२५] ताप सरे ॥
तापस रेवाश्रित[२६] नो त्याची विश्वांत[२७] धन्यता पसरे ॥ १ ॥
सफळ स्वेष्टापूर्ते लीलादत्तात्मसत्सुखस्फूर्ते ॥
साक्षान्मुकुंदमूर्ते त्वद्भक्त चि धन्य कलियुगीं पूर्ते ॥ २ ॥
श्रीमूर्ति तशी घेसी सर्वांचीं तूं महानदी नमनें ॥
तुज भजुनि मानिलें सुख सुरपतिचें[२८] ही लहान दीनमनें ॥ ३ ॥
गंगेला निववासि तूं भेटुनि निववावयासि आलीला ॥
कृष्णे कोणा करवीं करविति न तुझ्या सुखार्थ आ लीला ॥ ४ ॥
कवि ह्मणति सुर पितर हो आले अच्छवि प्रोंशा ॥
तिळ कृष्णाभक्ताशा अमृति[३०] न जशि विषयीं अच्छविप्राशा[३१] ॥ ५ ॥
कृष्णे स्वच्छ तव यश ब्रह्मांडावरि हि चांदवा[३२] होतें ॥
वाहे पिशाचपतिशिर[३३] उन्मत्त[३४] तसें चि चांद वाहो तें ॥ ६ ॥
कृष्णे सुकृत कुकृत जें जीवाचें तें तुला सकळ कळतें ॥
तव मन जसें जननिचें दुःखित देखुनि मुलास कळकळतें ॥ ७ ॥
न बधे[३५] सुज्ञ सुधेतें[३६] तुझिया पावोनि कीर्तिकणिकेतें ॥
आत्म स्थितितें लाहुनि जैसा शुकदेव देवगणिकेतें[३७] ॥ ८ ॥
दाखविजे तव तटगे[३८] तशि जशि परजीनता[३९] यमा ईशें[४०] ॥
या सुयशें ती चकिता देती वर जी नता यमाई[४१] शें ॥ ९ ॥
कृष्णे तुला न सोसे जें भक्त्यनभिज्ञ[४२] याद[४३] तळमळलें ॥
न तुझें दीनोद्धारालस्यमळें[४४] तिळ हि पादतळ मळलें ॥ १० ॥
कृष्णे ह्मणसि प्राणी जो दुर्मति विषयकाम अतितर तो ॥

---

२२ आर्यांहीं=आर्यावृत्तांनीं. २३ आशी=आशीर्वाद. २४ आर्यांहीं=श्रेष्ठांनीं. २५ जाड्य जन्य=मुढतेपासून होणारा. २६ रेवा=नर्मदा. २७ विश्व=जगत्. २८ सुरपति=इंद्र. २९ या आर्यांत कांहीं अक्षरें कमी आहेत. ३० अमृत=मोक्ष. ३१ अच्छविप्राशा=उत्तम ब्राह्मणाची आशा. ३२ चांदवा=छत. ३३ पिशाचपति=शिव. ३४ उन्मत्त=पिसा, वेडा. ३५ न बधे=वश होत नाहीं. ३६ सुधा=अमृत. ३७ देवगणिका=रंभा. ३८ तटग=तटावर राहणारा. ३९ परजीनता=अतिम्हातारपण. ४० ईश=सदाशिव. ४१ यमाई=देवीविशेष. ४२ भक्त्यनभिज्ञ=भक्ति न जाणणारे. ४३ याद=जलचर प्राणी. ४४ दिनोद्धारालस्यमळें=दीनांच्या उद्धाराविषयीं जो आळस तोच मळ त्यानें.

सेवुनि मत्पयें[45] मद्यश चिर वैकुंठीं निवोनि पतित रतो ॥ ११ ॥
जे कलियुगीं अशुचितम पावविले त्वां पदा शुचितमा ते ॥
श्रीकृष्णे ब्रह्मांडीं तुज चि चरित हें सदा उचित माते ॥ १२ ॥
तव नामयश:क्षीरें[46] प्राशितसे भगवति प्रजा जी जी ॥
नमुनि म्हणावें लागे तींतीस सदा सुरव्रजीं[47] जी जी ॥ १३ ॥
झालें होइल हि तुझें पळ हि उदासिन मत्सेमीं[48] न मन ॥
कृष्णे तरि तुज करितों अपराधी म्हणुनि वत्स मी नमन ॥ १४ ॥
आण प्रिय न पुरवितां मी स्पष्ट करीन वत्स रुसवा हें ॥
जाड्यघ्नचिदसिच्या[49] निज महिम्या स्वकरीं नव त्सरू[50] वाहें ॥ १५ ॥
श्रीकृष्णे केवळ जड[51] आहें लोकां दिसो अजडसा या ॥
द्रवुनि पहा क्षम[52] होइल कामव्याघ्रासि हा अज[53] डसाया ॥ १६ ॥
श्रीकृष्णे उद्धरिसि विषयाचा धरुनि लोभ जो माते[54] ॥
विटला संसारसुखा शरणागत कां न तो भजो माते[55] ॥ १७ ॥
वात्सल्य तुझें चि अतुल अन्यत्र हि भजुनि काय देवि किती ॥
क्षिति माय हि बाप हि ते स्वापत्यें त्यजुनि कायदे[56] विकिती ॥ १८ ॥
दूरस्था किमपि न दे म्हणतो गुणदोष जल्पत रुसा जो ॥
तो काय तुज पुढें शतमूर्ख जन म्हणेल कल्पतरु साजो ॥ १९ ॥
पूरु[57]सम त्वज्जलकण दु:खित ते जीव गुर्वसुसमान[58] ॥
देवी स्वार्थपर सुरव्रज कृष्णे देवि तुर्वसु[59]स मान ॥ २० ॥
हरुनि विषयतृष्णेतें कृष्णे तें कृष्णमूर्ति यश रक्षीं ॥
हा भक्त रामनंदन मंद नत दयार्द्रदृष्टिनें लक्षीं ॥ २१ ॥
कृष्णे व्यासादिसुकवि रोमांचाक्रांतकाय गेयशलें ॥
सोडुनि तुझें चि गाती म्यां गावें देवि काय गे यश तें ॥ २२ ॥
तव यश मानसीं[60] सद्गुण पद्मीं[61] सुकवि राजहंस[62] मी अळिसीं[63] ॥
लघु मलिनें[64] तदपि केला प्रेमरसें बद्ध वामनें बळिसा ॥ २३ ॥

---

४५ मत्पय=माझें पाणी. ४६ क्षीर=दूध. ४७ सुरव्रज=देवसमूह. ४८ मत्सर्मी=मज-सारख्या विषयीं. ४९ जाड्यघ्नचिदसीच्या=अज्ञान नाशक ज्ञानरूपी तरवारीच्या. ५० त्सरु=मूठ ( याला कोंकणात थरू म्हणतात. ) ५१ जड=मूढ. ५२ क्षम=समर्थ. ५३ अज=बोकड. ५४ माते=माझे. ५५ माते=हे आई. ५६ कायदे=नियम. ५७ पूरु=ययातीच्या एका पुत्राचें नांव. ५८ गुर्वसुसमान=( गुरु+असु+समान ) बापाच्या प्राणासारखे. ५९ तुर्वसु=ययातिराजाच्या पुत्राचें नांव. ६० मानस=या नांवाचें सरोवर. ६१ पद्म=कमल. ६२ राजहंस=उत्तम हंस. ६३ अळि=भ्रमर. ६४ मलिन=काळा, पक्षीं पापी.

भलत्या प्रभुचा हि पराभव देवासम हि मानवा चकवी ॥
कृष्णे म्हणाति तव परा भव दे वास महिमा नवा च कवी ॥ २४ ॥
माते कृष्णे न्हाते गाते तुज पूज्य नेंवि जामाते ॥
दाते होति ध्याते हीं ते न च म्हणाति काथिति हें ज्ञाते ॥ २५ ॥
तूं विष्णुमूर्ति गंगा विष्णुपदी भेटल्या सख्या आर्या ॥
आर्या परिसोनि करा दिनोद्धाराद्भुतोचिता कार्या ॥ २६ ॥

इति कृष्णाप्रार्थना

---

## मोरोपंतकृत
# अमृतमथन.
### अध्याय १ ला.

श्रीकांताच्या प्रेमें करिती त्या सद्यशासि पाठ कवी ॥
भक्तांसि अमृत पाजी इतरांसि जरी मनीं कृपा ठकवी ॥ १ ॥
समरांत होत होते ज्या काळीं देववीर असुरहित ॥
नैं होय उत्तरोत्तर बळिच्या राज्यांत सर्व असुरहित ॥ २ ॥
जें स्वप्रसादमाळा न निज शिरीं मत्तगजशिरीं स्थापी ॥
तो हि पशु पदें तुडवी दुर्वासा म्हणुनि जिष्णुला शापी ॥ ३ ॥
निःश्रीक शक्र झाला त्या श्रीमुनिच्या वरूनि शापातें ॥
तापद शाप न वाटे ग्रासी तो राहु त्या निशापातें ॥ ४ ॥
शक्रादिलोकपाळ ब्रह्मयातें कळविती स्वतापा त्या ॥
तो हि म्हणे या कळवूं विश्वासह आमुच्या स्वतां पात्यां ॥ ५ ॥
क्षीराब्धितटीं जाउनि विनवी प्रभुला घनासि चातकसा ॥
पाव म्हणतांचि पावे होऊं देईल दासघात कसा ॥ ६ ॥
वपु अपुनर्भवदानें रचिलें हरिनीलसारघनसारें ॥
वस्त्रयुग-कनकसारें जाणों स्मित अमृतधौतघनसारें ॥ ७ ॥
प्रभुवर विधिशर्वांते दावी कृतचंद्रकुत्सवदनातें ॥
तेव्हां त्याला वाटे तें मोक्षाहुनि उत्सवद नातें ॥ ८ ॥

---

६५ जामाते=जांवई. ६६ हा=हायहाय ६७ आर्या=श्रेष्ठा.

* हें प्रकरण पंढरपुराहून पंतांचे वंशज मयूरपंडित यांजकडून रा० रा० अनंत विनायक सोहोनी यांचे मार्फत आमचेकडे आलें. १ असु-रहित=गतप्राण. २ असुर-हित=दैत्य-कल्याण. ३ जिष्णु=इंद्र. ४ निशाप=रात्रिपति चंद्र. ५ पाता=रक्षण कर्ता. ६ हरिनील=इंद्रनील मणि. ७ घनसार=कापूर. ८ कृतचंद्रकुत्सवदन=केली आहे चंद्राची कुत्सा म्ह० निंदा ज्यानें असें मुख.

दक्षिण अदक्षिण हि रविशशिशतनुतरत्नकुंडल हरिचें ॥
मधुर तदभयोक्तिपुढें भाग्य किती अमृतकुंडलहरीचें ॥ ९ ॥
दृगवशमार्थ नग सकळशोभार्थ सुरम्य तोंड त्याला हो ॥
तदधरतुलापराधें कां न अधःपतन तोंडल्याला हो ॥ १० ॥
जे मिरविति मलिनकुटिलपण जरि मूर्धस्थ केशवाचे ते ॥
विपरीत फलद कविच्या केवळ ते वर्ण्य केश वाचेतें ॥११ ॥
सदमृतकरांकुरत्वें प्रभुचा एक हि न वर्णवे दांत ॥
कविला धीर भरंवसा देसा एक हि न वर्ण वेदांत ॥ १२ ॥
म्हणती साहे वाक् शुक तिलपुष्प श्रीमदा न नासा जे ॥
ते शिशु असें म्हणावें शोभवुनि श्रीमदानना साजे ॥ १३ ॥
असता मंगळकर रवि तेज हि न त्यापुढें उरतें ॥
म्हणतों तेणें नभसें कौस्तुभमणिनें विराजलें उर तें ॥ १४ ॥
बाहु सुलक्षण अभयद भीतांचे सेतु जे विभु जगांचे ॥
दुष्टप्राणप्राशनकर्ते आचार्य जेवि भुजगांचे ॥ १५ ॥
दृष्टजनताप विलया स्वीकारुनि कूर्मदृष्टिनय नेतीं ॥
अनुकंपासुखशयनें पंकजजयनें प्रसन्न नयनें तीं ॥ १६ ॥
व्यसनीं सुखें तरावें यत्स्मरणीं धरुनि आदरा जीवें ॥
कोण कवि न भुलला तीं वर्णूं जातां सुपादराजीवें ॥ १७ ॥
प्रभुच्या प्रादुर्भावीं सर्वां देवांत सारसभवांचीं ॥
नेत्रें उघडीं होतीं कीं ध्याया तो तसा रस भवाचीं ॥ १८ ॥
ससुरहर विधि म्हणे त्या सदया वरदेश्वरा त्रिजगदाद्या ॥
स्वामी मनोव्यथातां आम्हां शरणागतां सदगदा द्या ॥ १९ ॥
साक्षी प्रभु त्यांसि म्हणे कळलें मज युष्मदिष्ट कामकरा ॥
सुर हो प्रथम बळिसवें मद्वचनें निज हितार्थ साम करा ॥ २० ॥
सर्पाखुन्याय मनीं धरुनि करा साम शत्रुशीं पहिलें ॥
त्यांहीं तुह्मीं करावें क्षीरधिचें मथन मंदरें वहिलें ॥ २१ ॥
तृणवल्लिवीरुदोषधिभार बहु क्षीरधींत सोडा हो ॥
मंथा करुनि मंदरगिरि वासुकिरज्जु त्यासि जोडा हो ॥ २२ ॥
क्षीरधिमथनीं अद्भुत अमृतरस निघेल अन्य ही वस्तू ॥
निःस्पृहसे सर्व असा ते जें म्हणतील तें म्हणा अस्तू ॥ २३ ॥

---

९ अनुकंपा=कृपा. १० व्यसन=संकट. ११ राजीव=कमल. १२ सारसभव=कमलोद्भव ब्रह्मा. १३ भव=शिव. १४ सदगद=उत्तम औषध. १५ आखु=उंदीर. १६ वहिलें=तात्काळ.

सुर हो भिवों नका हो प्रथमोत्था विश्वदुःसहा गरळा ॥
हित करि माय न म्हणतां बाळें कीं दे स्वदुग्ध दे गरळा ॥ २४ ॥
तैसें पाजीन तुम्हां भक्तां त्या अमृतनाम सुरसा रे ॥
तेणें तत्काळ तुम्हीं अजरामरकाय व्हाल सुर सारे ॥ २५ ॥
विफलश्रम रिपु म्हणतिल नाहीं पडला मुखीं सुरस हाय ॥
ऐसें वदोनि झाला अंतर्हित[17] कौतुकी सुरसहाय ॥ २६ ॥
भगवदुपदिष्टमंत्रश्रवणमुदिताचित्त[18] कंजज[19]पिनाकी[20] ॥
गेले स्वस्थानातें बळिच्या सदनासि साधिपति नाकी[21] ॥ २७ ॥
सेंद्रसुरांतें पाहुनि ओढिति ते असुर शीघ्र तरवारी ॥
कीर्त्यर्ह प्रऱ्हादप्रभुपौत्रें[22] तयांसि शीघ्रतर वारी ॥ २८ ॥
धवलसुकीर्तिदुशालां टाकुनि अकीर्तिकांबळिला जे ॥
पांघुरविते न ते बुध त्या कर्मे तो न कां बळि लाजे ॥ २९ ॥
बळि भेटे शक्राला सत्कार करुनि साधु उत्सव दे ॥
ज्या अर्थे आलां तें सांगावें मज असें अकुत्सें[23] वदे ॥ ३० ॥
हरि[24] गुरुवरें पढविली होती हितयुक्ति जी तशी च वदे ॥
ती त्या बळिच्या श्रुतिला जिव्हेसि जशी सुधा तशी चव दे ॥ ३१ ॥
साम करिति देवांच्या नेणुनि ते असुर मंद रागाला ॥
उन्मूलिति बाहुबळें क्षीरधिमथनार्थ मंदरागाला[25] ॥ ३२ ॥
ते सबळ बाहु वाहुनि नेत चि होते जपोनि सुरसार्थ[26] ॥
त्यजिति पथीं बहुकंदरमंदरभरभग्न[27] दैत्यसुरसार्थ[28] ॥ ३३ ॥
राहे पथीं कनकनग[29] साहे न भरासि कटक भोग हें ॥
जाणुनि तेथें येणें केलें स्वाशक्तिकीर्तिभागें हें ॥ ३४ ॥
तो नग मग जगदीशें गरुडावरि वाहिला न हालवला ॥
तद्भारें एका ही पत्राचा प्रांत ही न हालवला ॥ ३५ ॥
क्षीरधितटीं उतरिला प्रभुनें गिरि तें विचित्र न गमो जी ॥
कांडफलांतर्गत[30] कण एक असें आपणासि नग मोजी ॥ ३६ ॥

---

१७ अंतर्हित=गुप्त. १८ भगवदुपदिष्टमंत्रश्रवणमुदितचित्त=भगवंतानें उपदेशिलेल्या मसलतीचें श्रवण करून आनंदित झालें आहे चित्त ज्यांचें असे. १९ कंजज=कमलोद्भव ब्रह्मा. २० पिनाकी=शिव. २१ नाकी=स्वर्गांत रहाणारे देव. २२ पौत्र=नातु. २३ अकुत्स=अनिंद्य. २४ हरि=इंद्र. २५ मंदराग=मंदरपर्वत. २६ सुरसार्थ=अमृताकरितां. २७ बहुकंदरमंदरभरभग्न=पुष्कळ ज्याला गुहा आहेत अशा मंदरपर्वताच्या भारानें पराभव पावलेला. २८ सुरसार्थ=देवसमूह. २९ कनकनग=मेरुपर्वत. ३० कांडफळ=ब्रह्मांडरूपी फळ.

वासुकिला नेत्रें[३१] करुनि मंदरगिरिला करूनियां मंथा ॥
आदरिला क्षीराधिच्या मथनाचा दैत्यसुरबळें पंथा ॥ ३७ ॥
असुर म्हणाति वदन धरूं धरा तुम्हीं सर्व देव पुच्छा या ॥
लाघवहेतुपथीं पद न आमुची क्षण हि दे वपु च्छाया ॥ ३८ ॥
सुर म्हणाति मनीं खळ हो जें गर्वा व्यसन योग्य भोगा तें ॥
प्रकट वदाति बहु बरवें घ्या सर्व तुम्हीं च पूर्वभोगातें[३२] ॥ ३९ ॥
भरमग्नगिरिस पृष्ठीं धरि होय क्षीरधींत कासवसा ॥
उपदेशी कीं माझी स्वस्थ सुजन हो धरूनि कास वसा ॥ ४० ॥
यति म्हणाति जया गतिचा हा जनक खरा दुजा अजनक मठ ॥
झाला क्षीराधिमध्यें जड तारायासि तो अज न कमठ[३३] ॥ ४१ ॥
पृष्ठीं कमलाधिक गुरु न गमे नग मेरुरुक्म ही अजि तें ॥
वर्णावें किति धरिलें जें कच्छपवपु[३४] सुरार्थ त्या अजितें ॥ ४२ ॥
गगनगदुग्धाब्धिमथनकुतुकप्रेक्षकसुरांत राहूनी ॥
कवळी अजित नगाच्या डळमळतां मस्तकासि बाहूंनीं ॥ ४३ ॥
क्षीराधिमथनारंभीं त्या साधुहितें असाधुंच्या अहितें ॥
बळ दिधलें देवांतें असुरांतें मंदराद्रितें अहितें[३५] ॥ ४४ ॥
वासुकिच्या बहु नासामुखनयनांतूनि बहु गळे गरळ[३६] ॥
तद्धूमानळहतरुचि असुर गमति दावहत जसे सरळ[३७] ॥ ४५ ॥
वासुकिच्या श्वासविषज्वलनें तो देवगण हि होरपळे ॥
एका प्रभुला पाहुनि विषवन्हि जसा चि विधुंसि[३८] चोर पळे ॥ ४६ ॥
भगवद्वश घन वर्षति देवांवरि कीं तसे न सेव्य जन ॥
वीजी भगवद्भक्तां वायु भलें धरूनियां जसें व्यंजन[३९] ॥ ४७ ॥
सुरअसुर बहु श्रमले अमृत निघेना चि किमपि मग हरि तो ॥
मथन स्वयें चि करि करिवर[४०]वरद मुकुंद जो दुरितें[४१] हरितो ॥ ४८ ॥
वारुनि सुरासुरचमू अहिला परदेवता तसें कवळी ॥
बाळा सुता स्नुषांतें वारुनि दधि गोपिका जसें ढवळी ॥ ४९ ॥
क्षीराधिमथनीं प्रभुनें केवळ न स्वकवचकुंडलें कटकें ॥
डोलविलीं देवांचीं दैत्यांचीं साहिपतिशिरें कटकें ॥ ५० ॥
प्रथम निघे हाळाहळ विषरस जो मृत्युजनक वणवासा ॥

---

३१ नेत्र=मंथ्याची ( रवी ) दोरी. ३२ पूर्वभोग=शरीराचा पूर्वभाग ( भोग=शरीर. ) ३३ कमठ=कासव. ३४ कच्छप=कासव. ३५ अहि=सर्प. ३६ गरळ=विष. ३७ सरळ=देवदाराचीं झाडें. ३८ विधु=चंद्र. ३९ व्यजन=विंझणा. ४० करिवर=गजेंद्र. ४१ दुरित=पाप.

ज्या लोकपाल भ्याले त्याच्या घेइल जन कवण वासा ॥ ५१ ॥
अत्युग्रवेगदुःसहविषसंग्रस्त प्रजापति शिवाला ॥
गेले शरण यदंघ्रिस्मृतिनें जनभवदवार्त हि निवाला ॥ ५२ ॥
म्हणती त्रिभुवेशा या विषदहनें हें न विश्व करपावें ॥
आम्हां विषतापार्ता दासां होऊनि अमृतकरें[४२] पावें ॥ ५३ ॥
विश्वेश विश्वमूर्ते विश्वंभर विश्वकामकल्पतरो ॥
या गरळव्यसनीं हें जग भुजगग्रस्तभेक[४३]कल्प तरो ॥ ५४ ॥
तत्काळ चि करुणार्णव[४४] देव वतंसीकृतेंदुकळ[४५] वळला ॥
तें विश्वप्राणहर व्यसन विलोकूनि फार कळवळला ॥ ५५ ॥
गिरिजेसि म्हणे देवि प्रणतार्तिहरे अहो अनादिसती ॥
मच्चरणान्य शरण्य प्राणव्यसनीं न या जनां दिसती ॥ ५६ ॥
ती प्रभुशक्ति वृथा जी न हरी भय केलिया नमन दीनें ॥
काय असोनि दवडिला जरि तृषिताचा न तृट्श्रम नदीनें[४६] ॥ ५७ ॥
प्राणादि सर्व वेंचुनि आर्तांचें करिति संत रक्षण हो ॥
करुनि मज प्रणति म्हणाति या व्रतनियमीं न अंतर क्षण हो ॥ ५८ ॥
भूताभयद पुरुष जो चूडामणि होय हो सुमेरुस तो ॥
शरणागता न भयदावरि धर्म मुकुंद ही उमे रुसतो ॥ ५९ ॥
दीनांचें परिपालन हें चि मज प्रभुसि कर्म देवि वर ॥
ऐसें सद्योगिमना चिर वरिलें ही न शर्म दे विवरें[४७] ॥ ६० ॥
हरि सुप्रसन्न होतो येणें चि भवानि मी हि हरिशील ॥
धरिशील तूं हि हें व्रत जरि तरि मन्मन समूळ हरिशील ॥ ६१ ॥
जग जगदीश्वरि वांचो त्वदधरमधुसें चि सेवितों विष मी ॥
तो आप्तोत्तम कामा ये जो धांवोनि अवसरीं[४८] विषमीं ॥ ६२ ॥
गरळप्राशनकर्मा अनुमोदन दे सती प्रभावज्ञा[४९] ॥
काय करावी त्या गरतिमिरें[५०] प्रभुभास्करप्रभावज्ञा[५१] ॥ ६३ ॥
हाळाहळगरळाच्या श्रीशंभु करी सलील आचमना ॥
आला तो सुरमणि परमार्थेच्छूच्या न अन्य काच मना ॥ ६४ ॥
कर्पूरनिभें[५२]गळातें नील करी परम मलिन हळहळ तें ॥
साधुसि विभूषण परी कविमन खळखळपणें चि हळहळतें ॥ ६५ ॥

---

४२ अमृतकर=चंद्र. ४३ भेक=बेडूक. ४४ अर्णव=सागर. ४५ वतंसीकृतेंदुकळ= तुरा केला आहे चंद्रकलेचा ज्यानें असा. ४६ नदीन=समुद्र. ४७ विवर=गुहा. ४८ अवसरीं= प्रसंगीं. ४९ प्रभावज्ञा=शक्ति जाणणारी ५० गरतिमिर=विषरूपी अंधःकार. ५१ प्रभावज्ञा= तेजाचा अपमान. ५२ निभ=सदृश.

साधुमना न परहिताचरणीं घडल्या हि मरण तळमळवी ॥
मदकर्दमीं[५३] न सन्मति तिळभर डावें हि चरणतळ मळवी ॥ ६६ ॥
घालील तव यशावरि सकळ सती प्राणवल्लभा टकळा ॥
शंभुपुढें विष्णु म्हणे धरुनि मुदुत्फुल्लगल्ल[५४] भाटकळा ॥ ६७ ॥
त्या कर्मांची कोण ज्ञाते करितील न प्रशंसा हो ॥
म्हणती असा चि समयीं अभयद सकरुण शिरोवतंसा[५५] हो ॥
प्राशन करितां स्मरहरकरगलितप्रखरतरगरलरस तो ॥
व्याळवरवृश्चिककुळीं अद्यापि सुदुःसहप्रकृति वसतो ॥ ६९ ॥
इति श्रीभागवते श्रीरामनंदनमयूरविरचिते अमृतमथने प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

## दुसरा अध्याय.

हरिली अशी पुरहरें प्राशुनि गरळासि ती सुरासुरभी[५६] ॥
मग मथितां क्षीरधिला प्रकटे अत्यंत भासुरा[५७] सुरभी[५८] ॥ १ ॥
जीणें अर्थिजनाचा वंध्य मनोरथ कधीं न राहविला ॥
ती घेतली ऋषींनीं सुगतिद मखसाधका वरा हविला ॥ २ ॥
त्या नंतर प्रकटला नामें उच्चैःश्रवा धवल वाजी ॥
वदले तुरग परस्पर कीं ही अस्मद्धुरा धवलवा[५९] जी ॥ ३ ॥
बळि बोले हा माझा याचें मी शोभवीन पल्याण[६०] ॥
करिन अरींचें अकुशळ आप्त जनांचें समग्र कल्याण ॥ ४ ॥
चित्तीं म्हणे हरि बळें देइल मज पद्मनाभ या तुरगा ॥
म्हण म्हणसी तें मन्मन गुरुशिक्षालंघना भयातुर गा ॥ ५ ॥
ऐरावतनाम चतुर्दंत गज निघे तसें चि आणीक ॥
त्या दुग्धोदधिपासुनि कौस्तुभनामक अनर्घ्य माणीक ॥ ६ ॥
सुर म्हणति परस्पर ते रद पाहुनि त्या अशेषकरितिलकीं ॥
हरनग[६१]शिखरांशीं हे शुद्ध सरळ साधु सख्य करितिल कीं ॥ ७ ॥
अनघ सुवृत्त सुरक्तप्रकृति म्हणूनि जड हि कौस्तुभ प्रभुला ॥
आवडला सज्जन हो या चि गुणगणा दुज्या गुणा न भुला ॥ ८ ॥
मग दुग्धोदधिकुक्षींतूनि निघे पारिजातनग[६२] राया ॥
जो स्वर्गा भूषवितो कामप्रद तूं जसा स्वनगरा या ॥ ९ ॥

---

५३ मदकर्दम=गर्वरूपी चिखल. ५४ मुदुत्फुल्लगल्ल=आनंदानें विकासित आहेत गाल ज्याचे. ५५ अवतंस=भूषण. ५६ सुरासुरभी=देवदैत्यभीति. ५७ भासुरा=तेजस्वी. ५८ सुरभी=कामधेनु. ५९ धवलवा=पांढरो करा. ६० पल्याण=खोगीर. ६१ हरनग=कैलासपर्वत. ६२ नग=वृक्ष.

मग अप्सरा निवाल्या ल्याल्या मणि नेसल्या तनु सुवासें ॥
ज्यांहीं भ्रमर भुलविले सारससौरभसखें तनुसुवासें ॥ १० ॥
त्या उपरि श्री भुवनीं प्रकट कराया महा सुख निघाली ॥
निज कांतिनें दिशांतें झांकण ती दीप्तिची सुखनि घाली ॥ ११ ॥
सादर सुरासुरांनीं ती श्री बहु मानिली जशी अलिनीं ॥
कुटजकुसुमरससेवन करितां भाग्यें विलोकिली नलिनी ॥ १२ ॥
महदद्भुतासनातें स्वकरें तत्काळ तीस मांडूनी ॥
बसवी विनवुनि सुरपति आत्ममहत्वाभिमान सांडूनी ॥ १३ ॥
गंगादिनद्या आल्या अभिषेकालागिं तोय आणूनी ॥
ओषधि आणी क्षोणी श्रीचा अभिषेकसमय जाणूनी ॥ १४ ॥
शुचि पंचगव्य आणुनि विनवुनि म्हणती पुनः पुन्हां गाई ॥
साहित्य सर्व झालें तीर्थजळें देवि शीघ्र न्हा गाई ॥ १५ ॥
मधुरस घेउनि आला मूर्त श्रीमानृतूत्तम वसंत ॥
घन वाद्यें वाजविती करिती अभिषेक दिग्गिभवर संत ॥ १६ ॥
ज्यातें पाहुनि आपण दास असें तप्तहेमवर्ण वदे ॥
कौशेयांबरयुग्म स्नानोत्तर त्या सतीस अर्णव दे ॥ १७ ॥
श्रीवपु सहज रुचिर जें सद्भावें करुनि विश्वकर्मा तें ॥
बहु भूषवी नगांनीं वर्णी त्या फार विश्व कर्मातें ॥ १८ ॥
दे वरुण वैजयंती सेवुनि जीचें यथेष्ट मधु परवा ॥
इतररसाची न धरुनि करिति सुमधुरा यदीय मधुप रवा ॥ १९ ॥
वाणी श्रीस म्हणे या त्वत्स्तनविश्लेष न मणिहारा हो ॥
गंगापूर सुरनगीं जैसा तैसा चि रमणि हा राहो ॥ २० ॥
पद्मभवें पद्म दिलें नागांनीं कुंडलें दिलीं नमुनी ॥
आशी दिल्या तिहीं जे ज्ञानी भगवत्पदीं निलीन मुनी ॥ २१ ॥
श्रीदेवी मग चाले उत्पलमाळा सलील धरुनि करीं ॥
शोभे सुरासुरगणीं मूर्त मधुश्री च जेंवि तरुनिकरीं ॥ २२ ॥
गंधर्वयक्षचारणसिद्धसुरासुरगणांत ती पाहे ॥
कीं आपणासि आश्रय कोण ध्रुव अतुलशुद्धगुण आहे ॥ २३ ॥
जेथें जेथें सुतपश्रुतइत्यादीड्य गुण जना दिसती ॥
तेथें तेथें पाहे बहुधा दोषासि ती अनादि सती ॥ २४ ॥

६३ सुवासें=उत्तम वस्त्रें. ६४ सारससौरभ=कमलाचा वास. ६५ दिग्गिभ=दिग्गज. ६६ निकर=समूह. ६७ ईड्य=स्तुत्य.

कोठें शुद्ध तप असे परि दारुण नाशहेतु कोप महा ॥
दुर्वासःप्रभृतितपोधन सुभुजगमणिकरंडकोपम[६८] हा ॥ २५ ॥
कोठें सुरगुरुशुक्रप्रभृतींत ज्ञान बहु असे परि तें ॥
संगविवर्जित नाहीं परिपूर्ण हि दूषितांबु पात्र रितें ॥ २६ ॥
आहे महत्त्व बहु परि न द्रुहिणीं चित्तभूजेय[६९] न सोमीं ॥
भलता वर वरुनि म्हणें केंवि सुवर जरिं नसे तरि नसो मीं ॥ २७ ॥
जरि ईश्वरत्व दिसतें शक्रप्रभृतींत तरि न तें साचें ॥
होय परापेक्षकसा ईश्वर निववी न पान फेसाचें ॥ २८ ॥
जरि धर्म परशुरामप्रभृतींत असे नुसे चि भूतदया ॥
निजभर हरिला म्हणवुनि चिंतू कल्याण एकमत दया ॥ २९ ॥
न त्याग मुक्तिकारण झाला जरि तो कवि प्रभूत दया ॥
न शिबिप्रभृति मना ये गाती जरि साधु विप्र भूतदया ॥ ३० ॥
कोठें वीर्य असे परि तें परिहरिलें न काळवेगानें ॥
पित्त कृतवीर्यसुत[७०]मुखवर्यिकथांच्या चि चाळवे गानें ॥ ३१ ॥
सनकादि समाधिनिरत विषयांचें त्यांपुढें कसें मांडे ॥
पीतामृतासि कैसे वश करितिल आपुल्या रसें मांडे ॥ ३२ ॥
मार्कंडेयादि असे दीर्घायु परंतु तें नसो शील ॥
सोशील सर्व हि स्त्री परि इंद्रियदमन हें न सोशील ॥ ३३ ॥
जेथें इंद्रियलालन तेथें क्षण भरंवसा न आयूचा ॥
काळाचा वेग जना दुःसह अभ्रासि जेंवि वायूचा ॥ ३४ ॥
कनककशिपुप्रभृतिला करिता झाला क्षणांत गट काळ ॥
सुगुण हि साधुद्वेष्टा तो केवळ दोषसिंधु फटकाळ ॥ ३५ ॥
इंद्रियदमन हि नाहीं आयुष्याचा हि भरंवसा आहे ॥
श्रुत पूर्वोक्त न दोष श्रीरुद्रीं म्हणुनि आण ही वाहे ॥ ३६ ॥
परि तो हि अमंगळसा मसणीं भूतांत नग्न कां नांदे ॥
वाळांच्या भस्मभुजगभूषण हें नाम भीति कानां दे ॥ ३७ ॥
ऐसा विचार करितां श्री श्रीपुरुषोत्तमासि पाहूनी ॥
चित्तीं म्हणे सुमंगळ वर हा चि न अन्य धन्य याहूनी ॥ ३८ ॥
जरि हा आत्मरत प्रभु याला माझी नसे तिळ हि परवा ॥
पर वाहेन वपु पदीं ऐसा कैंचा मिळेल वर बरवा ॥ ३९ ॥

---

६८ करंडकोपम=करंडयाची आहे उपमा ज्याला असा. ६९ चित्तभूजय= मदनजय.
७० कृतवीर्यसुत=सहस्रार्जुन.

जावें शरण प्रभुतें जाशी गेली सुरनदी नदीनातें ॥
शोभे महत्तमातें आश्रय करितां न दीन दीनातें ॥ ४० ॥
स्वरता हि मुकुंदातें वरित्यें कीं आधि हा सरो वर हो ॥
स्नातातें निववी जरि अपरापेक्षक सुधासरोवर हो ॥ ४१ ॥
यद्यपि आत्मरत प्रभु हरि तरि वरिला परासि न वरी हो ॥
कंठीं घालुनि माला झाली श्रीविष्णुची च नवरी हो ॥ ४२ ॥
श्रीला श्रीकृष्णप्रभु निज वक्षोमरकतालयीं ठेवी ॥
शोभे सघनगगनतळगत विद्युद्व्रतति[७१]हूनि ती देवी ॥ ४३ ॥
श्रीची सुरांसि पूर्वाधिकबळगुणरूपशील दे दृष्टी ॥
ग्रीष्मीं दवदग्धद्रुमवरनिकरातें जशी सुधावृष्टी ॥ ४४ ॥
परजन विगतश्रीक श्रीनयनें होय जेंवि दिन दीप ॥
महिमा क्षणांत आटे घटजकरें जेंवि सर्व हि नदीप ॥ ४५ ॥
प्रीति सुरजनीं माळा प्रभुकंठीं भव्यगुणसुखनि घाली ॥
मग वारुणी सुरा बहु विषयिजना द्यावया सुख निघाली ॥ ४६ ॥
देवेशानुमतें ती असुरांनीं कमललोचना कन्या ॥
नेली कीं त्या चि जना अत्यनुरूपा तशी नव्हे अन्या ॥ ४७ ॥
मग भगवान् धन्वंतरि ये घेउनि अमृतसुरस कलशातें ॥
तो नेला असुरांनीं म्हणती हरिलीं च सुर सकल शातें ॥ ४८ ॥
होउनि विषण्ण[७२]मानस सुर गेले शरण त्या शरण्यातें ॥
ज्याचें कल्पतरूंच्या लज्जा औदार्य दे अरण्यातें ॥ ४९ ॥
अजित म्हणे स्वस्थ रहा करितों कार्य योगमायेनें ॥
न प्रार्थितां हि माता हरित्ये स्वापत्यरोग मायेनें ॥ ५० ॥
आधीं मीं आधीं मीं प्राशीन म्हणोनि करिति कलहातें ॥
अमृत म्हणे प्राशाया बहु झटतां त्यजुनि नीति खल हातें ॥ ५१ ॥
प्रबळां म्हणति अबळ जे स्वसहाय विभाग योग्य सुरसा रे ॥
त्यांसि न देतां कैसे प्राशूं म्हणतां स्वयें चि सुर सारे ॥ ५२ ॥
तों प्रभुनें धरिलें स्त्रीरूप अधिक शतगुणें रमेपरिस ॥
ज्याच्या पादरजीं निजसामर्थ्य गणुनि उणें रमे परिस ॥ ५३ ॥
वर्णावी काय कशी उपमा विश्वांत सुंदरी तिस ती ॥
भेटुनि दे असुरांतें सहसा सुंदोपसुंदरीतिस ती ॥ ५४ ॥
इति भागवते श्रीरामनंदनमयूरविरचिते अमृतमथने द्वितीयोध्यायः ॥

---

७१ प्रतति=लता. ७२ विषण्ण=दुःखी.

## अध्याय तिसरा.

भुलले असुर समग्र हि सहसा अवलोकितां सुरमणीतें[73] ॥
नेणुनि मायास्त्रीकृतयोषावेषा तया सुरमणीतें[74] ॥ १ ॥
ते पुसती सुंदरि तूं कोणाची कोण काय आलीस ॥
श्रीस पहाया किंवा आम्हां निववावयासि आलीस ॥ २ ॥
विधिनें निर्मुनि आम्हांप्रति पाठविलीस सुखविलासार्थ ॥
हा दैत्यदानवांचा त्वां भेटुनि फार सुखविला सार्थ[75] ॥ ३ ॥
आतळले न सुरासुर तुज पूर्वीं पाहिलीस चि न कोणीं ॥
आहे उमा हरांगीं कां बैसुनि राहिली शचि न कोणीं[76] ॥ ४ ॥
तो धन्य तूं जयाच्या करिशील अशून्य सुदति[77] शयनातें ॥
तुजशीं सुमुखि असावें पावाया नित्य मुदतिशय[78] नातें ॥ ५ ॥
अनुकूल सर्व आम्ही झालों दैत्य सुर सकल शाला ॥
शोभीव दीपिकाशी घे या हस्तांत सुरसकलशाला ॥ ६ ॥
कश्यपदायाद[79] सकल आम्हीं सुरसार्थ[80] भांडतों भेद ॥
खेद नव्हे तें चि करीं शब्द तुझा सुबहुमत जसा वेद ॥ ७ ॥
हास्य करुनि बहु रुचिरापांगाहीं सुररिपुंसि पाहोनी ॥
कपटस्त्रीवेष प्रभु बोले पळभरि उगा चि राहोनी ॥ ८ ॥
कश्यपदायाद तुम्हीं कैसे मज पुंश्चलीसें[81] अनुसरतां ॥
विश्वास कामिनीचा पंडित न धरिति कदापि तनु सरतां ॥ ९ ॥
नव नव हुडकिति शालावृक आणि स्वैरिणी स्त्रिया लोला ॥
यांचें सख्य अशाश्वत सुररिपु हो होय कीं नव्हे बोला ॥ १० ॥
ऐसें वदतां प्रभुच्या पाहुनि रुचिरप्रभावहास्यातें ॥
मानुनि विनोद करिती ते असुर हतप्रभाव हास्यातें[82] ॥ ११ ॥
प्रभुनें तृप्त स्वकरें त्या अमृतें साधुसुरसभाजन हो ॥
म्हणुनि भुलविले पर ते देती विनवुनि सुरसभाजन[83] हो ॥ १२ ॥
सस्मित देव म्हणे हो श्रवण करा स्थिर रहा सुरस हा या ॥
वांटिन साधु असाधु हि जरि मान्य असा महासुर सहाया ॥ १३ ॥
केलें मान्य मनांतुनि तें सर्व ह्मणोनियां तथास्तु तिहीं ॥
पूजुनि जगत्प्रभुसि अनुसरुनि सुखें बंदिजनपथा स्तुतिंहीं ॥ १४ ॥

---

७३ सु-रमणी=उत्तम स्त्री. ७४ सुर-मणि=देवश्रेष्ठ. ७५ सार्थ=समूह. ७६ कोणीं=कोंपऱ्यांत. ७७ सुदति=सुंदर आहेत दांत जीचे. ७८ मुदतिशय=आनंदातिशय. ७९ कश्यपदायाद=कश्यपपुत्र असुर. ८० सुरसार्थ=अमृतार्थ. ८१ पुंश्चली=वेश्या. ८२ आस्य=मुख. ८३ भाजन=पात्र.

स्नानस्वस्त्ययनद्विजपूजनहवनादि सर्व जें उक्त ॥
करिति सुरासुर होउनि त्या अमृतप्राशनीं च ते युक्त ॥ १५ ॥
शोभविति बसोनि अमृतपानार्थ असुर सुर सकल शाला ॥
तेथें योषिद्रूपप्रभु ये घेऊनि सुरसकळ[84]शाला ॥ १६ ॥
कुंभस्तनी मदालसमधुरगति महाविभूतिची आली[85] ॥
मूर्तिमती ती मंजुल गीति च जाणों मृगव्रजीं[86] आली ॥ १७ ॥
न उरों दे भान पदीं जें जें वाजे गतींत नूपुर[87] तें ॥
मणिभूषणें प्रकटिती तेज दिशांत हि नतीं तनू पुरतें ॥ १८ ॥
लीलाविलोकनस्मितनर्माहीं न भुलला न आढळला ॥
त्यांत पदर तद्धैर्याकरवीं म्हणवावयासि हा ढळला ॥ १९ ॥
परदेवता विमोही ते देव असुर समस्त नावरुनी ॥
नो काय पदर ढळला अमृतकनकघटसमस्तनीं[88] वरुनी ॥ २० ॥
दीपोद्भासित धूपा[89]मोदित शालेंत नीट ती महिता ॥
परदेवता तयांच्या बहुमानें पंक्ति बैसवी सहिता ॥ २१
सुर असुरांत बसविले बहु असुर सुरांत ही प्र[90]ताराया ॥
ज्यां पंक्तिभेद घडला या स्वयशें ते हि विप्र ताराया ॥ २२ ॥
बहु मानें प्रिय वचनें निकटस्थासुर अतिक्रमुनि जाय ॥
दूरस्थ सुरांतें दे अमृत लहानांसि पय जसें माय ॥ २३ ॥
जा मोठ्यांमोठ्यांला सुलभा स्वप्नीं हि न वसुधापीं[91] जी ॥
परदेवता स्वयें ती यापरि भक्तांसि नव सुधा पाजी ॥ २४ ॥
म्हणती स्ववंचनें[92] करुनि देखत देतां परां सुरस हा ते ॥
परि तत्प्रेमें साहति बहुधा न कधीं असें सुर सहाते ॥ २५ ॥
स्वकृतसमय[93]परिपालन तत्स्नेह स्त्रीविवाद निंद्य जनीं ॥
स्वप्रणय हि बहु तीच्या ठायीं त्याची हि भंगभीति मनीं ॥ २६ ॥
कृपण पिवूं द्या पूर्वी धीर तुम्ही क्षण बसा उगे चि सहा ॥
बहु मान असा करि जो बंध चि केवळ तया तुटे चि न हा ॥ २७ ॥
यास्तव अप्रिय किमपि न वदले दितिदनुज कामुक ते ॥
नसते अभक्त जरि तरि अमृतरसप्राशनासि कां मुकते ॥ २८ ॥
त्या मोहसमुद्रांतुनि तेव्हां बाहेर एक राहु निघे ॥
सुररूप स्वीकारुनि अमृतातें रविशशींत राहुनि घे ॥ २९ ॥

---

८४ कलश=पात्र. ८५ आली=सखी. ८६ व्रज=समूह. ८७ नूपुर=पैंजण. ८८ घटसमस्तन=कलशसदृश उरोज. ८९ आमोदित=सुवासित. ९० प्रताराया=ठकवाया. ९१ वसुधाप=पृथ्वीपाति राजा. ९२ वंचन=ठकविणें. ९३ समय=प्रातिज्ञा; करार.

त्या चंद्रार्कांहीं तों खळ सूचवितां चि अजित चक्रातें ॥
प्रकट करुनि शिर खंडुनि पाडी तत्काळ कपटिशक्रातें[14] ॥ ३० ॥
प्रभुनें निग्रह केला परि वैर स्मरतो तरी च हा डास ॥
ध्याया धांवे यासी इतरा कैंची तरी चहाडास ॥ ३१ ॥
कपटप्रशमार्थ करी नसतां बळहीन देव सांगातें ॥
जें वांछित वंध्यत्वें दासीं पळ ही न दे वसों गा तें ॥ ३२ ॥
प्रकटी अशी प्रभु कपटलीला प्रबळांसमक्ष महिता तें ॥
अमृत सुरां दे करिता कोण इतर यासम क्षम[15] हितातें ॥ ३३ ॥
केलें श्रितकार्य मग प्रगट न कां तो स्वमूर्ति करिल हरी ॥
जाणों ती त्या करुणामृतनिधिची कामपूर्तिकरी लहरी ॥ ३४ ॥
अमितदयामृतमेघें लक्ष्मीकांतें हरूनि परगर्व ॥
भक्तमयूर निववीले सफळ मनोरथतरू करुनि सर्व ॥ ३५ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टमस्कंधे श्रीरामनंदनमयूरविरचिते अमृतमथने तृतीयोध्यायः । अमृतमथन समाप्त

---

### मोरोपंतकृत

## आर्यागीतिमुक्तामाला[1].

सुख तें परम न माये भुवनीं जें रामचंद्र परमनमा ये ॥
न रूचे मधु रामातें गातां त्याच्या कथा सुमधुरा मातें ॥ १ ॥
दुःखतमोरवि चारि रूपें घेऊनि दिव्य रुचिर विचारी ॥
विलया नेउं दरातें[2] क्षितिच्या ये दशरथांगना[3]उदरातें ॥ २ ॥
राज्ञींच्या उदरासी लाजे रत्नाकरा[4]ख्य तो मुदराशी[5] ॥
नृप सुकृतव्रततीतें[6] मानी फलित स्वसुकृतव्रत तीतें ॥ ३ ॥
कौसल्योदरजातें रामाख्या सर्ववंद्यपादरजातें ॥
कैकेयीतनयाला भरत असें नाम सर्वविदितनयाला ॥ ४ ॥
वीर्य ज्ञान अतनु[7] ज्यां त्यां दोघां सुंदरां सुमित्रातनुजां ॥
लक्ष्मण शत्रुघ्न अशी अभिधा[8] जी नुरवि शत्रुहस्तां असी[9] ॥ ५ ॥

---

१४ शक्र=श्रेष्ठ. १५ क्षम=समर्थ.

१ हें प्रकरण पंतांचे वंशज वे० शा० सं० रा० रा० मयूरपंडित यांजकडून रा० रा० अनंत विनायक सोहनी यांचे मार्फत पंढरपुराहून आमचेकडे आलें. २ दर=भीति. ३ अंगना=स्त्री. ४ रत्नाकर=समुद्र. ५ मुदराशि=आनंदाचा ठेवा. ६ सुकृतव्रतती=पुण्यलता. ७ अतनु=पुष्कळ. ८ अभिधा=नांव. ९ असि=तरवार.

बहु अनवद्या[10] सकळा आल्या गुरूपासुनी सुविद्या सकळा ॥
जननीतातपाद न त्यजिती फळलें म्हणे पिता तपदान ॥ ६ ॥
पंक्तिस्यदनें[11] चव घे अमृताची देखतां चि नंदन चवघे ॥
न गणी शक्रपदासी अमृतांध: स्त्री[12] गणी न तक्रपदासी[13] ॥ ७ ॥
राम मुनीशक्रतुला[14] रक्षी साहे न बुधमतें शक्रतुला ॥
केली बहु सदपचिती[15] जी सत्कार्यघ्नपापजनमद पचिती ॥ ८ ॥
बुध ज्याच्या तम जाया स्मरति रजा त्या पदें चि गौतमजाया ॥
उद्धारितां सदयातें वर्णी सानंद देवमुनिसद[16] यातें ॥ ९ ॥
कृतबळमदनवधनुतें[17] भंगुनि मिथिलापुरीं क्षणें भवधनुतें ॥
वरिली दानवशमनें सीता कुतुकें न हृन्निदानवशमनें ॥ १० ॥
ज्वालापुंजमदाग्निप्रभ जो ज्या शिव गुरू पिता जमदग्नी ॥
तो जिंकुनि कुशिकजनी[18] *त्र्यक्षाधिक हें चि दाविलें रसिक जनीं ॥ ११ ॥
गुर्वाज्ञा[19] परम हिता पुत्राला पुण्यकीर्तिसुखपर महिता ॥
राज्यसमान सजाय[20] प्रभु विपिनीं[21] गणुनि तुष्टमानस जाय ॥ १२ ॥
पुत्रास नृपकवि रहा न म्हणे जाणे हि मृत्युदायक विरहा ॥
करि जें करवी रमणी सत्यच्युतिभीत सुज्ञवर वीरमणी ॥ १३ ॥
माता हि अलोभरतें गतपरमार्था विनिंदिली त्या भरतें ॥
दे संत्रास[22] अहितें[23]सा पुत्र हि तिस होय दुर्गुणें चि अहि[24] तसा ॥ १४ ॥
कविमौलिहिरा[25] ज्यातें साधिति नृप करूनि पातका हि राज्यातें ॥
त्यातें हि न शिवला हो कोण न घे सुज्ञ सद्गुजनशिवलाहो[26] ॥ १५ ॥
घेउनि ऊन वनांतें[27] वांछि तसा या भवा भिवून वनातें[28] ॥
आउनि विभुला भरत प्रणाम करि रामपादुकालाभरत ॥ १६ ॥
होइन तापस राया किंवा दे पादुका स्वताप सराया ॥
पादभजनलाभरतें ऐसा रघुनाथ तो विनविला भरतें ॥ १७ ॥
तेव्हां सुरनरतातें स्वपादुका अर्पिल्या स्वभजनरतातें ॥
गेला निज नगराला विरहाहुनि भरत तीक्ष्ण गणि न गराला[29] ॥ १८ ॥

---

१० अनवद्या=अनिंद्य. ११ पंक्तिस्यंदन=दशरथ. १२ अमृतांध: स्त्री=अप्सरा. १३ तक्रपदासी=ताक पिणाऱ्याची दासी. १४ क्रतु=यज्ञ. १५ सदपचिति=सज्जनसत्कार. १६ सद्=सभा. १७ मदनवधनुत=शिवस्तुत. १८ कुशिकजनी=विश्वामित्र. * त्र्यक्ष=शिव. १९ गुर्वाज्ञा=बापाचा हुकूम. २० सजाय=स्त्री सह. २१ विपिन=अरण्य. २२ संत्रास=भीति. २३ अहित=शत्रु. २४ अहि=साप. २५ कविमौलिहिरा=ज्ञानिशिरोभूषण. २६ शिवलाहो=कल्याणलाभ. २७ वन=उदक. २८ वन=अरण्य. २९. गर=विष.

दुष्ट विराधवनाशी मुनिंच्या पीडा तदा धराधवें[30] नाशी ॥
करुनि बहु कृपा दर जें तें हरिलें भुवनवंद्यतमपादरजें[31] ॥ १९ ॥
सुखविति गोदे वसती करुनि तटीं सानुजन्म[32] नरदेव सती ॥
पातकिसंपर्कमला हरिति जणों लावुनी तिला पदकमला ॥ २० ॥
स्मरशत[33]जितरुचिराशी लाजवि जो सर्ववस्तुसी रुचिराशी ॥
पाहुनि विभु भुलवाया चरणीं ये रावणस्वसा भुलवाया ॥ २१ ॥
वांछा कळवि धवाचे[34] सीतेच्या गुण गणूनि बहुविध वाचे ॥
कंठीं पडतां रंडा हांसे प्रभु धर्मनीतिरत्नकरंडा ॥ २२ ॥
धाडी स्वानुजनि[35]कडे तों गेली उडत ले वनीं विजनिं कडे ॥
दावी स्तन वदन कटी तेव्हां करि तीस तो प्रियंवद नकटी ॥ २३ ॥
नासाछेदनकुपिता म्हणे खराला तुझा जनांत न कुपिता ॥
नरदंडितभगिनीच्या त्राणीं क्लीबा[36] मृषा[37] भिदा जागें नीचा ॥ २४ ॥
पावे दंडा असती दंडवि ते बंधु आप्त जे जे असती ॥
चवदा सहस्र रजनी-चर[38] वधवी प्रभुकरें चि जे प्रखर जनीं ॥ २५ ॥
जो निशिचरराजें[39] बळी त्याच्या जाऊनि ते अवीरा[40] जवळी ॥
मग कानानाकाच्या वृत्ता कथि हास्यदा जना नाकांच्या[41] ॥ २६ ॥
पव्यहतो रागानें[42] सुखविति गंधर्व ज्यास तो रागानें[43] ॥
रावण फार खवळला रामावरता जसा अतिविखें[44] वळला ॥ २७ ॥
शोकत्रास सहाया संगें घे ताटिकासुतास सहाया ॥
आला रामकुटीलीं[45] तो आणुनियां त्रिवक्रता भ्रुकुटीला ॥ २८ ॥
दशमुख हा मारीचा मृग करुनी तुष्टिदा महामारीच्या ॥
मोहाया त्वरितगती धाडी माया[46] न जेथ पळभरि तगती ॥ २९ ॥
कपटी राक्षस कळला परि प्रियेच्या मताकडे प्रभु वळला ॥
होणारें[47] कोण चुकवी विषयें व्यसनांत[48] पडति गुणचुंचु[49] कवी[50] ॥ ३० ॥
तज्ज्ञत्वा न विसरला परि राघव तो प्रियोक्तिला अनुसरला ॥
याचा हि भोग सरला श्रीमंताची प्रवृत्ति केवळ सरला ॥ ३१ ॥

---

३० धराधव=पृथ्वीपति राम. ३१ भुवनवंद्यतमपादजें=भुवनास अत्यंत वंद्य आहे पादधूलि ज्याची अशा रामानें. ३२ सानुजन्म=बंधूसह. ३३ स्मर=मदन. ३४ धव=पति. ३५ अनुजनि=बंधु. ३६ क्लीब=दुर्बल, षंढ. ३७ मृषा=व्यर्थ. ३८ रजनीचर=राक्षस. ३९ निशिचरराज=राक्षसराजा रावण. ४० अवीरा=विधवा. ४१ नाक=स्वर्ग. ४२ राग=गाण्यांतील रागरागिणी. ४३ राग=क्रोध. ४४ अतिविख=अतिविषारी साप. ४५ कुटी=झोंपडी. ४६ माया=कपटें. ४७ होणार=भावी, नशीब. ४८ व्यसन=संकट. ४९ गुणचुंचु=गुणी. ५० कवि=ज्ञाते.

ऐसें कळवी खळहा दूरुनि दुष्ट [५१]प्रियोक्ति लावि कलहा ॥
वज्रसहा स्त्रीवाणी दुःसह कुलजास जठर शस्त्री[५२]वाणी ॥ ३२ ॥
दोष स्थापुनि लटिके गांजावा भक्त कीं घरीं न पल टिके ॥
हितवाणी विषवाटिके स्तववी जेथें अनर्थ तेथें[५३]अघें टिके ॥ ३३ ॥
कपटें बहु यत्नपरें हरितां प्रभुचें हि तें वधूरत्न परें ॥
सुर म्हणति समीचीनें[५४] प्रभुच्या गमलें भ्रमें मतिस मीं ची न ॥ ३४ ॥
जेथें प्रीति विशिष्टा म्हणति न यांचा तया स्थळीं कावि शिष्टा ॥
मृग मागतां सुखानें वियोग ये हांसत प्रसन्नमुखानें ॥ ३५ ॥
वंशजसुगुणोदारस्त्रीचा होती खरा चि जो मंदा[५५]र ॥
कार्याकार्यविचार–त्यक्त हि जो तेथ आधि[५६]चा संचार ॥ ३६ ॥
शत्रुतिमिरमित्रा[५७]नें केलें बहु युद्ध पंक्ति[५८]रथमित्रानें ॥
त्या पापापासून स्वबळें रक्षावया सुरूपा सून ॥ ३७ ॥
युद्धीं फार खवळिला जातां मार्गीं मधें च दशमुख वळिला ॥
मरणभयें कांपविला मग तच्चंचू न लाजवी कां पवि[५९]लीं ॥ ३८ ॥
आला काळ कवळिला उघडुनि धर्मेतरें दशास्य कवळिला ॥
म्हणुनि नसे विजय वया बळा विलोकूनि देव ह्मणाति जय व[६०]या ॥ ३९ ॥
चोरास सुगम तिमिरीं ध[६१]न खळकर्णांसि हितवचें गमति मिरीं ॥
अहित चि होतें हितसें ज्या त्याला शिकवणें अहो तें हि तसें ॥ ४० ॥
ते नंदनासम वनीं ठेवी त्रिजटादि राक्षसी हि स[६२]मवनीं ॥
हे तव कुळविलयासी ऐसें दुष्टासि कोण कळविल यासी ॥ ४१ ॥
खगमृगअग[६३]मीं लवला प्रभु विरहें ज्ञानदीप मग मालवला ॥
रडला राघव दावी तीं विषयिविडं[६४]बनें कितेक वदावीं ॥ ४२ ॥
त्रिभुवनपाल यशोधि प्रभु कांतेला वनीं कृपालय शोधी ॥
मरणोन्मुख चुलत्या[६५]तें पाहे तो विरहवन्हिची चुल त्यातें ॥ ४३ ॥
आला निज कार्याला जटायुला म्हणुनि बंधुभजकार्याला ॥
तर्पि रघूत्तम जनका परि म्हणुनि ह्मणे सुधी तदन्य मज न का ॥ ४४ ॥
छेदुनि पातकबंध ओशें केला वनीं कृतार्थ कबंध ॥

---

५१ प्रियोक्ति=बायकोचें भाषण. ५२ वाणी=सदृश ५३ अघ=पाप. ५४ समीचीन=चांगलें, उत्तम. ५५ मंदार=कल्पवृक्ष. ५६ आधि=मनोव्यथा. ५७ शत्रुतिमिरमित्र=शत्रुरूपी अंधकाराचा रवि म्ह० नाशकर्ता. ५८ पंक्तिरथ=दशरथ. ५९ पवि=वज्र. ६० वया=हे पक्ष्या. ६१ "धन हितकर दुष्टलोचना गमति मिरीं" असाही पाठ आहे. ६२. समवन=रक्षण. ६३ खगमृगअगम=पक्षी, पशु, पर्वत. ६४ विषयिविडंबनें=विषयी जनांच्या फजित्या. ६५ चुलता=दशरथाचा मित्र जटायू ( रामाचा चुलता. )

पूजी [६६]श्रमणी शबरी तीतें दे मुक्ति तो सुरमणीश बरी ॥ ४५ ॥
पसरूनियां आ च मना मध्यें नसती सती तरी आचमना ॥
करिता मृत्यू तनुच्या रामाच्या स्त्रीवियोगसंज्वर तनुच्या ॥ ४६ ॥
मानी तो नि[६७]धन धन स्वमनीं सीतेविणें गणी भुवन वन ॥
झाला बहु विकळ कळ क्षण नपडे [६८]युवतिची उदंड कळकळ ॥४७॥
ज्याचें चरणतळ मळे लक्ष्मीकुचकुं[६९]कुमें असा हि तळमळे ॥
घडिला न तसा [७०]विधिनें जो नाहीं ताप पावला क्षण [७१]विधिनें ॥४८॥
संयोग मधुपवन ज्या सम वढला सुर[७२]नुतांघ्रिशीं चि प[७३]वनजा ॥
सुग्रीव विपदव[७४]धिलीं नेला वाळी हि शौर्यमदपद वधिला ॥ ४९ ॥
जे निरुपम [७५]कीशीं बळें त्यांचीं दिङ्मंडळीं त्रिलोकीश बळें ॥
धाडी दीन पहाया मनःप्रियेला दयानदी[७६]नें पहा या ॥ ५० ॥
मारुति तो शत गांवें[७७] उडे न जेथें शरीर लेश तगावें ॥
ज्याच्या [७८]लहरी तरला त्या यादोनि[७९]धिसी सद्धल [८०]हरी तरला ॥ ५१ ॥
राक्षसदेवपुरा ती सती पहाया धरूनि लघु वपु राती ॥
शोधी मारुति पर ते न दिसे मग तेथुनी महामति परते ॥ ५२ ॥
त्यजिली लंका सारा शोध करूनि फार धृतकलंकासारा ॥
खिन्न कपि अशोकवनीं पाहे रत रामकीर्तिच्या जो कवनीं ॥ ५३ ॥
तों अवलोकी रमणी प्रभुची मग तीपुढें जसा कीरमणी ॥
वर्णन करि गुण[८१]ततिचें रामाच्या जें त्रितापहर अमृत तिचें ॥ ५४ ॥
धृतिमति नीतिसमुद्रा वर्णुनि दे अंजनाज[८२]नी तिस मुद्रा ॥
ते तीतें सुखवि धु[८३]नी देवांची तें न दे न तें सुख विधुनीं ॥ ५५ ॥
देऊनि सुख परम तिला जाणाया रावणप्रमुखप[८४]रमतिला ॥
भंगी अशोकवनिका जेथें नानालताद्रुमप्रभवनिका ॥ ५६ ॥
रावणसुत अक्ष महा सेना घेऊनि ये रणा अक्षम हा ॥
त्यातें करूनि दृढ कली काळमुखीं मारुती बळासह ढकली ॥ ५७ ॥
काय वदों मीं रण जें केलें रात्रिंचरांसह समीर[८५]णजें ॥
क्षितिवरि बहु प[८६]ळें सांचे राक्षस ते फुल्ल तरु जसे पळसांचे ॥ ५८ ॥

---

६६ श्रमणी=तपस्विनी. ६७ निधन=मरण. ६८ युवति=स्त्री. ६९ कुंकुम=केशर. ७० विधि=ब्रह्मा. ७१ विधि=नशीब. ७२ सुरनुतांघ्रि=देवस्तुतपद. ७३ पवनज=मारुति. ७४ अवधि=क्षय. ७५ कीश=वानर. ७६ दयानदीन=दयासागर. ७७ गांवें=योजनें. ७८ लहरी=लाटा. ७९ यादोनिधि=समुद्र ( यादः=जळचर+निधि=ठेवा ). ८० हरी=वानर. ८१ तति=पंक्ति. ८२ अंजनाजनी=अंजनेचा पुत्र मारुती. ८३ धुनी=नदी. ८४ पर=शत्रु. ८५ समीरणज=मारुती ( वायुपुत्र. ) ८६ पळ=मांस.

त्यावरि फांसा पडला इंद्रजिताचा परि स्वयें सांपडला ॥
गुंते मारुति पाशीं जायाला राक्षसांचिया पतिपाशीं ॥ ५९ ॥
पीडुनि घननादानें नेला तातासमीप घननादानें ॥
लूता[८७]गुणबद्ध [८८]करी तसा च कपि तो न कौतुकें युद्ध करी ॥ ६० ॥
बोलविला दशतुंडें तो मारुति कोपपावकाच्या कुंडें ॥
यद्यपि खळ कृतमंतू[८९] हित बोधी त्यासि रामभक्त परंतू ॥ ६१ ॥
दशवदना परमहिलें[९०] दे शोचितसे जगत्पती परम हिला ॥
मानुनि मानव दावा[९१] करितां पुढिला प्रसंग तो न वदावा ॥ ६२ ॥
तापहरा परम हिमा भक्ति तयाची असा जनीं पर महिमा ॥
तुज तो रिपुयम हेलें[९२]-मात्रें मारील दे तदीय महेलें[९३] ॥ ६३ ॥
पाहुनि रामास रणीं धरिशील कुटुंबयुक्त अधमा सरणी[९४] ॥
विप्रभवीं[९५] नरकाला न जाय ये शरण बाळिवानरकाळीं[९६] ॥ ६४ ॥
पाणी[९७] प्रभु उजवा या माथां ठेवील वंश हा उजवाया ॥
तच्चरणा कर वीरा नति[९८] देती लाज जे अरुणकरवीरा[९९] ॥ ६५ ॥
ज्याचें फल शतकोटी[१००] येती ज्या मंतुच्या शरण शतकोटी ॥
त्या प्रभुच्या जठराशी पहा जनीं तें च पळवितें हठराशी ॥ ६६ ॥
भरतादिक भाउ गडी न विसरती ज्यापुढें न विधु[१] भा[२] उघडी ॥
मदन रुचि[३]मद न मिरवी ज्या नखसंक्रांतीच्या मिषें चि नमि रवी ॥ ६७ ॥
रिपुबाळकचत्वर[४] जें संप्रति च विलोकिलें तमःसत्वरजें ॥
कर त्या हृदयास गडी न हो दशास्या तुझी पुरी हे सगडी ॥ ६८ ॥
लक्ष्मीचें जें शरणें[५] द्विजचरणा जाहलें स्वयें जें शरणें[६] ॥
तेथें कोपस्फुरण क्षण हि नसो हें च तव कुळाचें तरण ॥ ६९ ॥
याचकदर नव लया विलया ने दावितो जनास नवल या ॥
दानोदक शैत्यहर क्वचित्क्वचिज्ज्यासि रात्रि तिसरा प्रहर ॥ ७० ॥
सुरपदपा[७]चा राजा जो म्हणतो मागत्यांसि पाचारा[८] जा ॥
याचक देखुनि फुलतो म्हणवुनि मणिकनकवलय तट तट उलतो ॥ ७१ ॥
रिपु म्हणती यमदंड स्वाधार म्हणे जयांसि हें जगदंड[९] ॥

---

८७ लूतागुण=कोळ्याचें सूत. ८८ करी=हत्ती. ८९ मंतु=अपराध. ९० परमहिला=परस्त्री. ९१ दावा=द्वेष. ९२ हेला=लीला. ९३ महेला=स्त्री. ९४ सरणी=मार्ग. ९५ विप्रभव=पुलस्त्यऋषिपुत्र ( रावण ). ९६ बाळिवानरकाळ=बाळिवानरनाशकर्ता. ९७ पाणी=हात. ९८ नति=नमस्कार. ९९ अरुणकरवीर=अरुण व कण्हेर. १०० शतकोटि=वज्र. १ विधु=चंद्र. २ भा=तेज. ३ रुचि=कांति. ४ चत्वर=अंगण. ५ शरण=गृह. ६ शरण=रक्षणकर्ता. ७ सुरपदप=कल्पवृक्ष. ८ पाचारा=बलावा. ९ जगदंड=अंडाकार जगत्.

ते प्रभुचे भुजदंड प्रेक्षीं त्यां न स्मरो कदा को[10]दंड ॥ ७२ ॥
देती नयनीं मिटक्या देखुनि गेल्यावरि प्रबोधक चिटक्या ॥
चोळ्या स्त्रींच्या सुटक्या यत्पानीं पाणिकंकणाली फुटक्या ॥ ७३ ॥
पीतां ज्यास बुधा[11]ली चित्तीं अमृतांध[12]साहुनी बहु धाली ॥
हर्षवितें अनिश मन स्मरण जयाचें किशोररोदनशमन ॥ ७४ ॥
भवसूर्यातं[13]प हा या प्रभुमुखविधुलागिं ये सुशांत पहाया ॥
साधु चिरं नंद तुला म्हणो घडो शीघ्र तज्जनानंदतुला ॥ ७५ ॥
तापार्त्तांची गळं[14]ती जीपासुनि अमृतबिंदु शीतळ गळती ॥
जीणें रिपुमद पळती प्रभुदृष्टि पडो तुझ्यावरी क्षण पळ ती ॥ ७६ ॥
वल्कलधारण याचें अत्यंत क्लेशबीज जनहृदयाचें ॥
साके[15]तीं द्विजबाला गायत्री अप्रिया धरी जे बाला ॥ ७७ ॥
ज्याकरितां द्विज टांचा घांसिति संबंध त्या अयोग्य जटांचा ॥
ऐसें जाणुनि शापें केले वट हे जटी समस्त निशा[16]पें ॥ ७८ ॥
राघव देवतरू चिर स्वेष्टद सेवूनि रक्ष जीवित रुचिर ॥
तुल्यां भक्ति नउ शिर स्थापीं त्याच्या पदीं न लावुन उशिर ॥ ७९ ॥
ऐसा हितबोध मना न रुचे मग तो म्हणे पला[17]शाधम ना ॥
वस्तुविचारें मुं[18]क्ता काकाला कां न दुःख देती मुं[19]क्ता ॥ ८० ॥
मारुतिलांगूलां[20]ला लावुनियां अग्नि वेष्टिती गूळाला ॥
जेंवि पिपीलिकें[21] सारे पलाश म्हणती पुढें उपाय कसा रे ॥ ८१ ॥
तों त्यांतूनि उसळला लंकाप्रा[22]सादमंडळांत मिसळला ॥
अग्नीचा परम सण क्षणांत भासे पुरी भयंकर मसण ॥ ८२ ॥
रक्षोवधूमळवटीं कोपुनि आणूनि शत्रु लावु मळवटीं ॥
लंकेची मसणवटी करूनि कपि रामचंद्रयश ऐकवटी ॥ ८३ ॥
लंका गमे हं[23]संती देववधू[24] चाविती जिभेसि हं[25]संती ॥
धू[26]म्यां गगनीं श्रेणी गमे दिवंगत पुरंध्रिचीं निश्रेणी[27] ॥ ८४ ॥
अशि होलाकालीला करूनि तर्पूनि पशुवधें कां[28]लीला ॥

---

१० कोदंड=धनुष्य. ११ बुधालि=ज्ञानिसमूह. १२ अमृतांधस=देव. १३ भवसूर्यातप=संसाररूपी सूर्यास छत्रासारखा. १४ गळंती=ज्याला भोंक पाडिलें आहे असें एक पाण्यानें भरलेलें मडकें चैत्रमासापासून अक्षय्यतृतीये पर्यंत उन्हाळ्यांत देवावर टांगतात तें. १५ साकेत=अयोध्या. १६ निशाप=चंद्र. १७ पलाश=मांसभक्षक ( राक्षस ). १८ मुक्त=मोकळा. १९ मुक्ता=मोतीं. २० लांगूल=शेपूट. २१ पिपीलिक=मुंगळे. २२ प्रासाद=वाडे. २३ हसंती=शेगडी. २४ देववधू=अप्सरा. २५ हसंती=हास्य करणाऱ्या. २६ धूम्या=धुराची २७ निश्रेणी=शिडी ( जिला निसणी असें कोंकणांत म्हणतात. ) २८ काली=देवी.

भेटे सीतो[२९]कमना ज्याच्या कीर्तीपुढें सुधा ताक मना ॥ ८५ ॥
सीताकुशळ[३०]श्रवणें प्रभुच्या आनंद साधिला जो [३१]श्रवणें ॥
तो काय निवेदावा संसाराचा जयास्तव निवे दावा ॥ ८६ ॥
जो कीनाश मज वळी योग्य न तो ये सुहृज्जनासम जवळी ॥
त्वद्रुजनासम जवळी त्या बोध न पापभाजना समज वळी ॥ ८७ ॥
मारुतिची अशि वाचा परिसुनियां दूर दवडिता [३२]अशिवाचा ॥
ऊठ म्हणे [३३]सुगळाला वाळी ज्याच्या शरें [३४]हतासु गळाला ॥ ८८ ॥
अगणितकपिबळसहितें त्रैलोक्य करावयासि केवळ सहित ॥
सत्वर राम निघाला क्रोधानें घातला खरा मानें घाला ॥ ८९ ॥
वंदी राघवचरणा बिभीषण त्यजुनि [३५]पंक्तितुंडाचरणा ॥
झाला [३६]अर्णवि तरणा पूर्वी लंकेचिया सुपात्र [३७]वितरणा ॥ ९० ॥
बांधुनि [३८]मकरालय [३९]मा-वरें उतरि जें गमे बळ कराल यमा ॥
व्यापी शत्रुनगर तें भय धरिलें तें जनें त्रिकूट[४०]नगरतें ॥ ९१ ॥
करणें सहसा महित प्राज्ञ जनीं न स्थळ द्वयीं साम हित ॥
म्हणवुनि अंगद यानें पाठविला अरिकडे [४१]अभंगदयानें ॥ ९२ ॥
अंगदवचन न [४२]मानी काळग्रस्तायु तो दशानन [४३]मानी ॥
झाला सुविकल [४४]हाला-पानेंसा प्रभुसवें करी कलहा ॥ ९३ ॥
वधिली सेना सकळा न ठेविली लेश [४५]राक्षसेनास कळा ॥
मरणासी वलयाला बांधुनि येवूनि जाति सचिव लयाला ॥ ९४ ॥
वीर्यनिधि स्वापर ती जो हुंकृतिनें पविप्रहरणा परती ॥
प्रभुनें क्रोधपदमनें वधिला तो कुंभकर्ण निष्कृप दमनें ॥ ९५ ॥
आणुनियां ओषधिला आराधी मारुती जगत्तोषधिला ॥
क्षतशल्यश्रमहरणीं दावी प्रभु दुष्टलोकनाश[४६]मह रणीं ॥ ९६ ॥
करुनि बळें असम रणा दे लक्ष्मण वीर [४७]इंद्रशत्रुस मरणा ॥
तेव्हां विज्ञापि भरंवसा धरुनि म्हणति अमर हरुनि [४८]आधिभर वसा ॥ ९७ ॥
मग [४९]सुत्रामा तलिला प्रभु सुखवायास पाठवि [५०]मातलिला ॥
अनुचित चि अपरथातें रण म्हणवुनि राम घे सुरूप रथातें ॥ ९८ ॥

---

२९ कमन=पति. ३० श्रवण=ऐकणें. ३१ श्रवण=कान. ३२ अशिव=अकल्याण. ३३ सुगळ=सुग्रीव. ३४ हतासु=मृत. ३५ पंक्तितुंड=रावण. ३६ अर्णव=समुद्र. ३७ वितरण=दान. ३८ मकरालय=समुद्र. ३९ मावर=राम. ४० नग=पर्वत. ४१ अभंगदय=ज्याच्या कृपेला भंग नाहीं असा. ४२ मानी= मान्य करी. ४३ मानी=गर्विष्ठ. ४४ हाला=मद्य. ४५ राक्षसेन ( राक्षस + इन )=राक्षस-राजा. ४६ मह=आनंद. ४७ इंद्रशत्रु=इंद्रजित. ४८ आधि=मनोव्यथा. ४९ सुत्रामा=इंद्र. ५० मातलि= इंद्राचा सारथी.

रावण ये संग्रामा द्याया साफल्य रामशस्त्रग्रामीं[५१] ॥
अनुजासि समग्रा मीं[५२] अर्पूनियां जावयासि कालग्रामीं[५३] ॥ ९९ ॥
रामतुला पाव रती नाहीं परि दश मुखें प्रलापा[५४] वरती ॥
त्या दुर्वारजनकानीं अंगुलिका शिरविल्या मना जनकानीं ॥१०० ॥
ते समरांत नग मती पाहुनि चित्रापरी पुरातन गमती ॥
रामदशास्यसमर तें विचित्र गणिलें मनीं बळप्रशमरतें ॥ १०१॥
समरीं लोकेश तदा खंडी प्रतिमस्तकासि अरिच्या शतदा ॥
त्यावरि विजितरविशिखें वधी अगस्त्यप्रदें प्रखरतर विशिखें[५५] ॥ १०२ ॥
तेव्हां रामा लवले सुर ज्यांचे ताप सर्व ही मालवले ॥
मृत वानर वांचविले हृदयकरंडांत गुणमणी सांचविले ॥ १०३ ॥
यावच्चंद्रार्क मही बिभीषणा दे पुरी त्रिलोकोत्तम ही ॥
न गणी दिव्य श्रम ही सीता दे हर्ष सज्जना राम मही ॥ १०४ ॥
दे हृदया नांव रती जीचें ती मूर्ति पुष्पयानावरती ॥
बैसुनि ये भरतातें सुखवी ज्या दीधला धराभर तातें ॥ १०५ ॥
न्यायें सुखवि प्रकृतीं[*] गाती ज्यातें अमर्त्य[५६]मुख विप्र कृती[५७] ॥
जन धनदा[५८] लाजविती राघवराज्यांत देवतरु लाज विती ॥ १०६ ॥
राज्य करूनि अयुत[५९] समा[६०] प्रकृती संरक्षिल्या निजापत्यसमा ॥
अंतीं निज धामातें नेल्या संपूर्ण करूनियां कामातें ॥ १०७ ॥
ऐशी ज्याची लीला त्या रामाच्या मनोज्ञ[६१] पदयुगलीला ॥
संतत माझी विनती इच्छा पुरवू यथार्ह जी विनविन ती ॥ ॥ १०८ ॥
हृदयाकाशीं राघव करुणामेघासि पाहतां स्वसुखानें
आर्यागीत्यष्टोत्तरशतकेका प्रकटल्या मयूरमुखानें ॥ १०९ ॥

इति श्रीमद्रामनंदनमयूरेश्वरविरचिता रामभद्रचरित्रगुणग्रथिताष्टोत्तरशतार्यागीति मुक्तामाला समाप्ता.

---

५१ ग्राम=समूह. ५२ मा=लक्ष्मी. ५३ कालग्राम-यमपुरी. ५४ प्रलाप=बडबड. ५५ विशिख=बाण. ५६ अमर्त्य-देव. ५७ कृती=कुशल, धन्य. ५८ धनद=कुबेर. ५९ अयुत=दहा हजार. ६० समा=वर्षे. ६१ मनोज्ञ=सुंदर. * प्रकृती=प्रजा.

## मोरोपंतकृत

# वामनचरित्र.[1]

श्रीभृगुवंशज मुनि जे शुक्रादि महासमर्थ ते ज्यातें ॥
न तुळा बळिला देती त्या करुनि महाभिषेक तेजातें ॥ १ ॥
देति शिखिजं[2] रथ जेणें विश्वजयसुकीर्तिसंपदा सांचे ॥
राहो देतील कसे सद्गुरु अरिभयजकंप दासांचे ॥ २ ॥
ज्याच्या रवें[3] विरावे सर्वारि असा सुशंख भार्गव दे ॥
आधी सर्वत्र जयप्रद ऐसा धर्मनीतिमार्ग वदे ॥ ३ ॥
प्रऱ्हादप्रभुनें त्या सर्वासुरवरमेदिनीपाळा ॥
विजयार्थ स्वगळांची दिधली अम्लान[4]पंक[5]जा माळा ॥ ४ ॥
गुरुभार्गवचरणातें वंदुनि घे पुष्कळा बळि वराशी[6] ॥
प्रऱ्हाद म्हणे स्वयशें शत्रुयशाच्या सुखें वळिव राशी ॥ ५ ॥
स्वर्गा गेला घेउनि धूलिपटलपिहितसूर्यभा[7] सेना ॥
न्यून प्रलयांबुधिहुनि तो गर्जदनेकतूर्य[8] भासेना ॥ ६ ॥
अमरावतीस सहसा तो जितलयवारिवाह वेढी गा ॥
बळि शक्राला जैसा वात घनाच्या न साहवे ढीगा ॥ ७ ॥
हरि गुरुसि म्हणे मज तूं सुज्ञांच्या गुह्य हें काळिव राया ॥
बा पावला न तपतां तेजा सहसा कसा बळि वरा या ॥ ८ ॥
सुरगुरु म्हणे महेंद्रा भार्गव झाले प्रसन्न या बळिला ॥
तच्चरण यासि बहु मत सौगंधिकपद्म जसें अळिला[9] ॥ ९ ॥
प्रभुवांचुनि अमर तुम्ही सर्व हि जिंकावयासि अक्षम[10] या ॥
मायाविवरा दूर्ती इतरांचे जेंवि कपट अक्ष मया ॥ १० ॥
सोडा स्वर्ग व्यसनीं स्वत्राण करा कसें तरि लपा जा ॥
घ्या आपण्ण हरिचें यश इतरां ही ताप हा हरिल पाजा ॥ ११ ॥
बा त्या चि भार्गवांच्या हा अपमानें चि दंड पावेल ॥
जन वृद्धिस रक्षीना त्यजुनि गुरुसि जेंवि मंडपा वेल ॥ १२ ॥
ते शिष्य स्वगुरुमतें जाया तत्काळ कानना कास ॥

---

१ हें प्रकरण पंढरपुराहून पंतांचे वंशज मयूरपंडित यांजकडून रा० रा० अनंत विनायक सोहनी यांचे मार्फत आलें. २ शिखि=अग्नि. ३ रव=शब्द. ४ अम्लान=न कोमजलेलें. ५ पंकज=कमल. ६ वराशी=उत्तम आशीर्वाद. ७ धूलिपटलपिहितसूर्यभा=धुळीच्या पटलानें झांकली आहे सूर्याची कांति जीणें अशी. ८ गर्जदनेकतूर्य=गर्जना करीत आहेत अनेक वाद्यें ज्याचीं असा. ९ अळि=भ्रमर. १० अक्षम=असमर्थ.

घालुनि तैशा उग्र व्यसनीं त्यजितील कां न नाकास[11] ॥ १३ ॥
शक्रादि कामरूप त्रिदशें[12] सकळ ही परोपरि लपाले ॥
निज विभव तिहीं त्यजिले ते वृक्षांहीं जसे वरिल पाले ॥ १४ ॥
सुरधानीस अधिष्ठुनि बळि लोकत्रय करी सुखें वश हो ॥
शत अश्वमेध करविति भार्गव म्हणती जगीं भलें यश हो ॥ १५ ॥
आदिति तळमळे परिसुनि दितिसुतकृतपुत्रपुरविनाशाला ॥
धृति न निववि अभगेच्छित[13] चिंतामणि[14]ची हि पुरविना शाला ॥ १६ ॥
तीस समाधिविरतपति भेटे येउनि बहू दिसां गेहा ॥
कां दीना हें पुसतां अदिति तया तापहेतु[15] सांगे हा ॥ १७ ॥
कश्यप पयोव्रतें जगदीशाराधन तिला कथी विधिनें ॥
जें आपणासि पूर्वीं होतें उपदेशिलें दयानिधिनें ॥ १८ ॥
म्हणती श्रिताकडे न च दावाया वदन ताप यो व्रतती[16] ॥
प्रभुभक्ति काय मग करि होउनि हरिपदनता पयोव्रत ती ॥ १९ ॥
भगवान् पयोव्रतांतीं दर्शन देउनि म्हणे अदितिला हो ॥
जीच्या कुळें तुज दिलें हें दुःख सुकृतसुधानादि तिला हो ॥ २० ॥
होतो त्वत्पुत्र यशें या हरिल तुझ्या कुक्षि तिमिरास[17] ॥
सोडील कोण सुक्षिति[18] जड हि त्यजती न कुक्षितिमिरास[19] ॥ २१ ॥
यापरि वदला अदितिप्रणतस्तुतपादपद्म[20] वरदेश[21] ॥
झाला गुप्त जयास क्षीराधिहुनि भक्तसद्म[22] वर देशें[23] ॥ २२ ॥
बुध हो सत्कीर्तिकथन हा कवि करितो रमा निवा सतिच्या ॥
सुयशा सेवुनि पोटा आला हरि तो रमानिवास[24] तिच्या ॥ २३ ॥
आला विष्णु अदितिच्या गर्भीं हें कंजजें[25] बुधा समजे ॥
येउनि तेथें स्तवनीं विधि वर्णी मधुर गुण सुधासम जे ॥ २४ ॥
भाद्रपदशुक्लपक्षीं मध्यान्हीं द्वादशीदिनीं श्रवणीं ॥
प्रकटे प्रभु वर्षाया अमृत जनीं स्वपदपंकज[26]प्रवणीं[27] ॥ २५ ॥
मेघश्याम चतुर्भुज शंखगदापद्मचक्रधर शांत ॥
प्रकटे पीतांबर धृतकौस्तुभमणि रम्यमुख रमाकांत ॥ २६ ॥

---

११ नाकास=स्वर्गास. १२ त्रिदश=देव. १३ अभगेच्छित=दैवहीनाची इच्छा. १४ चिंतामणी=मनांत आणलेली वस्तु देणारा मणि. १५ तापहेतु=दुःखाचें कारण. १६ व्रतती=लता, वेल. १७ तिमिर=अंधेर. १८ सुक्षिति=उत्तम जमीन. १९ कुक्षितिमिरास=वाईट जमिनीची वतनदारी. २० पद्म=कमल. २१ वरदेश=वरदेणाऱ्यांत श्रेष्ठ. २२ सद्म=घर. २३ वरदेश=उत्तम प्रांत. २४ रमानिवास=रमा आहे वसतिस्थान ज्याचें. २५ कंजज=ब्रह्मा. २६ पंकज=कमल. २७ प्रवण=नम्र.

प्रभुच्या प्रादुर्भावीं[२८] झाल्या विमला दिशा प्रजा मुदिता ॥
गोद्विजसुरग्रहगणीं सुखशोभा ज्ञानसंपदा उदिता ॥ २७ ॥
गंधर्व अप्सरा निज गुण अर्पुनि आदरें करिति सेवा ॥
सुर वर्षति पुष्पांतें स्तविती बहु सिद्ध साध्य मुनि देवा ॥ २८ ॥
मग मायेनें नटसा वामन बटु होय देव सोंगातें ॥
घेउनि दुःख सुदुःसह जें भक्तजनीं न दे वसों गा तें ॥ २९ ॥
संस्कार करिति मग उपनयनोन्त[२९] स्वगुरुचे पर महर्षी ॥
झाला कश्यपमुनि चि न सर्व हि त्या उत्सवीं परम हर्षी ॥ ३० ॥
सावित्री सविता दे भिक्षा जगदंबिका उमा त्याला ॥
दे ब्रह्मसूत्र सुरगुरु दंड तया सोम अर्पिता झाला ॥ ३१ ॥
द्रुहिणें[३०] कमंडलु कश्यप मौंजी अजिनें[३१] स्वयें तया धात्री ॥
वाणी हि अक्षमाळा सप्त ऋषी कुश कुबेर दे पात्री ॥ ३२ ॥
मायामाणवक[३२] प्रभु विधिवद्बटुविहित नित्य होम करी ॥
चित्तीं म्हणे स्वमाया हे केवळा या बळीस हो मकरी ॥ ३३ ॥
मग हरि जाय बळिकडे जेथें श्रीनर्मदानदी नांदे ॥
जी सहज पान घडतां स्वर्गीं बहु शर्म[३३]दान दीनां दे ॥ ३४ ॥
पावे तीच्या उत्तरतीरीं भृगुकच्छ[३४]संज्ञक क्षेत्रीं ॥
देहीं वाहे तेज प्रभु[३५]भाळींच्या जसें महानेत्रीं ॥ ३५ ॥
त्या क्षेत्रीं हयमेधें[३६] त्रिभुवनपति बळि करी शतावा हो ॥
ज्या वदले गुरु पावू दानैकअळिकरीशता वा हो ॥ ३६ ॥
कपटबटु यज्ञवाटीं[३७]निकट प्रकटे प्रभेकरूनि अर्क ॥
कीं शुचि सनत्कुमार प्रेक्षक भार्गव असा करिति तर्क ॥ ३७ ॥
मखमंडपांत येतां वामन धामें[३८] न मुनिव्रजीं[३९] राहे ॥
तेजें धर्षित झाले ग्रह कोण असा रवीस जो साहे ॥ ३८ ॥
भार्गव-साशिष्य उठले सभ्य जन हि अग्नि हि स्वकुंडांत ॥
दहांत सर्व सात्विकभाव नमस्तेस्तु वर्ण[४०] तुंडांत ॥ ३९ ॥
करिती शिरें परम ऋजु[४१] होउनि सर्व हि समान वाम नतें ॥
पूर चि होय लवावे परमस्तक वेतससमान वामन तें ॥ ४० ॥
स्वकरें आसन मांडुनि बहु मानें नमुनि बैसवुनि बटुतें ॥

---

२८ प्रादुर्भाव=जन्म. २९ उपनयनान्त=मौंजीबंधनापर्यन्त. ३० द्रुहिण=ब्रह्मा. ३१ अजिन=चर्म. ३२ माणवक=बटु. ३३ शर्म=सुख. ३४ भृगुकच्छ=याला हल्लीं भडोच म्हणतात. ३५ प्रभु=शिव. ३६ मेध=यज्ञ. ३७ वाट=स्थान. ३८ धाम=तेज. ३९ व्रज=समूह. ४० वर्ण=अक्षरें, शब्द. ४१ ऋजु=सरळ.

गुरुहुनि शतगुण पूजी बळि मेळविता न अन्य जन पटु तें ॥ ४२ ॥
श्रीचरण प्रक्षालुनि वाहे सकुटुंब मस्तकीं सलिलें[४२] ॥
जें शंकरतापापह तीर्थांचें तीर्थ ताप दे कलिला ॥ ४३ ॥
कर जोडुनी बळि म्हणे सर्व ब्राह्मणशिरोमणे आर्या ॥
वद वदनें बा आहे मी सिद्ध करावया तुझ्या कार्या ॥ ४४ ॥
ब्रह्मर्षींचें साक्षात्तनुधर तप तूं असें मला गमलें ॥
शमतें पळ पळ चापळ मन माझें पाहतां तुला रमतें ॥ ४५ ॥
हें कुळ पवित्र झालें तृप्तीतें आजि पावले पितर ॥
श्रितरक्षणपटु हरिसा तूं तुजसम बटु न देखिला इतर ॥ ४६ ॥
झाला सफळ क्रतु[४३] हा सुहुतहुताश न समस्त ही एणें ॥
येणें केलें मूर्त नांदे त्वां चित्त म्या दिलें एणें ॥ ४७ ॥
अर्थी तूं गोधन गृह कन्या सुग्राम सुगज रथ वाजी ॥
घे देतों तीं हि करिन सफळा इच्छा असेल अथवा जी ॥ ४८ ॥
बटु बोले या वंशीं म्हणता निःसत्व याचका नाहीं ॥
ऐसा पुरुष परिशिला वृद्धांच्या हि न न या च कानांहीं ॥ ४९ ॥
होती कनकाक्षयशें चकित देवेशमानवेशमनें ॥
हरि त्या हि प्रबळाच्या निजबाहुबळा न मानवे शमनें ॥ ५० ॥
बंधुवधक्रोधाकुळ शूलधर हिरण्यकशिपु बा राया ॥
अंतकसा वैकुंठीं गेला धांवोनि हरिस माराया ॥ ५१ ॥
त्यासि बहिर्दृष्टि असें जाणुनि मायाविराज हरि सुकवी ॥
त्या उग्रव्यसनातें शिरुनि तयाच्या चि अंतरीं चुकवी ॥ ५२ ॥
प्रऱ्हादसुत विरोचन तव तात परा घना जसा वायु ॥
द्विजवेष सुरांतें दे जाणुनि ही सर्व आपुलें आयु ॥ ५३ ॥
तूं हि सुकीर्तिभाजन[४४] हा जन आला म्हणोनि यांचाया ॥
त्रिपदपरिमिता वसुधा दे आजि या पदें गणूनि याच्या या ॥ ५४ ॥
जगदीश्वरा वदान्या[४५] उचितार्थपरिग्रहांत अघ[४६] नाहीं ॥
कण तीन चार चातक पी परि हो न तृप्त अघनांहीं ॥ ५५ ॥
भूप म्हणे द्विजपुत्रा वृद्धबहुमता मुखें वदसि वाणी ॥
बालिश[४७]मति बाळ चि तूं असदसि[४८] हि वरि च दिसे सदसिवाणी[४९] ॥ ५६ ॥

---

४२ सलिल=उदक. ४३ क्रतु=यज्ञ. ४४ भाजन=स्थान. ४५ वदान्य=दाता. ४६ अघ=पाप. ४७ बालिश=मूढ. ४८ असदसि=वाईट तरवार. ४९ सदसिवाणी=उत्तम तरवारी सारखी.

सर्वत्र विचक्षण[५०] तूं स्वार्थी अविचक्षण[५१] प्रकट कळतें ॥
अटकळतें बोलें बा नुमजे जें स्वहित शीळ फटकळ तें ॥ ५७ ॥
आराधिला तुवां हा लोकेश्वरमुख्य साधु वचनांहीं ॥
गुरुकविपुढें असा तो वाटे वदला सुबुद्धि कच नाहीं ॥ ५८ ॥
द्वीप चि देणारा प्रभु म्हणसि तया त्रिपदमात्र दे वसुधा ॥
गंध चि मागसि त्या जो पुष्कळ पाजणार देव सुधा ॥ ५९ ॥
माझा याचक व्हावा पूर्णाखिलकाम नित्य सुखवासी ॥
तत्सम न चातक हि कीं न परा परि तो घना[५२]सि मुख वासी ॥ ६० ॥
घे तूं पटो बटो मजपासुनि मागोनि भूमि वृत्ति[५३]करी ॥
बाळे अर्थिवृत्ति चालवि बहु दानें जेंवि मधुप[५४]वृत्ति करी[५५] ॥ ६१ ॥
वामन म्हणे प्रिय विषय जितुके या त्रिभुवनांत आहेत ॥
ते ही अजिता ह्याचा पूर्ण कराया न शकति बा हेत ॥ ६२ ॥
जो त्रिपद महीलाभें संतुष्ट त्रिभुवनेश्वरा नाहीं ॥
होइल न सनववर्ष[५६]द्वीपें ही पूर्णकाम तो कांहीं ॥ ६३ ॥
सप्तद्वीपवराच्या इच्छेनें सर्वदां तळमळेल ॥
तृष्णामळें न पावुनि सुविवेका चित्तिचें जळ मळेल ॥ ६४ ॥
सप्तद्वीपवरेश्वर ऐकतसों पृथुगयादि ही बा जे ॥
अर्थांहीं कामांहीं तृष्णान्तातें[५७] न पावले राजे ॥ ६५ ॥
संतुष्ट पुरुष सहजें लाभें चि सुखेंकरूनि वर्ततसे ॥
होतात असंतुष्टा प्राप्त सकळ लोक असुखगर्त तसे ॥ ६६ ॥
भवहेतु असंतोष चि संतोष चि मुक्तिकारणें होतो ॥
हा चि अमृतरस दुसरा यापरि फेडी न पारणें हो तो ॥ ६७ ॥
जो संतुष्ट यदृच्छालाभें ब्राह्मण सदैव ही असतो ॥
वाढे तत्तेज असा बहुतेजस्कर नव्हे सुधारस तो ॥ ६८ ॥
द्विजतेज असंतोषें शमतें चि ज्वलन जेंवि तोयांत ॥
हालाहलांत दुर्गुण जो जैसा काय तेंवि तो यांत ॥ ६९ ॥
यास्तव पदत्रय चि बहु लोभें बुधचित्त चळबळेना कीं ॥
हितशत्रु दिव्य हि विषय म्हणाति स्वपरासि चळ बळे नाकीं ॥ ७० ॥
वित्त प्रयोजनाधिक जें तें संरक्षणें असुख रचितें ॥

---

५० विचक्षण=शहाणा. ५१ अविचक्षण=शहाणा नव्हे असा. ५२ घन=मेघ. ५३ वृत्ति=उपजीविका. ५४ मधुप=भ्रमर. ५५ करी=हत्ती. ५६ वर्षद्वीपें=पृथ्वीचे विभाग. ५७ तृष्णान्त=आशेचा शेवट.

किंबहुना जो लोभी जन त्याचे सर्वथा असु[58] खराचितें ॥७१॥
स्मित करूनि बळि म्हणे तो घ्यावें बापा बटो यथाकामें[59] ॥
भूदान द्यावया घे जलपात्र न ओळखोनि तें धामें[60] ॥ ७२ ॥
विष्णुमतातें जाणुनि भूदानाज्ञा तया न भार्गव दे ॥
वारावया प्रवर्ते निज शिष्यातें प्रवृत्तिमार्ग वदे ॥ ७३ ॥
हा हरि अदितितनय वरि वरि वदतो गोड आर्यसा धाया ॥
कपटें पटु बटु होउनि आला अरि देवकार्य साधाया ॥ ७४ ॥
नेणसि तूं साधु धरूनि आला हा डाव याप्रति ज्ञाती ॥
आम्हा हि व्यसनीं त्वां केली पाडावया प्रतिज्ञा ती ॥ ७५ ॥
सर्वस्व हरूनि देइल शक्रास न विप्र प्राणवक साच ॥
जपतो स्वकार्यसाधक हा कपटकवि प्रमाण बकसा च ॥७६ ॥
म्हणतो पदत्रय परि व्यापिल हा विश्वकाय[61] विश्वास[62] ॥
हो सावधान कपटिप्रमुचा धरितोसि काय विश्वास[63] ॥ ७७ ॥
ज्ञानें मला समजलि स्पष्ट कपटबुद्धि विष्णुची गूढा ॥
सर्वस्व यासि देउनि मग कैसा वर्तशील रे मूढा ॥ ७८ ॥
या द्यावाभूमीतें[64] आक्रमिल स्पष्ट दों पदांनीं हा ॥
सर्वस्वहानिखेदें करूनि म्हणावें कुळें न दानी हा ॥ ७९ ॥
पदयुग भरेल करिशिल मग काय तृतीय बटुपद भराया ॥
बहुधा तूं विटलासि स्वमनीं मानूनि कटु पदभरा या ॥ ८० ॥
होइल तुझें प्रतिज्ञावचन असुरसत्तमा जरि मृषा[65] तें ॥
नेइल अधर्म नरकीं ने जेंवि बळें कृषीवळ[66] वृषातें ॥ ८१ ॥
असुरश्रेष्ठा जेणें होतो संपूर्ण वृत्तिचा अंत ॥
ज्यांत विचार नसे त्या दानातें न प्रशंसिती संतें ॥ ८२ ॥
कीं वृत्तिमान् पुरुष ने त्यांसि घडे दान यज्ञ तप कर्म ॥
बुडतां वृत्ति बुडे जन जोडावा व्याकुळें कसा धर्म ॥ ८३ ॥
धर्मार्थ[67]काम[68]कीर्तिस्वजनार्थें[69] विभागितां स्ववित्तातें ॥
या लोकीं परलोकीं पुरुषाच्या हर्ष होय चित्तातें ॥ ८४ ॥
राजा विरोचनसुता प्रकट तुझें सत्यधर्मपद शील ॥

---

५८ असु=प्राण. ५९ यथाकाम=इच्छेप्रमाणें. ६० धाम=तेज. ६१ विश्वकाय=सर्व विश्व आहे शरीर ज्याचें असा. ६२ विश्वास=जगतास. ६३ विश्वास=भरंवसा. ६४ द्यावाभूमि=आकाश व पृथ्वी. ६५ मृषा=खोटें. ६६ कृषीवळ=शेतकरी. ६७ अर्थ=द्रव्य. ६८ काम=विषयभोग. ६९ स्वजनार्थ=स्वकीयाकरितां.

अ[७०]नृत कसें बोलावें हें जरि तूं स[७१]त्यसंध वदशील ॥ ८५ ॥
तरि परिस विचार करुनि हित अहित मनांत वेदवाद पहा ॥
सत्य चि पुष्पफळ अनृतमूळ असा होय देहपा[७२]दप हा ॥ ८६ ॥
असतां दृढ मूळ द्रु[७३]म साहुनि आघात ही सुखें वांचे ॥
मग वरिचेवरि त्याच्या ठायीं फळपुष्पसंपदा सांचे ॥ ८७ ॥
केवळ सत्यें रिक्त चि जन निंद्य चि केवळानृतें होय ॥
कांहीं तें कांहीं तें हित धरितां वृद्धनीतिची सोय ॥ ८८ ॥
अनृत वदावें राया निःशंक चि वृत्तिसंकटीं न[७४]र्मीं ॥
गोविप्रपरि[७५]त्राणीं जेंवि विवाहीं न दोष या कर्मीं ॥ ८९ ॥
बळि गुरुसि म्हणे स्वामी कथिला त्वां धर्म या जना सत्य ॥
हृद्रोगशमविता तूं शिष्यांचा सुज्ञ राजना*सत्य ॥ ९० ॥
प्रन्हादपुत्रसुत मी कि[७६]तव जन तसा कसा नकारातें ॥
विप्रासि ऐकवूं बा लज्जा जें दुःख दे न का[७७]रा तें ॥ ९१ ॥
त्यजिला सुपात्रलाभें देहाच्या तत्क्षणीं च जो भानें ॥
नाहीं म्हणेल कैसा तो हा प्रान्हादि वृत्तिलोभानें ॥ ९२ ॥
पूर्वीं भू वदली कीं अति दुःसह सर्व भार साहेन ॥
परि मी स्पष्ट अनृतपरनरभर परमोग्र पळ न वाहेन ॥ ९३ ॥
नरक दरिद्रत्व पदभ्रंश मरण असुखाब्धि हो मी तों ॥
यां पासुनि भीत नसें जैसा बहु विप्रवंच[७८]नीं भीतों ॥ ९४ ॥
गुरुजी धनादि जें जें तें तें सर्व हि मृता जना सोडी ॥
सोडूं नये स्वयें कां बा त्याची सांग काय गा गोडी ॥ ९५ ॥
जरि याचितार्थ न पावे सुखरोमांचा[७९]ढ्य आंत वरि काय ॥
तत्काळ याचकाचा जें न करी दान तें हि तरि काय ॥ ९६ ॥
साधु करिति सर्वस्वें भूतांचें श्रेय दे व[८०]पु दधीची ॥
नेतात साधुची बा याचक संपत्ति मेघ उ[८१]दधीची ॥ ९७ ॥
गुरुजी कापुनि देतां निज मांस हि उबगला न शिबि कांहीं ॥
सुख साधुरीतिहीं जें दिधलें श्रांतासि तें न शिबि[८२]कांहीं ॥ ९८ ॥
ज्या दैत्येंद्रांहीं हे भू भोगिलि मथुनि शत्रु कर बाळें ॥
त्यांचे गिळिले लोक हि भोग हि गिळिले न एक यश काळें ॥ ९९ ॥

---

७० अनृत=असत्य. ७१ सत्यसंध=सत्य आहे प्रतिज्ञा ज्याची असा. ७२ पादप=वृक्ष. ७३ द्रुम=वृक्ष. ७४ नर्म=थट्टामस्करी. ७५ परित्राण=रक्षण. * नासत्य=देवांचे वैद्य. ७६ कितव=लबाड, ठक, जुगारी. ७७ कारा=बंदीखाना. ७८ वंचन=ठकविणें. ७९ आढ्य=युक्त. ८० वपु=शरीर. ८१ उदधि=समुद्र. ८२ शिबिका=पालखी.

युद्धीं देह त्यजितें अनिवर्त्ति पुरुष जे सुलभ अजि ते ॥
अति दुर्लभ सत्पात्रीं श्रद्धेनें सर्व ही धन त्यजिते ॥ १०० ॥
दुर्गति जशांतशांचे सर्वस्वें काम पुरवितां आली ॥
कल्याण संपदा ती साक्षाच्छ्रीची खरीखुरी आली ॥ १०१ ॥
मग या तुम्हां अशांचा करितां परिपूर्ण काम आंगातें ॥
आलें दैन्यें यशस्कर कीं अयशस्कर तुम्हीं च सांगा तें ॥ १०२ ॥
यास्तव देतों बटुला भूमि पदत्रय तुम्हीं वदा दे हें ॥
किति काळ अनुभविल हा शिष्य अनित्यें चळा पदा देहें ॥ १०३ ॥
जें याचकपण बहु लघु आला घेऊनि पूर्णकाम हि तें ॥
देऊं नको तया मी व्हाया सत्कीर्ति तूर्ण काम हितें ॥ १०४ ॥
वेदविधानज्ञ तुम्ही ज्यातें यजितां सदान यज्ञांहीं ॥
तो वरद विष्णु सत्कृत सर्वस्वें जो सदा नयज्ञांहीं ॥ १०५ ॥
हरि हो अरि हो यासि क्षिति देतों म्हणुं नको चि हाय मुने ॥
सत्कीर्तिनें धवळतां विश्व म्हणो अर्क मात्र हा यमुने ॥ १०६ ॥
नसतां अपराध मला जरि हि अधर्में करूनि अरिभावें ॥
बहु बंधनादिकें ही गांजिल साहीन तें हि तरि भावें ॥ १०७ ॥
भ्याला ब्राह्मण झाला त्याचा वध तो नव्हे उचित मातें ॥
कीं प्रल्हादयशातें लावावा डाग कां शुचितमातें ॥ १०८ ॥
कोपे मुनि कंटक हितबोधातिक्रम नको पटा काविला ॥
स्नेहानें गुरुकरवीं शिष्यहितार्थ चि न कोप टाकविला ॥ १०९ ॥
ऐश्वर्यच्युत हो हा दे त्या शिष्यास शाप शुक्र मुनी ॥
पावे चि पालकाज्ञेप्रति दंडोचित दशा पशु क्रमुनी ॥ ११० ॥
दैव चि तें नाहींतरि गुरुनें तैशासि काय शापावें ॥
परि त्याचें सत्व म्हणे त्यातें सन्नायका यशा पावें ॥ १११ ॥
पहिलें सोडुनि लावी त्रिजगद्गुरुशीं च बलि तदा नातें ॥
दे विधिनें चि न होउनि सत्यापासूनि चालित दानातें ॥ ११२ ॥
विंध्यावळि बळिची स्त्री सिद्धा श्रद्धा जशी तशी होती ॥
श्रीचरणावरि कांचनघटजल सर्वस्व सह चि ती ओती ११३ ॥
सुरगण बळितें स्तविती पुष्पांच्या सर्व वर्षती वर्षें ॥
कीं जाणोनि हि रिपुला विपुला संपत्ति अर्पिली हर्षें ॥ ११४ ॥

---

८३ दुर्गति=दारिद्य. ८४ श्रीची=लक्ष्मीची. ८५ आली=पक्ती. ८६ दैन्य=दारिद्र. ८७ तूर्ण=सत्वर. ८८ अरि=शत्रु.

त्या समयीं देवांहीं वर दुंदुभि शतसहस्र वाजविले ॥
लाजविले घन सागर बहुतूर्यरवें दिगंत गाजविले ॥ ११५ ॥
वाढे वामन सहसा कोंदे विश्वांत तनु असा फुगला ॥
झाला सद्भाग्योत्सव ज्याला राहेल तो कसा उगला ॥ ११६ ॥
जाणों म्हणे बळी घ्या सर्वस्व महत्व आयकों दावा ॥
यास्तव दावी नाहीं तरि कां विश्वांत काय कोंदावा ॥ ११७ ॥
यद्विरहें श्रीकरतळ जळविरहें जेंवि यादं[9] तळमळतें ॥
तत्कुचकुंकुमपंकें जें विमळ सुरम्य पादतळ मळतें ॥ ११८ ॥
सर्व महीतें व्यापुनि अधिक उरे एक अन्य पदकमळ ॥
सकळ उपरिभागाचा क्षाळी सध्दृदयधन्यपदक मळ ॥ ११९ ॥
बळि भक्त धन्य केला मग जाणों द्रुहिणपुत्र आठविला ॥
श्रीचरण सत्यलोकाप्रति तद्भाग्योदयार्थ पाठविला ॥ १२० ॥
नमुनि समुनिजन सात्विकभावाकुळ देव सत्यपति[10] तातें ॥
पाठविलें पद पूजी जें सुपदप्रद चि सत्य पतितांतें[11] ॥ १२१ ॥
निःशेष ही पितामह सेविल आपण चि तीर्थ तो कां तें ॥
लोकांतें दे दावा गुरूनें दुर्लभ पदार्थ तोकांतें[12] ॥ १२२ ॥
होय त्रिविक्रम पुन्हां वामन तो विश्वविरचिता स्त्रष्टा ॥
बळिस अहंकृतिहरणा लावी तिसऱ्या पदाचिया कष्टा ॥ १२३ ॥
प्रभुवरि उठले बळिचे अरि वधुनि करावयासि असुर हित ॥
ते विष्णुपार्षदांनीं[13] केले किति गर्वरहित असुरहित[14] ॥ १२४ ॥
बळिनें निवारिले मग गेले तेथुनि कितेक विवरांतें[15] ॥
प्रल्हाद बळि च बहु मत असुरांत वसुनि हि ते कविवरांत ॥ १२५ ॥
भगवान् बळिस ह्मणे जा नरकीं कीं दे भरूनि पद तिसरें ॥
काय जलधि ऐसें घनकाळीं तुच्छें उतोनि वदति सरें ॥ १२६ ॥
गरुड वरुणपाशांनीं प्रभुमत समजोनि बळिस करकावी ॥
केव्हां ज्वाळा हि विती जो परमोदार जलद करकावी[16] ॥ १२७ ॥
बळिबंधन अवलोकुनि वदले सुरवृंदें[17] सर्व हा हा तें ॥
बाळमळ जसा माता हरि हरितो दासगर्व हा हातें ॥ १२८ ॥
प्रभुसि बळि म्हणे पुण्यश्लोका[18] मीं तों स्वयें मृषा कांहीं ॥

---

९ याद=जलचर. १० सत्यपति=ब्रह्मा. ११ पतित=पापी. १२ तोक=बालक. १३ पार्षद=अनुचर. १४ असुरहित=गतप्राण. १५ विवरांत=भुयारांत. १६ करकावी=आंवळी, १७ वृंद=समूह. १८ पुण्यश्लोक=पवित्र आहे श्लोक म्ह० कीर्ति ज्याची.

वंचन तुझें करावें या भावें करुनि बोलिलों नाहीं ॥ १२९ ॥
स्वविचारें मानिसि जरि मिथ्यासत्यादि तूं पर स्वामी ॥
करितें सत्य न वारिन व्हाया अपकीर्ति कां परस्व[99] मी ॥ १३० ॥
पदयुगभरें धनें मग धनपति तदधिक न काय वा पदया ॥
दासशिरीं ठेव कसें न करिति संत तेंवि मायबाप दया ॥ १३१ ॥
नरकादिकांस नाहीं भीत जसा मीं असाधुवादास[100] ॥
धुतला मलिन [मती] हा प्रभुजी इतर हि अघ धुवा दास ॥ १३२ ॥
मी बहु दुर्गुण चि सुगुण एक प्रल्हादपौत्र हा मात्र ॥
नसतों भक्तकुलज तरि न च होतों या अनुग्रहा पात्र ॥ १३३ ॥
तों ये प्रल्हाद प्रभु त्यासि करी बद्ध बळि शिरें नमनें ॥
जाणों म्हणे कदा तो गुरुपदपद्मांत[1] अळि[2] शिरेन मनें ॥ १३४ ॥
सहसा अश्रुभरांहीं तो व्याकुळ होय सुकवि पुलकांहीं[3] ॥
पावे नमुनि मुनिधनश्रीमत्पदपद्म सुख विपुल कांहीं ॥ १३५ ॥
प्रभुला प्रल्हाद म्हणे दिधलें होतें तुवां चि पद यातें ॥
हरिलें हि तुझें चि तुवां केवळ कारुण्य[4] होय सदया तें ॥ १३६ ॥
भुलवी ज्ञात्यांतें ही राज्यश्री स्पष्ट होय हाला[5] हो ॥
प्रभुजी आतां बळि अळि या पदपद्मासवासि[6] हा लाहो ॥ १३६ ॥
विंध्यावळि विनवाया ये विधि विनवावयासि जों पाहे ॥
तीच्या बहुमानार्थ क्षणभरि चतुरास्य तो उगा राहे ॥ १३८ ॥
राज्ञी बोले प्रभुजी तुमचें चि तुम्हासि काय अर्पावें ॥
कैसें जी जलदानें[7] जलदानें[8] सागरासि तर्पावें ॥ १३९ ॥
विश्वाचे उत्पादक परिपालक हे चि चरण संहरिते ॥
पडती स्वामी आपण म्हणुनि करुनि दुरभिमानें अंह[9] रिते ॥ १४० ॥
ब्रह्मा म्हणे प्रभो तूं या आतां सोड सत्यसंधातें ॥
हरिलें सर्वस्व कपट करुनि मग नव्हे चि योग्य बंधातें ॥ १४१ ॥
स्वात्मार्पण केलें कीं श्रीचरणीं या स्वधर्मसत्वरतें ॥
प्रभुनें दावावें जें दीन जनीं वत्सलत्व[10] सत्वर तें ॥ १४२ ॥
अशठमति पुरुष या श्रीचरणीं वाहोनि भक्तिनें तोय[11] ॥
दूर्वांकुरीं हि पूजा करुनि सुखें पात्र सुगतिला होय ॥ १४३ ॥

---

९९ परस्व=ऋण. १०० असाधुवाद=निंदा. १ पद्म=कमल. २ अळि=भ्रमर. ३ पुलक=रोमांच. ४ कारुण्य=दया. ५ हाला=मद्य. ६ आसव=मद्य. ७ जलदानें=मेघानें. ८ जल-दानें=उदकाच्या दानानें. ९ अंह=पातक. १० वत्सलत्व=दयाळुत्व. ११ तोय=उदक.

मग जो अविकळबुद्धि त्रिभुवनसख स्वदेह ही वाहे ॥
हा हे बंधनपीडा पावे कैशी अयुक्त हें आहे ॥ १४४ ॥
भगवान् म्हणे विधात्या माझ्या स्तुति करिति साधुरीतीची ॥
आइक सुधा सुधाजन म्हणती परि काय माधुरी तीची ॥ १४५ ॥
करितों अनुग्रह मनांतूनि जयावरि दयाभ्र मीं हरि तों ॥
त्याच्या सर्वार्थातें न पडों द्याया तया भ्रमीं हरितों ॥ १४६ ॥
अर्थाहीं मद होतां स्तेय पुरुष बहु अनम्र बा धात्या ॥
अवमानितो जनातें मातें ही ती पिशाचबाधा त्या ॥ १४७ ॥
बहु पुरुषजन्म दुर्लभ तेथें अत्यंत सर्वहानिकर ॥
पापांचा शापांचा तापांचा होय गर्व हा निकर ॥ १४८ ॥
ऐशा गर्वाचा क्षय माझ्या चि अनुग्रहें अगा धात्या ॥
मदनुग्रहें चि तरले यासि जसे सेतुनें अगाधा[१२] त्या १४९ ॥
आतां गतमद मत्पर झाला हा सविनया विधे यातें ॥
देइन जें बहु दुर्लभ हर्षें हासविन या विधेयातें ॥ १५० ॥
अत्यद्भुत च्छळें या दुसरा जन कोण सत्य न त्यजिता ॥
यानें शुचिसत्वबळें हारविलें मज अशा हि अत्यजिता[१३] ॥ १५१ ॥
हा बळि सत्वें समधिक या प्रऱ्हादापितामहापरिस[१४] ॥
कीं उतरला बहु कसा म्हणसि कसा तरि पितामहा परिस ॥ १५२ ॥
प्रऱ्हादाला होता गुरूचा माझा हि आश्रय पहा या ॥
बळिला एक हि नव्हता मत्कृत अत्यद्भुत च्छळ सहाया ॥ १५३ ॥
करिन या होतां मनु वैवस्वत समान सावर्णी ॥
भलत्या सरोवरा बहु हंस त्यागुनि न मानसा वर्णी ॥ १५४ ॥
प्रभुवर बळिस स्वमुखें प्रथम महाराज इंद्रसेन असें ॥
संबोधन करुनि वदे करुणेच्या प्रीतिच्या द्रवोनि रसें ॥ १५५ ॥
येथुनि जाउनि हो तूं माझ्या आज्ञेकरूनि सुतलेश[१५] ॥
सद्भक्ताहुनि अधिक प्रेमास्पद मज गमे न सुत लेश ॥ १५६ ॥
प्रऱ्हादज्ञातीसह तूं सुतळा वसिव जा सुरमणीया ॥
रमविल तुज वसति जशी म्हणणारी कामुका सुरमणी या ॥ १५७ ॥
तेथें तुझा पराभव शकतिल न करावयासि लोकेश ॥
सिंहाच्या नाकींचा जो पीडिल कोण सत्व तो केश ॥ १५८ ॥

---

१२ अगाधा=समुद्राला. १३ अत्यजिता=अति अजित=अतिशय न जिंकलेला. १४ पितामहापरिस=आजोबा पेक्षां. १५ सुतलेश=पाताळचा राजा.

जे दैत्य लंघितिल तव शासन त्यांतें वधील मम चक्र ॥
शक्र किति काळ हि न तुज निरखिल लोचन करूनि लव वक्र ॥१५९॥
निश्चित रहा सुतळीं रक्षीन सदा तुला सपरिवारा ॥
माता आपण भागे लागों चि न दे मुलास परि धारा ॥ १६० ॥
असतां हि असुरसंगाति धरिल विवेका मलापहा शील ॥
कीं वीरा तूं सुतळीं सन्निहित सदा मला पहाशील ॥ १६१ ॥
या सुरवरें प्रल्हादप्रमुचा तो पौत्र महिवरेशा तदा ॥
बद्धांजळि होय बहु प्रेमभरें करूनि गहिवरें शब्दा ॥ १६२ ॥
परमेश्वरा तुज दिलें म्यां त्रिभुवन काय गोष्टि हे राहो ॥
ज्याणें न पाहिले हे श्रीचरण भ्रांति त्या चि येरा हो ॥ १६३ ॥
या हस्तमस्तकांहीं तादृक्सद्भक्तिभाग्यहीनांहीं ॥
प्रभुच्या श्रीचरणांला केला सम्यक् प्रणाम ही नाहीं ॥ १६४ ॥
केवळ तदर्थ उद्यम तो ही न जपोनि साजरा केला ॥
तेणें चि स्वशुचियशें बहु दिधली आज लाज राकेला ॥ १६५ ॥
कीं साधिला अनुग्रह जेणें न पडे चि जीव शोकांत ॥
जो दुर्लभ यशतपोदानांच्या कोटिनीं हि लोकांत ॥ १६६ ॥
अत्याश्चर्यकर तुझा काय प्रणतिप्रभाव वर्णवतो ॥
परम अगाध अपार चि वंदनमहिमा असा न अर्णव तो ॥ १६७ ॥
जो नीच असुर राजस त्यावरि ऐसा अनुग्रह रित्यातें ॥
पूर्ण करिसि घनसा परि लावसिसी तूं अनुग्र हरि त्यातें ॥ १६८ ॥
ऐसें वदोनि बंधनमुक्त बळि प्रभुसि विधिसि रुद्रासी ॥
वंदुनि सुतळीं शिरला पावुनि भगवत्प्रसादमुद्रासी ॥ १६९ ॥
पौत्र प्रसाद पावुनि सुटतां प्रल्हाद तो वदे हरितें ॥
प्रभुजी अपराधांहीं ज्यांचें तिळमात्र ही न देह रितें ॥ १७० ॥
ज्या दुष्टांचें जन्म स्पष्ट जनीं हाय हाय वदवीतें ॥
ते हे खळ पावविले कैसे दाक्षिण्यदृष्टिपदवीतें ॥ १७१ ॥
ब्रह्मादिकांस ही बहु दुर्लभ कीं हा अनुग्रह रहातें ॥
यश जें शिरीं चढे त्या तारी होउनि अनुग्र हर हातें ॥ १७२ ॥
प्रभु त्यासि म्हणे वत्सा बळिसह सुतळीं रहा महाशील ॥
तूं मज गदाधरातें पौत्रद्वारीं सदा पहाशील ॥ १७३ ॥

---

१६ राका=पूर्णिमा. १७ अनुग्रह=कृपा. १८ अर्णव=समुद्र. १९ मुद्राशी=आनंदाची रास.

सज्ञाति सपौत्र सुखें वत्सा सुतलालयास जा यजन ॥
माझें करिशील सुचिर बा न न उतला लयास जाय जन ॥ १७४ ॥
ऐशी आज्ञा होतां प्रभुतें नमुनि प्रदक्षिणा करुनी ॥
प्ऱ्हादप्रभु गेला श्रीहरिपदपद्मरजशिरीं धरुनी ॥ १७५ ॥
भगवान् शुक्रासि म्हणे भृगुसंततिदीपका तुवां तूर्ण ॥
जें राहिलें करावें शिष्याचें यज्ञकर्म तें पूर्ण ॥ १७६ ॥
यज्ञादि कर्म कांहीं थोडें कीं फार जें उणें होतें ॥
गुरुंनीं विलोकितां परिपूर्णत्वा पावतें गुणें हो तें ॥ १७७ ॥
शुक्र म्हणे विश्वगुरो हें कर्म त्रिभुवनांत शोभावें ॥
यन्नामें सांग सकळ सर्वस्वें पूजिलासि तूं भावें ॥ १७८ ॥
या यज्ञयशश्रवणीं कविमन चि न सर्व विश्व लोभावें ॥
यज्ञपुरुष जो साक्षात्सर्वस्वें पूजिलासि तूं भावें ॥ १७९ ॥
सांग सुसंपूर्ण चि हें कर्म तथापि प्रभो तुझी आज्ञा ॥
करितों मी कीं परम श्रेय तव निर्देशपालन प्राज्ञा ॥ १८० ॥
ऐसें वदोनि शुक्रें जें कांहीं कर्म राहिलें होतें ॥
संपादुनी यथाविधि विविजनकपदीं च वाहिलें हो तें ॥ १८१ ॥
वामन याचक होउनि मागुनि बळिजवळि दे पद भ्रात्या ॥
या परि हरि करि कौतुक गाती सत्कवि यशा अदभ्रों त्या ॥ १८२ ॥
व्हायास सदा कश्यप लोकपति हि लोक ही परम हर्षी ॥
देवर्षि नारदादिक राजर्षि तसे चि जे पर महर्षी ॥ १८३ ॥
ब्रह्मा त्रिभुवनपतिला प्रार्थुनि करि लोकलोकपालपती ॥
रविस जसे ग्रह पाहुनि लोकप त्या साधुलोकपा लपती ॥ १८४ ॥
प्रभुला घेउनि गेले वाहुनि त्रिंध्याद्रितें सुर विमानीं ॥
कविजन बहु प्रहृष्टा विश्वा सारस तया सुरवि मानी ॥ १८५ ॥
ब्रह्मा देवांसि म्हणे सर्व तुम्ही आरिस सुर भियाना कीं ॥
अधिका न सुधा न च ती प्रभुसेवेपरिस सुरभि या नाकीं ॥ १८६ ॥
स्व स्व स्थाना गेले ब्रह्मादि पुसोनि भक्तवशगातें ॥
अमृतासि न बहु मानिति वामनविभुचें विशुद्ध यश गा तें ॥ १८७ ॥
श्रीवैकुंठीं स्वर्गीं त्या श्रीबळिच्या हि अनळस द्वारीं ॥
अद्यापि तसा चि असे दुरितांचा मूर्त अनळ सद्वारीं ॥ १८८ ॥
छळ हि करुनि उतरी जो माथां बहु कल्प भर वसायाचा ॥

---

२० निदेश=आज्ञा. २१ अदभ्र=फार मोठें. २२ सद्वार=सत्समूह.

प्रभुशील हें परिसुनि हि न च धरिती अल्प भरंवसा याचा ॥ १८९ ॥
प्रल्हादवंशजीं छळ करि कल्याणार्थ कनकपट तो कीं ॥
करितो अहित पदार्थ त्यजवाया स्पष्ट जन कपट तोकीं ॥ १९० ॥
एवं च वंचक नव्हे करि बहु कारुण्य न च्छल हरी तें ॥
प्रभुदृक् दासीपद दे न सुधोदधिची हि अच्छि[23] लैहरी[24] तें ॥ १९१ ॥
दे प्रभुसि कवींच्या सुख व्हाया बहु मानसा बळी काय ॥
सांगा देवावांचुनि पावे बहु मान सांबळी* काय ॥ १९२ ॥
शुद्धा कीर्तिदुशाला पावे न कुकीर्तिकांबळीला जो ॥
ज्याचा श्रीश द्वारप तो मग सुतळांत कां बळी लाजो ॥ १९३ ॥
राजपदीं स्वर्गपदीं सत्यपदीं किति वृथा बसुनि फुगती ॥
मुक्तीहुनी शतगुणें बळिराज्याची अधोगति हि सुगती ॥ १९४ ॥
बळिचें सत्व अतुळ कीं दानीं घाली जरी सुंकवि[25] मोडा ॥
दे शाप दव चि तो परि न तदुत्साहाचिया सुंकवि[26] मोडा ॥ १९५ ॥
सुयशांच्या गुरुशापच्छळ दे दुर्वासयापरि चयातें ॥
अन वरुनि शशिकळेशीं पावति दुर्वा सया परिचयातें ॥ १९६ ॥
सोडी पळ हि न भगवान् संरक्षायासि बळिस दारा हो ॥
ज्याच्या पदीं मुनि म्हणाति मन कमळीं जेंवि अळि सदा राहो ॥ १९७ ॥
बळि निधि च तया रक्षी जाणों यक्ष चि सदा गदापाणी ॥
सद्भक्तद्वार प्रभु मीन जसा सोडिना कदा पाणी ॥ १९८ ॥
आपण होय घन प्रभु निजभक्तिगुणें करी बळिस मोर ॥
काळव्याळ पळे यश गात्याच्या ही नये कळि समोर ॥ १९९ ॥
म्हणतां तुम्हीं च हरिचें हरिहूनि उणें वदों नका यश तें ॥
तेथें या आर्यांचीं बुध हो पुरतील दोन काय शतें ॥ २०० ॥
इति श्रीमद्भागवते महापुराणे अष्टमस्कंधे श्रीरामनंदनमयूर
विरचितं श्रीमद्वामनचरितं समाप्तं ॥

२३ अच्छ=स्वच्छ. २४ लहरी=लाटा. * सांबळी=शालिग्रामादि देव ठेवण्याची पेटी.
२५ सुकवि=शुक्राचार्य. २६ सुकवी=वाळवी; शुष्ककरी.

## मोरोपंतकृत

# विठ्ठलभक्तस्तुति.

निजजनां अमृतें बहु तर्पिती । स्वअनवे अनवे कर अर्पिती ॥
सतत पूर्ण मुकुंदयशोरसें । न वदना वदना म्हणती असें ॥ १ ॥
करिति विठ्ठलभक्तसभा मुखें । विकासितें नटुनी स्वमहा सुखें ॥
अहिशिरीं करि नृत्य महामना । नटप तो टपतो अवलोकना ॥ २ ॥
अजित विठ्ठलभक्त यशःकथा । करुनि दाविति मुक्तिमहापथा ॥
रसिकसाधुमुखांबुरुहांप्रती । हसविते सविते चि नराकृती ॥ ३ ॥
शुक चि विठ्ठलभक्त न हें मृषा । नुरविती रसिकीं दुसरी तृषा ॥
हरियशोरस फार रुचे असा । रसिकता सिकता नुतरे कसा ॥ ४ ॥
करिति विठ्ठलभक्त कथा बरी । सुदृढ बाळ हि जीस मनीं धरी ॥
वश जयासि सदा भगवान् हरी । कुतुक या तुकयापरि भूवरी ॥ ५ ॥
सदय विठ्ठलभक्त चि तोडिती । त्रिगुणजाळ जडास हि सोडिती ॥
प्रभुचिया हि सुसंकट जें गळें । उलगडील गडी दुसरा न तें॥ ६ ॥
न तुकयासमशील न नामया । प्रिय मिळे न कळींत अनामया ॥
वरि अभंगसमुल्लसनें रसीं । शुकवचें कवचें नृप तो जशीं ॥ ७ ॥
हरिजनोक्ति समुल्लसनीं पटु । वचन जें वदती न कधीं कटु ॥
त्यजिति सेवुनि ज्या अघ वासना । बलवती लवती सदुपासना ॥ ८ ॥
सुख तसें सकळांस हि वाटतें । असुख सर्व पळांत चि आटतें ॥
निरखितां चि जसें भवपारदा । मुनिजना निजनायक नारदा ॥ ९ ॥
वदिति जीं वचनें परितोखदें । भवतमाप्रति होति च ओखदें ॥
निववि‍ले बहु वंदुनि मागती । भजन ते जन तेथ चि जागती ॥ १० ॥
कथिति जेथ मुकुंदयशःकथा । त्यजुनि विठ्ठलभक्त भवव्यथा ॥
निरखितां करुणामृतवृष्टिचें । अजिर तें जिरतें अघ सृष्टिचें ॥ ११ ॥
सम सदा अमृत प्रभु वर्षतो । निवुनि सर्व हि सेवक हर्षतो ॥
घन चि विठ्ठल भक्त मयूरसा । समजला मज लास्यें करी तसा ॥१२॥

इति श्रीरामनंदनमयूरविरचिता श्रीविठ्ठलभक्तस्तुतिः समाप्ता.

---

१ हें प्रकरण पंतांचे वंशज वे० शा० सं० रा० रा० मयूर पंडित यांजकडून रा० रा० अनंत विनायक सोहनी यांचे मार्फत आलें. २ अमृत=मोक्ष. ३ अहि=कालियसर्प. ४ नटप=उत्तम नाचणारा. ५ अंबुरुह=कमल. ६ सवितें=सूर्य. ७ मृषा=व्यर्थ, खोटें. ८ परितोखद=संतोष देणारें. ९ भवव्यथा=संसारदुःख. १० अजिर=अंगण. ११ अघ=पाप. १२ लास्य=नृत्य.

## मोरोपंतकृत

# सद्वर्णनदोहा[13].

संतांची ऋजु[14] रीति हे जना लाविती वेड ॥
कीं पाहति सम विप्र गो कुंजरें[15] कुतरें धेड ॥ १ ॥
देती हे स्वाश्रितजना शोभा नव नव संत ॥
असा सदा शोभवि करूनि लोभा न वन वसंत ॥ २ ॥
सदय पद यश निर्मला निरूपम सदा संत ॥
सुरतरु यांचें ऐकतां सुचरित म्हणति हंत[16] ॥ ३ ॥
किंबहुना यशें ईशाधिक हे संत ॥
काम न संभवला पुन्हा यांहीं करितां अंत ॥ ४ ॥
करिति अनुग्रहें[17] सर्वदा सम सर्वत्र हि संत ॥
सबळ धवल हा गुण जसा गजवदनाचा दंत ॥ ५ ॥
भूतदया या वरगुणें परम महितें[18] हे संत ॥
सेवक होउनि सेविला प्रभुनें एकोपंत ॥ ६ ॥
लाविति षडरिमुखासि हे संत मसें[19] तप नसे च ॥
ऐसे इतरीं नाशिती संतमसें[20] तपनसे[21] च ॥ ७ ॥
संतांच्या करुणा वसे सदां आंत बाहेर ॥
ह्मणति नता स्वानंदपद हृदय यांत बा हेर ॥ ८ ॥
संतांच्या ऐकुनि जगीं यशःसुधा[22]सत्रास[23] ॥
बाधे न भवाचा जडा[24] जसा बुधासि[25] त्रास[26] ॥ ९ ॥
तापत्रय[27] सत्संग हरी लावी न पळ उशीर ॥
अमृतकर[28] हि ऐसा न मग किति कर्पूर उशीर[29] ॥ १० ॥
सत्संगें पशु हि तरले तरति तरतील ही फार ॥
सत्संगाश्रित पावतो सुखें भवार्णव[30]पार ॥ ११ ॥
कलि किति काळ हि जोडितो हात संतरायांस ॥
विघ्नेश्वर[31]से शासिती संत अंतरायांस[32] ॥ १२ ॥

---

१३ हें ही प्रकरण पंढरीहून मागें टीप १ यांत लिहिल्याप्रमाणेंच आमचेकडे आलें. १४ ऋजु=सरळ. १५ कुंजर=हत्ती. १६ हंत=हाय हाय. १७ अनुग्रह=कृपा. १८ महित=पूजित. १९ मस=कालिमा. २० संतमस=गाढ अंधकार. २१ तपनसे=सूर्या सारखे. २२ सुधा=अमृत. २३ सत्र=धर्मदान. २४ जड=मूढ. २५ बुध=शहाणा. २६ त्रास=भीति. २७ तापत्रय=तीन प्रकारचीं दुःखें ( आधिदैविक, आध्यात्मिक, आधिभौतिक. ) २८ अमृतकर=चंद्र. २९ उशीर=पाणी सुगंधि होण्याकरितां जो घालतात तो वाळा. ३० अर्णव=समुद्र. ३१ विघ्नेश्वर=गणपति. ३२ अंतराय=विघ्न.

प्रभुगुणसे उडविति रज हि संत तम हि माना च ॥
यांचा निवत्रि म्हणे जना संतत महिमा नाच ॥ १३ ॥
देव न धाले निश्चयें अमृतें धाले संत ॥
अन्[illegible]सीं निस्पृह सदा निर्भय झाले संत ॥ १४ ॥
गंगा संतांच्या स्तवी संगा पादरजांत ॥
अंगा न्हाणी बहु रमारंगा आदर ज्यांत ॥ १५ ॥
गुरु सत्कीर्ति प्रभुगृहीं राबला जसा दास ॥
इच्या घरी ऐकुनि सुधा राब लाज सादास ॥ १६ ॥
जो पापनगीं[३३] तृणसमीं अनळसमान[३४] सदार[३५] ॥
प्रभु संतांचें सेवितो अनळस[३६]मानस दार ॥ १७ ॥
मिळतां कालिकाळांत या संतांचा शेजार ॥
न करि जननमरणाख्य हें महाव्यसन[३७] बेजार ॥ १८ ॥
संतांचा शुभविधिबळें होय सोयरा जीव ॥
सत्पुरुष तदाश्रित तसे जसें तोयें[३८] राजीवें[३९] ॥ १९ ॥
श्रित दीन न होउं दिला संतांनीं परतोन ॥
मिरवी उदारपण सुगुण संतानीं पर तो न ॥ २० ॥
ज्याच्या बोधदिवाकरें[४०] हरिति संत तिमिरास[४१] ॥
त्यांच्या विधिहरिहरपदा करिती संतति मिरास[४२] ॥ २१ ॥
संत भक्तिरति मागती संपदा न देवास ॥
मायेला यांचा सदा कंपदान दे वास ॥ २२ ॥
संतांचे संपादिती सुखें चि शुचि तप दास ॥
होती त्यांच्या ते तसे आपण उचित पदास ॥ २३ ॥
जो भाग्यें सत्कीर्तितें गुणें भाळला जीव ॥
त्या बुध म्हणती जिष्णुचें[४३] उणें भाल लाजीव ॥ २४ ॥
ज्या नम्रा घडलें असे यजन शुद्ध तप दान ॥
तो संतांच्या पावतो इतर उद्धत पदा न ॥ २५ ॥
युक्तियुता सद्वदनजा उक्ति माय जे बाळ ॥
भुक्ति काय त्यांच्या गळां मुक्ति घालिती माळ २६ ॥
लक्ष पतित तद्दुरितें[४४] तें कक्षें[४५] दवानळें[४६] संत ॥

---

३३ नग=पर्वत. ३४ अनळ–समान=अग्नीसारखा. ३५ सदार=स्त्रीसह. ३६ अनळस–मानस=आलस्यरहित आहे मानस ज्याचें असा. ३७ व्यसन=संकट. ३८ तोय=उदक. ३९ राजीव=कमल. ४० दिवाकर=सूर्य. ४१ तिमिर=अंधेर. ४२ मिरास=वतन. ४३ जिष्णु=इंद्र. ४४ दुरित=पाप. ४५ कक्ष=गवत. ४६ दवानळ=दावाग्नि.

दक्ष असे करिते जगीं न क्षम भवविपदंत[47] ॥ २७ ॥
हरिहरसद्गुण हंस हे यांचे सन्मुख नीडें[48] ॥
यांला संतांची तशी नसे परांची भीड ॥ २८ ॥
प्रखरषडरि ते जड रिते पडति रडति कलिदोष ॥
संतांच्या तेजापुढें होय विघ्नमुखशोष ॥ २९ ॥
सच्चरणाश्रितभवभयें न धरीं कंपा दीन ॥
बाल हि न म्हणे तज्जयें अभिमत संपादीन ॥ ३० ॥
ज्यावरि संतांची दया त्यावरि हरिची होय ॥
तेथें चि पिके वर्षती जेथें तोयद[49] तोय ॥ ३१ ॥
कवि म्हणति सदाश्रितसुखें आतपत्रें[50] पावे च ॥
नृपतिपुढें न करुनि वृथा आतप[51] त्रपो[52] वेच ॥ ३२ ॥
ढळति दरांच्या न च वरें चवरें शिरीं सदैवें[53] ॥
सदनुग्रह नसतां नव्हे तो शतमखें[54] हि सदैवें[55] ॥ ३३ ॥
संतांच्या लोकत्रयीं चिर बहु मान वरें च ॥
उतरुनि घेती परकरें सुर बहु मानव रेंच ॥ ३४ ॥
सदनुग्रह नव्हतां असे भगवदनुग्रह काय ॥
सदनुग्रह जडतां म्हणे भगवदनुग्रह जरि हाय ॥ ३५ ॥
संत आणिक भगवंत हे एक च म्हणती वेद ॥
खेद काय जरि कल्पिला भक्तिसुखार्थ चि भेद ॥ ३६ ॥
सामर सहस्रनयनें[56] ज्यां पामरें[57] संमत ते संत ॥
तामरसनाभिचारुंचे[58][59] नामरस चि अत्यंत ॥ ३७ ॥
सत्कीर्तिस म्हणति सुधा सुधेसि कांजी जीर्ण[60] ॥
असे संत मग सुर तयां म्हणतिल कां जी जी न ॥ ३८ ॥
श्रीदेवर्षि[61]प्रमुख जे विठ्ठलसेवक संत ॥
त्यां सर्वांतें वंदितो भावें मयूरपंत ॥ ३९ ॥

इति श्रीरामनंदनमयूरविरचिताः सद्गुणनदोहाः समाप्ताः

---

भवविपदंत=संसाररूपी विपत्तीचा शेवट. ४८ नीड=घरटें. ४९ तोयद=मेघ. ५० =छत्र. ५१ आतप=ताप, ऊन्ह. ५२ त्रपा=लाज. ५३ सदैव=निरंतर. ५४ शत- . ५५ सदैव=भाग्यवान्. ५६ सहस्रनयन=इंद्र. ५७ पामर=दरिद्री. ५८ तामरस= ५९ चारु=सुंदर. ६० जीर्ण=वृद्ध. ६१ देवर्षि=नारद.

## मोरोपंतकृत
# पृथुकोपाख्यानं.

यदु [3] कमळार्के श्रीवरें सच्छरण्यें
सुखकरें चरितें जीं येथ केलीं अगण्यें ॥
द्विज निःसख देवें तारिला त्या चरित्रा
क्षणभरि तरि गाऊं हो स्ववाचा पवित्रा ॥ १ ॥
कमळापतिनें दयापयोदें । दिधलें वैभव याचिया प्रमोदें ॥
मुनिची वनिता पुसे वरातें । हृदयीं आठवूनि स्वदेवरातें ॥ २ ॥
दरिद्रभावें परिखिन्न तोकें [10] । झाल्ये मनीं दुःखित दैन्य शोकें ॥
मीं प्रार्थिले हे चरण स्वभावें । कीं द्वारकेला अजि नाथ जावें ॥ ३ ॥
उपायनालागिं [11] गृहांत नाहीं । यांचेविणे यत्न नसे चि कांहीं ॥
पोहे दिले मागुनि चार मुष्टी । झाली तुम्हांला तंव फार तुष्टी ॥ ४ ॥
गेलां द्वारावतीला मग पुसुनि मला त्या चि रात्रीस सारें ।
केलें हें स्वर्गतुल्य स्थळ विमळ गुणें कृष्णनाथें उदारें ॥
तुम्ही तैसे चि आलां गृह न वळखिलें दाटला कंठ गेहीं
रोमांचस्वेदकंप [12,13,14] प्रभृति उपजले आठ ही भाव देहीं ॥ ५ ॥
स्वामी मला कौतुक फार झालें । कसें अकस्मात बहु भाग्य आलें ॥
सखा निजांचा स्वजनार्तिहारी [15] । विलोकिला केंवि तुम्ही मुरारी [16] ॥ ६ ॥
काय तो वदला यदूत्तम काय हो कथिलें मुखें
भेटलां बसलां कसे अजि जेविलां निजलां सुखें ॥
अर्पिलें जगदीश्वराप्रति तें उपायन जी कसें ।
हें मला कळवा समस्त हि हर्षनिर्भरमानसें ॥ ७ ॥

### इतिप्रश्नः

असा प्रश्न स्त्रीनें जनसुखद केला तंव सुखें ।
कथी श्रीदामा तो हरिचरित सारें निजमुखें ॥

---

१ हें प्रकरण पंढरपुराहून पंतांचे वंशज वे० शा० सं० रा० रा० मयूर पंडित यांजकडून रा० रा० अनंत विनायक सोहनी यांचे मार्फत आलें २ हेंच आख्यान पंतांनीं बृहद्दशमाच्या उत्तरार्धाचा अध्याय ८० व ८१ यांत गीतिबद्ध लिहिलें आहे. ३ अर्क=सूर्य. ४ श्रीवर=लक्ष्मीपति. ५ सच्छरण्य=सत्पुरुषरक्षक. ६ कमला=लक्ष्मी. ७ पयोद=मेघ. ८ वनिता=स्त्री. ९ देवर=दीर. १० तोक=बालक. ११ उपायन=भेट, नजर. १२ रोमांच =आंगांवर कांटा उभा राहणें. १३ स्वेद=घाम. १४ प्रभृति=आदि. १५ जनार्ति=लोकांचें दुःख १६ मुरारि=मुर नामक दैत्याचा शत्रु.

कथा सांगे जेव्हां मुनि युवतिला अद्भुतरसा ॥
तदा झाला सारा परिजन[17] सुचित्र[18]प्रकरसा ॥ १ ॥
म्हणे श्री श्रीदामा सुतनु पुशिलें हें बहु बरें ।
चरित्र श्रीशाचें तुज कथितसें आदर[19]भरें ॥
अहो झालें धन्य त्रिभुवन हि मान्मित्रचरितें ।
त्रपें[20] या औदार्यें अमरतरु[21]चें वृंदें[22] वरितें ॥ २ ॥
जाये केला मज निज मुखें बोध तूं जा[illegible]ला ।
तेव्हां ध्यावी त्वरित हरिची भेटि हा काम झाला ॥
कीं पाहेन प्रभु धणिवरी शुद्ध तो हा चि लाभ ।
तद्भिन्नार्थाधिगम[23] निपुणीं मानिला कज्जललाभ[24] ॥ ३ ॥
निघालों प्रिये येथुनी या चि भावें । पथीं भेटली धेनु संयुक्त शावें[25] ॥
पुढें फार गेले पथीं चास डावे । तदा वाटलें लाभ मोठे घडावे ॥ ४ ॥
सुदुर्लभ तदंघ्रि[26]चें विधिस[27] ही रजःस्पर्शन ।
घडेल मजला कसें यदुकुळेंद्रसंदर्शन ॥
असें स्वमनिं चिंतित क्रमुनि मार्ग अत्यल्पसा ।
पुरीजवळि पावलों निजगृहांगणांतीं जसा ॥ ५ ॥
त्यास्थानीं अवलोकिलीं उपवनें जीं वंदिजे नंदनें ।
केलीं स्वर्द्रुमगर्वभंगनिपुणें श्रीदेवकीनंदनें ॥
ज्यांमध्यें शुकसारिकापिक[28]मुखें भास्वत्खग[29]ांचीं कुळें ।
गाती मंजुळ पुण्यकीर्तिचरितें मोक्षप्रदें निस्तुळें ॥ ६ ॥
मीं गुल्मात्रितयासि लंघुनि पुढें जातां पुरी देखिली ।
चित्तीं ते अमरावती क्षितितळीं आली अशी लेखिली ॥
खाब्धि[30] (४०) क्रोश ततां[31] समुच्चकनकप्रासाद[32]मालावृतां[33] ।
जाणों भूषणपेटिका जगतिची रत्नाकरा[34]विष्कृता[35] ॥ ७ ॥
कक्षांचें त्रय लंघिलें प्रियतमे गेलों पुरीआंत मी ।
तों कानीं पडलीं मुकुंदचरितें जीं वर्णिलीं सत्तमीं ॥
तेथें सुंदर मंदिरें निरखिलीं जीं भोजवृष्ण्यंधकीं ।
सारीं मंडित ज्या स्थळीं क्षण नसे विप्रासि निर्बंध कीं ॥ ८ ॥

---

१७ परिजन=सेवक. १८ प्रकर=समूह. १९ भर=अतिशय. २० त्रपा=लज्जा. २१ अमरतरु=कल्पवृक्ष. २२ वृंद=समूह. २३ अधिगम=प्राप्ति. २४ कज्जलाभ=काजळा सारखा. २५ शाव=वत्स. २६ अंघ्रि=पद. २७ विधि=ब्रह्मा. २८ पिक=कोकिल. २९ खग=पक्षि. ३० खाब्धि=चाळीस. ३१ तता=विस्तृता. ३२ प्रासाद=वाडे. ३३ आवृता=व्याप्ता. ३४ रत्नाकर=समुद्र. ३५ आविष्कृता=प्रकट केलेली.

मध्यें द्व्य[36]ष्ट सहस्र साष्ट शत ही कृष्णालयें पाहिलीं ।
जाणों केवळ रत्नसा[37]नुशिखरें गेहें[38]च्छळें राहिलीं ॥
…नाकौतुकभाजनें मणिगणस्वर्णाभि[39]रामें नवीं ।
यामद्वारें अवलोकिलीं चि न तशीं पृथ्वीतळीं मानवीं ॥ ९ ॥
द्वारीं द्वा[40]स्थित पाहिले शशिमुखि प्रत्यक्ष जाणों सुर ।
ज्यांचे द… सुरम्य रत्नकनकस्वच्छां[41]बरीं भा[42]सुर ॥
हस्तीं वेत्रलतेः प्रतापरविच्या कीं दीधिती[43] विष्णुच्या ।
कंसाद्युग्रजगद्भयावहखळव्रा[44]तांचिया जि[45]ष्णुच्या ॥ १० ॥

इति द्वारावतिप्रवेशः

---

श्रीमन्मंदिर एक सुंदर मला जातां चि जें लागलें ।
त्यामध्यें शिरतां चि भान सहसा गेलें प्रिये मागलें ॥
पु[46]ण्यश्लोकगृहांगणांत गमलें स्वर्गीं असें मी असें ।
ब्रह्मानंद चि पावलों सुवदने तें सौख्य सांगों कसें ॥ १ ॥
गेलों मी जेधवां कीं वरतनु सुभगे अंगणीं श्रीहरीच्या ।
होता तेव्हां पलंगीं यदुकुलमणि तो रुक्मिणीसुंदरीच्या ॥
तेथें दूरूनि मातें निरखुनि सहसा धांवला दीनबंधु ।
स्यानस्रस्तोत्तरीयालकमुकुटपटस्रक्क कारुण्यसिंधु ॥ २ ॥
कृष्णानें बाहुयुग्में निजयुवतिपरि[47]ष्वंगमृ[48]ष्टांगरा[49]गें ।
मातें आलिंगिलें हो सुदति धरूनियां पोटिशीं सा[50]नुरागें ॥
झाला मद्दर्शनें तो प्रमुदित सुटलें लोचनीं प्रेमवा[51]री ।
मित्रांगस्पर्शरोमांचिततनु दिसला चिंतकांचा भ[52]वारी ॥ ३ ॥
पर्यंकीं मज बैसवूनि सुभगे अत्यादरें श्रीकरें ।
पाद क्षालुनि घेतलें जळ शिरीं पुण्याकरें तें करें ॥
कर्पूरागुरुकुंकुमें मृ[53]गमदें स्र[54]ग्भूषणें चंदनें ।
देवाच्या परि पूजिलें सु[55]रनुतें श्रीदेवकीनंदनें ॥ ४ ॥
धूपें दीपें दिव्यतांबूलदानें । मातें भार्ये पूजुनी संमदानें ॥

---

३६ द्व्यष्ट=सोळा. ३७ रत्नसानु=मेरुपर्वत. ३८ छल=मिष. ३९ अभिराम=सुंदर. ४० द्वास्थित=द्वारपाळ. ४१ अंबर=वस्त्र. ४२ भासुर=तेजस्वी. ४३ दीधिती=तेज. ४४ व्रात=समूह. ४५ जिष्णु=जिंकणारा. ४६ पुण्यश्लोक=पवित्र आहे कीर्ति ज्याची असा. ४७ परिष्वंग=आलिंगन. ४८ मृष्ट=पुसलेली. ४९ अंगराग=चंदनाची उटी. ५० अनुराग=प्रेम. ५१ वारि=उदक. ५२ भवारी=संसारनाशक. ५३ मृगमद=कस्तुरी. ५४ स्रक्=माळ. ५५ सुरनुत=देवस्तुत.

कांते माझ्या पावुनी संगतातें । दीनत्राता बोलिला स्वागतातें ॥ ५ ॥
तेव्हां चामर तालवृंतक[५६] करीं घेऊनि शैब्या[५७] करी ।
मन्मार्गश्रम दूर तें परिशिलें अंतःपुरीं लौकरी ॥
कांता श्रीहरिच्या वरोरु सकळा अत्युत्सुका धांवल्या ।
मातें पाहुनि वंदुनी बहु मनीं त्या विस्मया पावल्या ॥ ६ ॥
कृष्णाच्या वनिता विलोकुनि मला त्या बोलिल्या कीं असा ।
भिक्षु क्षाम[५८] कुचैल[५९] विप्र हलभृत्पूजार्ह झाला कसा ॥
पल्यंकस्थित रुक्मिणी त्यजुनियां हा अग्रजाचे परी ।
नाथें भेटुनि पूजिला जनिं नसे पुण्यासि याच्या सरी ॥ ७ ॥
शोभाहीन कुरूप गर्हित पहा हा दुर्गत[६०] ब्राह्मण ।
पूज्याचें न दिसे चि एक हि तरी देहावरी लक्षण ॥
कैसा हाभुवनत्रयैकगुरुनें लक्ष्मीनिवासें परी ।
आलिंगूनि समर्चिला निजकरीं सीरायुधाच्या[६१] परी ॥ ८ ॥
श्रीकृष्णांतःपुरजन असा पावला विस्मयाला ।
भक्तीं वात्सल्य जें त्या त्रिभुवनपतिचें तें कळेना तयाला ॥
साध्वी प्रेमेंकरूनि प्रभु मग मजशीं बोलिला तें चि ऐकें ।
होतील त्वच्छ्रुतीतें गृहिणि निरुपमें हृत्सुखें तेथ नैकें ॥ ९ ॥

## इति भगवद्दर्शनं

---

सरोजनयने[६२] सुखें करुनि मी आणि श्रीहरी ।
धरूनि बसलों परस्पर करीं पलंगावरी ॥
तयीं मज विचारिलें यदुवरें प्रिये या परी ।
स्वयें परिस रीति ते सरस भाषणाची बरी ॥ १ ॥
श्रीमत्सांदीपिनि[६३]गुरुपदाराधनें सर्वमात्रें ।
आह्मीं तुह्मीं निरलसपणें पावलों वेदशास्त्रें ॥
आचार्याज्ञोत्तर निजगृहालागिं जातां वियोग ।
झाला अद्यावधि निरसला आज विश्लेष[६४]भोग ॥ २ ॥
प्रायस्त्वन्मन काम खंडित नसे ठावें असें हें मला ।
धर्मज्ञा परि हे गृहस्थपदवी सर्वां मतीं निर्मला ॥

---

५६ तालवृंतक=ताडपत्राचा पंखा. ५७ शैब्या=रुक्मिणी. ५८ क्षाम=रोडका. ५९ कुचैल=फाटकीं वस्त्रें ज्याच्या अंगावर आहेत असा. ६० दुर्गत=दरिद्री. ६१ सीरायुध=बलराम. ६२ सरोजनयने=हे कमलनेत्रे. ६३ सांदीपिनी=कृष्ण व सुदामा यांच्या गुरूचें नांव. ६४ विश्लेष=वियोग.

या साठीं सुवधूकरग्रह सखे संपादिला कीं नसे ।
हे मातें पुशिलें स्वयें प्रथमतः श्रीशें समुन्मानसें ॥ ३ ॥
मी लोकसंग्रहानिमित्त गृहस्थधर्म । संसेवितों जरि हि यांत नसे चि शर्म[६५] ॥
कर्में करूनि उचित त्यजिजे फळें हा । बंधो तुला विमळ मार्ग बरा कळे हा ॥ ४ ॥
आम्हासि जो गुरुकुलांत निवास झाला । बंधो सदा स्मरसि कीं स्वमनीं तयाला ॥
ज्ञेयासि जाणुनि सुखें करुनि द्विजाती । जेणें विलंघुनि तमोंबुधि पार जाती ॥ ५ ॥
श्रुतींच्या अभ्यासें उपशमगुणें दुर्घटतपें ।
व्रतें दानें किंवा अनवरत[६६] नाना मनुजपें[६७] ॥
तसा भूतात्म्याला मज तिळ नसे तोष यजनें ।
जसा होतो ब्रह्मन् निजगुरुपदांभोजभजनें ॥ ६ ॥
प्रथम गुरु पिता जो वेदविद्याप्रदाता ।
मज सम गुरु तो कीं दूसरा मान्य ताता ॥
स्वपदनतजना जो ज्ञान देऊनि तारी ।
गुरुवर तिसरा तो मीं च साक्षाद्भवारी ॥ ७ ॥
भार्ये कृष्ण असें उदंड गुरुचें माहात्म्य अत्युत्सवें ।
जें कांहीं वदला यथार्थ अमृतप्राय स्वदासासवें ॥
तें सांगों किति मी परंतु चतुरे तूं ऐकशी आदरें ।
या साठीं तुज लेशमात्र कथिलें हें नावडे विस्तरें ॥ ८ ॥

## इति गुरुमहात्म्यं

---

विद्याभ्यासार्थ होतों निजगुरुसदनीं तेधवां एकदां जें ।
झालें वृत्त प्रिये तें कथुनि यदुवरें मोहिलें चित्त माझें ॥
तें मी ही तूज आतां जलरुहनयने[६८] सांगतों ऐक जाये ।
प्रेमानें वर्णितां हें घडि घडि हरिच्या नीर[६९] नेत्रांबुजा[७०] ये ॥ १ ॥
बंधो तें नित्य केव्हां तरि कुतुक तुझ्या आठवे कीं मनाला ।
आणाया इंधनाला स्वगुरुयुवतिनें धाडिलें जैं वनाला ॥
काळावांचूनि[७१] आला जलधर[७२] सुटला वात अंधार झाला ।
भ्याला आत्मा कराला हि कुटिलतरलां लास शब्दा विझाला ॥ २ ॥
भास्वान्[७३] मावळला पयोद वळला स्थूलांबुवाहोपल[७४] ।

---

६५ शर्म=सुख. ६६ अनवरत=निरंतर. ६७ मनु=मंत्र. ६८ जलरुह=कमल. ६९ नीर=पाणी. ७० अंबुज=कमल. ७१ कालावांचूनि=अकाळीं. ७२ जलधर=मेघ. ७३ भास्वान्=सूर्य. ७४ स्थूलांबुवाहोपल—व्रात=पावसाच्या गारांचा समूह.

व्रातांहीं बहु पीडलों स्थिर वनीं दीलें न राहों पळ ॥
वर्षे कांकडलों जळांत पडलों झाला क्षणें दिग्भ्रम ।
सारे बाळ कराळ काळ शिरला चित्तीं महा संभ्रम ॥ ३ ॥
तो निम्नोन्नत[75]भूविभाग न कळे सर्वत्र झालें वन ।
आह्मां काळमुखासमान गमलें सर्वांस हीं तें वन ॥
अंधारीं धरुनी परस्पर करीं स्वोध्वभ्रमा[76] पावुनी ।
प्रत्यूषावधि[77] हिंडलों मग परामर्शासि आला मुनी ॥ ४ ॥
झालों होतों श्रमानें विकळ सकळ ही काननीं[78] वृष्टिवातें ।
आचार्यें धांवुनीयां स्वहृदयिं धरिलें जेंवि आत्मोद्भवातें[79] ॥
केलें आघ्राण माथां सकरुण गुरु तो वर्षला प्रेमतोया ।
मच्चित्ता आठवे श्रीगुरुचरणदयाप्राप्त सत्कार तो या ॥ ५ ॥
केले हे क्लेशपात्र प्रियतम हि तुम्हीं अस्मदर्थ स्वकाय ।
या कर्माहूनि लोकीं गुरुसि समुचिता दक्षिणा येथ काय ॥
पावा माझ्या प्रसादें सकळ हि सकळा शुद्ध संपूर्ण विद्या ।
शिष्याच्या हृत्तमाचा प्रशमकर करी ज्ञाननामा रवि द्या ॥ ६ ॥
एवं श्रीगुरुनें प्रसाद सदयें केला मला तो स्मरे ।
बंधो देशिक[80]पादपद्मभजनें संसार हा ओसरे ॥
झालीं यापरि जीं अनेक कुतुकें तीं या मनीं जागती ।
भार्ये देव असा उदंड वदला लोकेश माजा गती ॥ ७ ॥
भार्ये ही कथिली कथा निज मुखें जेव्हां जगन्नायकें ।
तेव्हां उत्तर मीं दिलें हरिस जें तें तूं बरें आयकें ॥
लोकेशा जनसंग्रहार्थ गुरुच्या गेहीं तुझें राहणें ।
अस्मद्भाग्य हि थोर कीं श्रुतिनुता[81] लीला तुझ्या पाहणें ॥ ८ ॥
ज्याचा वेदमय स्वदेह कुशलाधार त्रिलोकीविता ।
जो वर्णाश्रमधर्मकल्पक कवी श्रुत्यध्व[82]संस्थापिता ॥
विश्वाचा गुरु तो स्वयें गुरुकुळीं विद्यार्थिभावें वसे ।
हें तों लोकविडंबन प्रभुवरा अन्यार्थ येथें नसे ॥ ९ ॥

## इति गुरुकुलनिवासवृत्तवर्णनं.

---

७५ निम्नोन्नत=खोल व उंच. ७६ अध्वभ्रम=मार्ग चुकणें. ७७ प्रत्यूष=प्रातःकाळ. ७८ काननीं=अरण्यांत. ७९ आत्मोद्भव=पुत्र. ८० देशिक=गुरु. ८१ नुत=स्तुत. ८२ श्रुत्यध्व=वेदमार्ग.

निजगुरुकुळवासवृत्त देवें । शशिमुखि वर्णुनि मंजु वासुदेवें ॥
मग कुतुक अणीक एक केलें । परिस तुझें जरि चित्त हें भुकेलें ॥ १ ॥
आदरें मग म्हणे यदुराय । आणिलें मज उपायन काय ॥
दे सख्या न म्हणुनी उशिरासी । बोलिला मधुर हें सुखराशी ॥ २ ॥
तिळभरि जरि भक्तें अर्पिलें वस्तु कांहीं ।
बहुतचि मज होतें प्रेमभावें चि पाहीं ॥
बहुत हि दिधलें कीं भक्तिहीनें मला जें ।
अणु चि गमतसे तें चित्त तोषे न माझें ॥ ३ ॥
पत्रपुष्पफलतोय हि जो कीं । भक्तिनें चि मज दे जन लोकीं ॥
तें स्वभक्त्युपहृताखिल सेवीं । मी सुतृप्त हि सुधारस जेवीं ॥ ४ ॥
हें बोलिला प्रभु यथार्थ परंतु जाये । द्यावें उपायन असें न हृदंबुजा ये ॥
लक्ष्मीपतीस पृथुकप्रसृतिप्रदान । लाजोनि मीं निज करें दिधलें कदा न ॥ ५ ॥
वरोरु बसलों अवाङ्मुख उगा चि लज्जाभरें ।
स्वयें चि मग शोधिलें पृथुकचैलें विश्वंभरें ॥
अकिंचनजना जसें सुखनिधान लाभे क्षिती ।
तशी चि बहु मानिली स्वमनिं भेटि वामाक्षि ती ॥ ६ ॥
स्वयें सोडिता जाहला चैलखंडा । जसा ऊघडावा मणींचा करंडा ॥
विलोकूनि पोहे मनीं तोष भारी । प्रिये पावला तो सखा कैटभारी ॥ ७ ॥
मग उपायन तें बहु मानिलें । यदुवरें अमृताहुनि वानिलें ॥
पृथुकमुष्टि मुखीं जंव घातिली । त्वरित भीष्मकजा तंव पातली ॥ ८ ॥
पूर्वींची भक्षुनीयां झडकरि दुसरी मुष्टि घेतां करातें ।
धांवूनी रुक्मिणीनें धरुनि विनवुनी वारिलें श्रीकरातें ॥
झाला त्या दंपतीचा किमपि हळु हळु प्रेमभावें विवाद ।
नेले अंतःपुरीं ते पृथुक मग तिणे देवदेवप्रसाद ॥ ९ ॥

इत्युपायनस्वीकारः ॥

---

कुवलयदललोचने पत्नि ऐसे परी लोटिला वासर श्रीहरीच्या घरीं मीं सुखें ।
मुदित हृदय होउनी मित्रभावें स्वयें बोलिला दीनगोप्ता सुधासार गोष्टी मुखें ॥
तदुपरि निशि देवदेवाचिया पंक्तिला जेविलों नीजलों कांचनाच्या पलंगावरी ।
सुकृत करुनि मर्त्य आमृत्यु कष्ट स्वदेहासि देऊनि जैसा मगस्वर्ग भोगा वरी ॥१॥

---

८३ पृथुकप्रसृति=पसाभर पोहे. ८४ अवाङ्मुख=खालीं मान घातलेला. ८५ चैल=वस्त्र. ८६ अकिंचन=दरिद्री. ८७ दंपतीचा=नवऱ्याबायकोचा. ८८ कुवलयदल=कमलपत्र.

प्रमदे पडलों असा सुकाळीं । मग आज्ञा हरिनें दिली सकाळीं ॥
मज पावित दूर देव आला । विरहें बाष्पनिरुद्ध कंठ झाला ॥ २ ॥

सखे बंधो चित्तीं मज न विसरावें पळभरी ।
असें मातें कंठीं धरुनि वदला गद्गद हरी ॥
महाकष्टें माझे पद नमुनि वैकुंठ परते ।
बळें नेले पाय स्वभजकसमुद्धारपर ते ॥ ३ ॥
मातें श्रीपतिनें न वित्त दिधलें मी ही न मागीतलें ।
त्वत्संकोचनिमित्त साध्वि फिरतां मच्चित्त तें लाजलें ॥
पुण्यश्लोकपदाब्जदर्शनसुखें संतृप्त झालों परी ।
श्रीशापासुनि पावलों युवति तो सत्कार सर्वोपरी ॥ ४ ॥
मद्भक्त प्रिय मित्र दुर्बळ धना पावोनि माजे क्षणीं ।
हें झाला मनिं आणिता सदय तो श्रीमान् वदान्याग्रणी ॥
मातें दुर्लभ पाय दावुनि दिलें न द्रव्य तें यास्तव ।
ऐसें मीं हृदयांत मानुनि पथीं केला हरीचा स्तव ॥ ५ ॥
जे स्वांघ्र्यंबुजभक्तिकल्पलतिका लोकत्रयीं दुर्लभा ।
ते मातें दिधली भवांधतमसप्राग्भारभानुप्रभा ॥
तेथें काय अनित्य तुच्छमदकृद्द्रव्यार्पणाची कथा ।
दाता सुज्ञ हि तूं चि साम्य घडतें कल्पद्रुमें अन्यथा ॥ ६ ॥
देती प्राकृत ही प्रभु द्रविण कीं दातृत्व तेणें जरी ।
हें सर्वत्र हि वर्ततें प्रभुवरा पश्वंतरीं स्थावरीं ॥
जें देणें शुचि नित्य दुर्लभ सुखाधार स्वयें वाढतें ।
मातें मोक्षदपादवित्त न धन स्वामी दिलें बाढ तें ॥ ७ ॥
आत्मप्राप्तिसुख प्रसिद्ध परम श्रेष्ठ श्रुतींच्यो मतें ।
जेथें त्यागुनि अन्य चित्त कविंचें सुस्वांत विश्रामतें ॥
तें द्रव्यें न मिळे चि दास्य चि तुझें त्याचें खरें साधन ।
सेवेनें चि सुखी असें हरि नको या पाददासा धन ॥ ८ ॥
वर्णूं काय तुझें उदारपण मी योगींद्र जे कीं भले ।
ते ही नैक तपोजपें तव पदाब्जाच्या रजा लाभले ॥
त्या त्वां दुर्लभदर्शनें स्वहृदयीं धांवूनि आलिंगिलें ।
श्रीतें सोडुनि पूजिलें सुखविलें तापत्रया भंगिलें ॥ ९ ॥
हा पापी धनहीन दीन मलिन क्षोणीतळीं निंदित ।

---

८९ वदान्याग्रणी=दात्यांत श्रेष्ठ. ९० अंधतमस=गाढ अंधःकार. ९१ क्षोणी=पृथ्वी.

यो सर्वोत्तम षड्गुणाश्रय विभू वेदीं जनीं वंदित ॥
हे चित्तीं न धरूनि धांवुनि मला त्वां अग्रजाचे परी ।
आलिंगूनि कृतार्थ या त्रिभुवनीं केलें सख्या श्रीहरी ॥ १० ॥

इति श्रीपुनरागमने भगवद्वात्सल्यवर्णनं ।

---

एवं श्रीहरिची स्वदासवशता ब्रह्मण्यता मित्रता ।
भक्तीं वत्सलता वदान्यवरता भावज्ञता आप्तता ॥
विद्वत्ता प्रभुता मनोज्ञगुणता सानंदता सेव्यता ।
चित्तीं आणुनि मी सुखें प्रियतमे झालों पथीं चालता ॥ १ ॥
येतां द्वारवतीपुराहुनि असा मार्गाकडे पाहत
स्वांतीं[९२] श्रीपतिमूर्ति वाहत निजप्रेमह्रदीं[९३] नाहत ॥
आलों स्वीय गृहाचिया निकट मीं जों दृष्टि केली वरी ।
तेजःपुंज चि देखिला तंव पुढें तात्काळ हो सुंदरी ॥ २ ॥
चकित विस्मित होउनि देखिलें । क्षण मनीं हरिचें पुर लेखिलें ॥
मग विचार बरा करुनि स्वयें । वळखिलें स्थळ कामिनि निश्चयें ॥ ३ ॥
कूजत्पक्षिकुळाकुळें उपवनें सर्वत्र साब्जें वनें ।
क्रीडन्मंदसुगंधशीतपवनें तापार्त[९४]संजीवनें ॥
भास्वत्पावक[९५]चंद्रकांतिभवनें स्वर्गप्रभें पावनें ।
कांते म्यां अवलोकिलीं सुरनिभें[९६] स्त्रीपुंसवृंदावनें ॥ ४ ॥
माझें हें स्थळ निश्चयें परि असें झालें अकस्मात् कसें ।
जेथें पर्णकुटी निवेशनसदा तें स्थान देवौकसें[९७] ॥
ऐसें चिंतित मानसीं प्रियतमे होतों उभा विस्मित ।
तों प्रत्युद्गमनार्थ[९८] नागरिक हे आले पुढें सस्मित[९९] ॥ ५ ॥
आले देवसमान मानव पुढें नारी हि देवीप्रभा ।
जाणों भूमिवरि स्वयें उतरली साक्षात् सुरांची सभा ॥
नानावाद्यरवें करूनि सहसा व्योमीं[१००] प्रिये दाटलें ।
मच्चितासि पतिव्रते शुभमते तें स्वप्नसें वाटलें ॥ ६ ॥
आला मागधसूतबंदिगण जो तेणें मला वानिलें ।
नानोपायनपाणिनागरजनें भेटोनि सन्मानिलें ॥

---

९२ स्वांत=मन. ९३ ह्रद=डोह. ९४ तापार्त=उन्हानें पीडिलेले. ९५ पावक=अग्नि. ९६ निभ=सदृश. ९७ देवौकसें=स्वर्गासारखें. ९८ प्रत्युद्गमन=सामोरें येणें. ९९ स्मित=हास्य. १०० व्योम=आकाश. १ मागध, सूत, बंदी हे तीन स्तुतिपाठकांचे भेद आहेत. २ नानोपायनपाणिनागरजन=नाना तऱ्हेचे नजराणे घेतले आहेत हातीं ज्यांनीं असे शहरकरी.

कन्या साक्षतलाजपुष्पनिकरें माझ्या शिरीं वर्षल्या ।
वेश्या गाउनि नाचल्या मजपुढें येतां पुरीं हर्षल्या ॥ ७ ॥
कांते अत्युत्सवानें विनवुनि नमुनी जेंवि भूपोत्तमातें ।
आले घेऊनि नारीनरजन नगरीमाजि पूजूनि मातें ॥
प्रासादद्वारदेशीं चकित चकित मी पावलों आग्रहानें ।
होतों सभ्रांत तेव्हां गृहिणि बहुतर ग्रस्त जैसा ग्रहानें ॥ ८ ॥
तों पद्माहुनि पद्मजा[३] जशि निघे दिव्यांगशोभा सती ।
येतां बाहिर मंदिरांतुनि तशी झालीस हो भासती ॥
दिव्यस्त्रीप्रतिमद्युतिप्रविलसद्दासीसहस्रस्तुता[४] ।
तूं नीराजनपात्र घेउनि करीं आलीस आलीयुता[५] ॥ ९ ॥
जाये त्वां मज रत्नदीपनिकरें ओंवाळुनी आदरें ।
हस्तातें धरुनि स्वयें निज करें रोमांचितें सुंदरें ॥
गेहीं आणुनि बाष्पपूर्ण नयनें दिव्यासनीं स्थापिलें ।
तावत्काळ हि मन्मन प्रियतमे स्वप्नभ्रमें व्यापिलें ॥ १० ॥

इति **स्वालयप्रवेशः**

स्फटिकमरकताचिया भित्ति तेथें उभ्या कांचनी पुत्रिका
तत्करीं रत्नदीपप्रभापुंज हे सूर्यसे भ्राजती ।
शतमित मणिचे शुभ स्तंभ मुक्ताफळीं निर्मिलीं दिव्य
विस्तीर्ण चंचद्वितानें गृहाभ्यंतरीं सर्वतः साजती ॥
व्यजनसहित चामरें स्वर्णदंडें नवीं दान्त पर्यंक शय्या
मृदु स्वच्छ ज्यांला पयोराशिचे फेन ही लाजती ।
कनकविरचितासनें जेंवि भद्रासनें निर्जरेंद्राचिया
मंदिरींच्या परी दासदासी सुरम्याकृती राजती ॥ १ ॥
या परि दिव्य समृद्धि विलोकुनि सुंदरि अंतरिं कौतुक झालें ।
कीं मज नित्य दरिद्रतमास कसें सहसा सुख वैभव आलें ॥
हा चि विचार मनीं करितां मग संशयजाळ पळांत पळालें ।
जो स्वजनामरवृक्षरमावरदर्शन भाग्यनिदान कळालें ॥ २ ॥
जन्मापासूनि मी दीन । वस्त्रें पात्रें वित्तें हीन ।
दुःखांभोधीमध्यें लीन । तापीं देहा दाहिलें ॥

---

३ पद्मजा=लक्ष्मी. ४ दिव्यस्त्रीप्रतिमद्युतिप्रविलसद्दासीसहस्रस्तुता=अप्सरांसारख्या कांतीनें शोभणाऱ्या हजारों दासींनीं स्तविलेली. ५ आली=सखी.

शुष्कपर्णांचें ही ओक । तेथें त्वां ही जाये तोक ।
चिंता नाना पीडा शोक । क्षुत्तृष्णा हें साहिलें ॥
व्यासत्राणीं जें जें वर्म । ते कांताचे सेवाधर्म ।
केले शृंगाराचें शर्म । माझें पायीं वाहिलें ॥
कांते अंतीं गेले कष्ट । आल्या त्वद्देहाला अष्ट ।
सिद्धी यांचा हेतु स्पष्ट । श्रीशाला जें पाहिलें ॥ ३ ॥
फार हि मानुनी अल्प । दिलें न करूनि जल्प ।
वदान्येंद्रभक्तकल्प । वृक्ष भला श्रीहरी ॥
पृथुकांची एक मुष्टी । भक्षितां चि जाणों पुष्टि ।
आधीं झाली मग तुष्टी । वाढली सीमेवरी ॥
दिलें फार ही आपण । तें भाविलें एक कण ।
मुष्टिपोहे कोटि मण । रत्नराशिचे शिरीं ॥
ऐसा कृष्ण माझा मित्र । दासभवतमोमित्र ।
त्याचें पवित्र चरित्र । किती वर्णूं सुंदरी ॥ ४ ॥

इति श्रीकांतपददर्शनमाहात्म्यवर्णनं

मैत्री सौहृद सख्य दास्य हरिचें जन्मांतरीं ही असो ।
कांते देह हि हा निरंतर सुखें तद्भक्तवृंदीं वसो ॥
टाकावे विषतीव्र सर्व विषय व्यामोहकारी खरे ।
गावें नित्य मुकुंद कृष्ण भगवन् विष्णो मुरारे हरे ॥ १ ॥
कांते श्रीपतिभक्तिवैभवसुख ब्रह्मादिकांला नसे ।
तें पावोनि अनित्य तुच्छ विषय स्वांतीं धरावे कसे ॥
या साठीं चतुरे मनप्रियकरे वीणातिमंजुस्वरे ।
गावें नित्य मुकुंद कृष्ण भगवन् विष्णो मुरारे हरे ॥ २ ॥
हे संपत्ति समर्पिली यदुवरें वात्सल्य केलें बरें ।
देवाधीशपदावरी चढविला हा दीन पीतांबरें ॥
हे श्रीकृष्ण दयासमुद्र वरद स्वामिन् विभो श्रीपते ।
शेषेंद्रादिशिरीं न जे मणि तुझ्या दासालयीं दीप ते ॥ ३ ॥
ज्या लोहासि शिवे सुवर्णपण दे त्याला असा जो खडा ।
कोणी स्पर्शमणी म्हणोनि भजती व्यामूढधी त्या जडा ॥

६ विणातिमंजुस्वरे=वीणेपासून अतिशय गोड आहे स्वर जीचा अशी. ७ पीतांबर=पिवळें आहे वस्त्र ज्याचें असा कृष्ण.

मुख्य स्पर्शमणी हरी च मजला तो स्पर्शला स्वांगणीं ।
झाली पर्णकुटी प्रिये सुरपुरीस्पर्धाकरी तत्क्षणीं ॥ ४ ॥
पाळाया स्वजनासि पाप करिती जे त्यांसि दंडावया ।
रक्षाया श्रुतिधर्ममार्ग अखिलाधर्मासि खंडावया ॥
लोकाधीश युगीं युगीं प्रकटतो दासासि मोदें वर ।
देतो मावर हा वर त्रिभुवनीं जाये तुझा देवर ॥ ५ ॥
याणें मातुळ कंस हंसगमने रंगीं स्वयें मारिला ।
[८]नक्रग्रस्तपदद्विपाख्य पशु ही धांवूनि संतारिला ॥
दास ज्ञानविहीन दीन हि परी सर्वात्मना रक्षणें ।
द्वेष्टा आप्त हि मारणें पण असा केला सरोजेक्षणें ॥ ६ ॥
तो माझें कुळ गोत्र नाम सदन ज्ञान क्रिया तत्फळ ।
तो बंधु स्वजन प्रभु प्रिय सखा साहाय्यकारी बळ ॥
तो दाता निधि तो गुरूप्रवर तो तो तात माता खरे ।
तो आयुः सुख दैव सात्वतपती जें सर्व कांहीं बरें ॥ ७ ॥
पद्मांचा तरणी[९] सखा विधु चकोरांचा झषांचें[१०] जळ ।
जाये नीरद[११] चातकाख्यखग[१२] जे त्यांचा सखा केवळ ॥
ऐसे दास हि साजती न पळ ही ज्याच्या पदाच्या नखा ।
तो आम्ही गुणहीन दीन जन जे त्यांचा मुरारी सखा ॥ ८ ॥
ऐसा श्रीपतिचा सखा द्विजवर श्रीदामनामा मुनी ।
स्त्रीपाशीं हरिचें चरित्र कथिता झाला गृहा येउनी ॥
तें कांहीं लव वर्णिलें निजहृदानंदें मयूरेश्वरें ।
श्रीमत्कृष्णकथासुधारसिकहृत्तोषाकरें सादरें ॥ ९ ॥

इति श्रीमत्पृथुकोपाख्याने श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते श्रीदामाब्राह्मणीसंवादे भक्त्युत्कर्षवर्णनम् ॥

## पृथुकोपाख्यान समाप्त.

---

८ नक्रग्रस्तद्विपदाख्यपशु=मगरानें गिळिला आहे पाय ज्याचा असा हत्ती या नांवचा पशु. ( गजेंद्र ) ९ तरणी=सूर्य. १० झष=मत्स्य. ११ नीरद=मेघ. १२ चातकाख्य खग=चातक नांवाचा पक्षी.

## मोरोपंतकृत पृथुकोपाख्यानांतील पद्यांचीं वृत्तें.

| पृष्ठांक | पद्यांक | वृत्तनाम |
|---|---|---|
| १८८ | १ | शालिनी. |
| ,, | २ | अपरवृच्छंदसिक. |
| ,, | ३–४ | उपजाति. |
| ,, | ५ | स्रग्धरा. |
| ,, | ६ | उपजाति. |
| ,, | ७ | हरनर्तन उर्फ विबुधप्रिया. |
| १८९ | १–२ | शिखरिणी. |
| ,, | ३ | मंदाक्रांता. |
| ,, | ४ | भुजंगप्रयात. |
| ,, | ५ | पृथ्वी |
| ,, | ६–८ | शार्दूलविक्रीडित. |
| १९० | ९–१० | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | १ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | २–३ | स्रग्धरा. |
| ,, | ४ | शार्दूलविक्रीडित. |
| १९१ | ५ | शालिनी |
| ,, | ६–८ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | ९ | मंदाक्रांता. |
| ,, | १ | पृथ्वी. |
| ,, | २ | मंदाक्रांता. |
| १९२ | ३ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | ४–५ | वसंततिलका. |
| ,, | ६ | शिखरिणी. |
| ,, | ७ | मालिनी. |
| ,, | ८ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | १–२ | स्रग्धरा. |
| १९३ | ३–४ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | ५–६ | स्रग्धरा. |
| ,, | ७–९ | शार्दूलविक्रीडित. |
| १९४ | १ | पुष्पिताग्रा. |
| ,, | २ | स्वागता. |
| ,, | ३ | मालिनी. |
| ,, | ४ | पुष्पिताग्रा. |
| १९४ | ५ | वसंततिलका. |
| ,, | ६ | पृथ्वी. |
| ,, | ७ | भुजंगप्रयात. |
| ,, | ८ | द्रुतविलंबित. |
| ,, | ९ | स्रग्धरा. |
| ,, | १ | अर्णदंडक. |
| १९५ | २ | औपच्छंदसिक. |
| ,, | ३ | शिखरिणी. |
| ,, | ४–९ | शार्दूलविक्रीडित. |
| १९६ | १० | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | १–२ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | ३ | द्रुतविलंबित. |
| ,, | ४–६ | शार्दूलविक्रीडित. |
| १९७ | ७ | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | ८ | स्रग्धरा. |
| ,, | ९–१० | शार्दूलविक्रीडित. |
| ,, | १ | जीमूतदंडक. |
| ,, | २ | मदिरा. |
| १९८ | ३–४ | घनाक्षरी. |
| ,, | १–३ | शार्दूलविक्रीडित. |
| १९९ | ४–९ | शार्दूलविक्रीडित. |

एकूण पद्यें.—८५.

## या आख्यानांतील प्रकरणानुक्रम.

| अनुक्रमांक. | प्रकरणनाम. | पद्यसंख्या. |
|---|---|---|
| १ | प्रश्न— | ७ |
| २ | द्वारावतीप्रवेश— | १० |
| ३ | भगवद्दर्शन— | ९ |
| ४ | गुरुमहात्म्य— | ८ |
| ५ | गुरुकुलनिवासवृत्तवर्णन— | ९ |
| ६ | उपायनस्वीकार— | ९ |
| ७ | भगवद्वात्सल्यवर्णन— | १० |
| ८ | स्वालयप्रवेश— | १० |
| ९ | श्रीकांतपददर्शनमहात्म्य— | ४ |
| १० | भक्त्युत्कर्ष— | ९ |

एकूण.— ८५.

या आख्यानांतील वृत्तसंख्या.

| वृत्तनाम | संख्या. | वृत्तनाम | संख्या. |
|---|---|---|---|
| शार्दूलविक्रीडित ... ... ... | ४१ | औपच्छंदासिक ... ... ... | २ |
| स्रग्धरा ... ... ... ... | ९ | भुजंगप्रयात ... ... ... | २ |
| शिखरिणी ... ... ... ... | ४ | घनाक्षरी ... ... ... ... | २ |
| मालिनी ... ... ... ... | ३ | अर्णदंडक ... ... ... ... | १ |
| उपजाति ... ... ... ... | ३ | जीमूतदंडक ... ... ... | १ |
| मंदाक्रांता ... ... ... ... | ३ | शालिनी ... ... ... ... | १ |
| पृथ्वी ... ... ... ... | ३ | स्वागता ... ... ... ... | १ |
| वसंततिलका ... ... ... | ३ | मदिरा ... ... ... ... | १ |
| पुष्पिताग्रा ... ... ... ... | २ | हरुनर्तन ऊर्फ विबुधप्रिया ... ... | १ |
| द्रुतविलंबित... ... ... ... | २ | एकूण ... ... ... ... | ८५ |

---

## मोरोपंतकृत-तुकारामस्तुति.

विष्णु-यशाचें घाली द्याया अमृता त्रपा दुकान तुका ।
जरि यासि न देवाशीं श्रीरामाशीं हि पादुका न तुका ॥ १ ॥
नाइक न गा म्हणे तो घातुक चि दिसो अघातुकावाणी ।
प्रेमें ध्यावा गावा भस्म कराया अघां तुका वाणी ॥ २ ॥
नरकांतुनि काढितसे काढुनि बहु पतित पातुकावाणी ।
तो गुरु कसा नव्हे हो ज्ञानांबुधि अतितपा तुका वाणी ॥ ३ ॥
भगवान् स्वभुजासि म्हणे तुजशीं तारुनि जना तुको बाहो ।
नारद मुनिसा सुयशें बहुमत सज्जनमना तुकोबा हो ॥ ४ ॥
साधु म्हणेल मन स्मृति हरिची तैशी न टाकु तुकयाची ।
कीं औदार्य-घनांची ज्यांप्रति पावुनि घटा कुतुक याची ॥ ५ ॥
दूत यमासि कथिति कीं निर्मुनि हरिभजन-सेतु कागाळी ।
ऐकेना बळ इतरा धर्माचें तिळ नसे तुका गाळी ॥ ६ ॥
मेघें न तर्पिला तो सुतृषित चातक करील आ त्रितुका ।
जो जो मुमुक्षु त्यातें त्यातें करितो सुतृप्त आजि तुका ॥ ७ ॥
शरणागतें बहातां वेंचिल देऊनि ओ तुका मांस ।
येइल पर साधु तसा व्याघ्रापरि काय ओतु कामास ॥ ८ ॥

---

१अमृत-मोक्ष, देवांचें पेय. २ त्रपा=लाज. ३ तुका=तोला. ४ अघातुकावाणी=घात न करणाऱ्या सारखा. ५ अघ=पाप. ६ पतित=पापी. ७ अंबुधि=सागर. ८अतितपा=मोठा तपस्वी. ९ बाहो=हे भुजा. १० घटा=समूह. ११ कुतुक=कौतुक. १२ मुमुक्षु=मोक्षेच्छु. १३ मांस=शरीराचें मांस. १४ ओतु=मांजर.

[illegible]ता पळांत पुण्यें जरि म्हणता काय शक्र[१५] तुकया धू ।
वाटे याची माता जेंवि करि तेंवि न क्रतु[१६] कयाधू[१७] ॥ ९ ॥
भक्ति-रस चि मूर्त असा करिति बृहस्पति शत-क्रतु[१८] यास ।
कीं व[illegible]े भगवद्यश सुरभी-पय[१९] अमृत[२०] तक्र[२१] तुकयास ॥ १० ॥
विमद[२२] विराग[२३] विमत्सर[२४] तृप्ति सदा सुगुण हे तुकारामीं ।
ते कैंचे स्वर्गींच्या विविध-विषय-लाभ-हेतुकारामीं[२५] ॥ ११ ॥
वाटे बहु मानी[illegible] भागवत-शिरोवतंसें[२६] शुक यातें ।
कीं जें अनुदिन रुचलें त्या सद्रसिका तसें चि तुकयातें ॥ १२ ॥
आश्रय बिभीषणातें श्रीराम कु-संग-हातु-कामातें[२७] ।
साधु म्हणे व्हावा या मोह-त्यागीं हि हा तुका मातें ॥ १३ ॥
साधु-सभा-प्राण-प्रिय ज्याचे निर्दोष युक्तिमदभंग[२८] ।
भगवज्जनेतराचा[२९] करिती ज्यांतील युक्ति मद-भंग[३०] ॥ १४ ॥
ज्याचे अभंग लागति खळ-हृदया जेंवि बाण रामाचे ।
ज्या पर-वाद न मोहिति शर जैसे ईश्वरासि कामाचे ॥ १५ ॥
स्वात्मानुभव पहातां तुकया केवळ सखा चि जनकाचा[३१] ।
वैराग्यें डोलविला माथा जेणें मुनींद्र सनकाचा ॥ १६ ॥
वाटे भगवत्कीर्त्तन-रुचिनें याहून आन नारद न ।
सद्वृंदीं[३२] शोभविती ज्याचे गुण जेंवि आननीं[३३] रदन[३४] ॥ १७ ॥
ज्याच्या सदभंगातें सेवी जन जेंवि बाल आम्यांतें[३५] ।
घनसें[३६] म्हणे भरावें सुरसें जें मुख करील आ म्यां तें ॥ १८ ॥
ज्याच्या होय अभंगां-वांचुनि होऊनि हरिकथा नाहीं ।
श्रोत्यांसि अभंगांहीं ती दे जाशि माय [३७]हरिख यानांहीं ॥ १९ ॥
नाम्याच्या तुकयाच्या गाइल शुक कीं महातपा व्यास ।
रामाच्या कृष्णाच्या कवण न जोडील हात पाव्यास ॥ २० ॥
शोभे कथा अभंगा पावुनियां जेंवि दीपका शाला ।
सदभंग कथेंत नको तरि मग शालेंत दीप काशाला ॥ २१ ॥

---

१५ शक्र=इंद्र. १६ क्रतु=यज्ञ. १७ कयाधू=प्रऱ्हाद-माता. १८ शत-क्रतु=इंद्र. १९ सुरभी-पय=कामधेनूचें दूध. २० अमृत=देवांचें पेय. २१ तक्र=ताक. २२ विमद=गर्व-रहित. २३ विराग=रजोगुणरहित २४ विमत्सर=मत्सर-रहित. २५ आराम=बाग. २६ अवतंस=तुरा, भूषण. २७ हातु-काम=सोडूं इच्छिणारा. २८ युक्तिमदभंग=युक्तिमत्+अभंग २९ भगवज्जनेतर=भगवज्जन+इतर=भगवद्भक्त नव्हेत असे. ३० मदभंग=गर्वनाश. ३१ जनक=मिथिलेचा राजा. ३२ वृंद=समूह. ३३ आनन=मुख. ३४ रदन=दांत. ३५ आमा=स्तन. ३६ घन=मेघ. १७ हरिख=हर्ष.

सुज्ञ शिवाजी राजा न म्हणे तुकयासि काय साधु निका ।
तत्पंडित-प्रधाना न कळे गुण समज फार आधुनिका[38] ॥ २२ ॥
भक्ति-रसिक शूद्रकवन म्हणवूनि कशास नाक वाहेल ।
भगवत्पद-प्रसादा बुध जेंवि तशास नाक वाहेल ॥ २३ ॥
केला चि गुरु तुकोबा जरि अशुचि पशु तथापि शुनकानें[39] ।
अधम बद्धमना न म्हणे परिसुनि हि अशा कथा पिशुनें[40] कानें ॥ २४ ॥
प्रभु आपण शत[41]-मखसा सदभंग प्रकट जो करी घनसे ।
नाचति मयूरसे हरि-भक्त म्हणे ज्यांत शोक-रीघ नसे ॥ २५ ॥
श्रीराम तसा गेला वैकुंठाला सकाय[42] हा कांहीं ।
महिमा न भीरु करणें दुष्टांच्या यास काय हाकाहीं ॥ २६ ॥
गडबड बडबड करिती न च येऊं दे तुका परि समोर ।
प्रभुचा प्रसाद अद्भुत बहु-मत केला शुकापरिस[43] मोरें[44] ॥ २७ ॥
तूं काय गरुड कीं गे खळ-जिव्हे मक्षिके तुका वाणी ।
तेथें लक्ष्मी राबे राहे ज्या पक्षि-केतु[45] कावाणीं[46] ॥ २८ ॥
जो कुलज हि अभिमानी ज्याचा प्रद्वेष या तुकारामीं ।
म्हणतों तद्विद्येतें सीता तन्मतिस यातु[47]-कारा मीं ॥ २९ ॥
भगवद्भक्ति कराया बहुजड जीवांसि जो तुका शिकवी ।
त्याच्या दुसरा धरणी-वरि येइल कोण हो तुकासि कवी ॥ ३० ॥
परिस अयाचा[48] उडवी सद्भाव[49] तसा चि भक्त यातीस ।
रामात्मजें मयूरें आर्या रचिल्या सदर्थ या तीस ॥ ३१ ॥

इति श्रीरामनंदनमयूर-विरचिता श्रीमत्तुकारामस्तुतिः समाप्ता.

---

३८ आधुनिका=आलिकडच्यास. ३९ शुनक=कुत्रा. ४० पिशुन=चहाड, नीच. ४१ शतमख=इंद्र. ४२ सकाय=सशरीर. ४३ शुक=शुकाचार्य-पक्षी पोपट. ४४ मोर=मोरोपंत-पक्षी मोर पांखरूं. ४५ पक्षिकेतु=गरुडध्वज विष्णु. ४६ कावाण=लग्नसमयीं सामानसुमान ठेवण्याकारितां मंडप वगैरे घालून जी तुर्तातूर्त कोठडी तयार करतात ती. ४७ यातु-कारा=राक्षसाची ( रावणाची) बंदीशाळा (कारा.) ४८ अयाचा=लोखंडाचा. ४९ सद्भाव=अस्तित्व.

## मोरोपंती कविता भाग २ रा. आणखी टीपा.

- ३. ओ० २. स्वपत्या=सु+अपत्या=उत्तम आहेत अपत्यें जीचीं अशी.
- ६. „ ११. दंडक=हा शब्द घालून कवीनें या श्लोकाचें वृत्त "दंडक" आहे असें ही सुचविलें आहे.

पृ०. १६. ओ० ११. कौशिकीं—घुबडांनीं.
,, १८. ,, ९. तातपूतें=बाप दशरथ याचे नगरीस. ( पू=नगरी ).
,, १८. ,, १ सत्वक्षय-गर्भघात.
,, ३२. ,, १२. भीम=भयंकर.
,, ३३. ,, ६. दिव्यलीलाकरें=या शब्दानें या दुसऱ्या श्लोकाचें वृत्त लीलाकर दंडक आहे असेंही दर्शविलें आहे.
,, ३३ ,, १८. खरासी=तीक्ष्ण तरवार.
,, ३८. ,, १३. शार्दूलविक्रीडित=या शब्दानें १० व्या श्लोकाचें वृत्त शार्दूलविक्रीडित आहे असेंही कवीनें दर्शविलें आहे.
,, ४०. ,, १०. रक्तस्रवंती=रक्ताच्या नद्या.
,, ४१. ,, २७. आश्रयाश=अग्नि.
,, ४२. ,, ७. कोलें=या ठिकाणीं "कोल्हे" असाहि पाठ असण्याचा संभव दिसतो.
,, ४९. ,, १६. क्षतजा=रक्ताची नदी.
,, ४९ ,, १६. क्षतज=रक्त.
,, ५० ,, १८-१९. यांत पहिला व दुसरा आणि तिसरा व चवथा या चरणांचे अंतीं यमक आहे.
,, ५१. ,, २३.—विनाकरा हा अपपाठ दिसतो.
,, ५४. पद्य.४४. यांत पहिला व दुसरा आणि तिसरा व चवथा या चरणांचे अंतीं यमक आहे.
,, ५४. पद्य. ४०. ही गीति नव्हे. खरीखुरी आर्या आहे. म्हणजे इच्या प्रथमार्द्धांत तीस मात्रा व दुसऱ्या अर्धांत २७ मात्रा आहेत. या पृष्ठांतील टीप ६८ वी रद्द समजावी.
पृ० ६०. ओ० १६. जगत्संभवाद्य=जगत् + संभव+आद्य=जगत्संभव म्ह० ब्रह्मा त्याचा आद्य म्ह० बाप राम. ७१ टीप रद्द समजावी.
,, ७३, पद्य ९३. या पद्याचें वृत्त तोटक आहे.
पृ० ७५, पद्य ३२. या पद्याचेंही वृत्त तोटक आहे.
,, ८०. ,, ६४. या पद्याचें वृत्त अर्णदंडक. यांत दोन नगण व आठ रगण मिळून प्रत्येक चरणांत तीस अक्षरें असतात.
पृ० ८५. पद्य ४९. या पद्याचें वृत्त तोटक आहे. याचे प्रत्येक चरणांत चार सगण मिळून एकंदर बारा अक्षरें असतात.
पृ० ८७. यांत "सुरामायण" म्हणून जें लिहिलें आहे तेथें "सूराराामायण" पाहिजे. हिंदुस्थानींत जसें दोहरावृत्त आहे त्याप्रमाणें सूरा म्हणून वृत्त आहे अशा वृत्तांत लिहिलेल्या पद्याच्या प्रत्येक चरणांत त, म, य, र, त असे पांच गण असून शेवटीं एक अक्षर गुरु असतें. म्हणून हें सोळा अक्षरी चरणाचें वृत्त होय. या वृत्तांत लिहिलेल्या हिंदुस्थानी कवितेचे दोन चरण एथें दाखल करितों. यावरून याचें स्वरूप व चाल लक्षांत येईल.

काजी किताबत्खोलकर् इन्साफ कर्के और वा ।

अपने इलं जानो न ही काजी हुवा तो क्या हुवा ।।

पृ० ८८. ओ०. यांत सौम्य रामायणाचें नांव आहे. हें रामायण सौम्या नांवाचे वृत्तांत लिहिलें आहे म्हणून यास सौम्य रामायण म्हटलें आहे. या वृत्ताच्या पूर्वार्द्धात सोळा गुरु अक्षरें असतात व उत्तरार्द्धात ३२ लघु अक्षरें असतात. पिंगलकृत छंदशास्त्रावर टीका लिहिणारा हलायुध यानें या वृत्ताचें उदाहरण हें दिलें आहे:—

सौम्यां दृष्टिं देहि स्नेहाद् देहेस्माकं मानं मुक्त्वा ॥
शशधरमुखि मुखमुपनय मम हृदि मनसिजरुजमपहर लघुतरमिह ॥१॥

पृ० ९५. ओ० २४. स्वयंभूसुत=जांबवान् हा रीस ( ऋक्ष ) होता. हा ब्रह्मदेवाच्या जांभईपासून उत्पन्न झाला होता.

,, ९५. ,, २१. निशाकृत्-हें मुनीचें नांव आहे.

,, ९६. ,, ६. ऋक्षप=जांबवान्.

,, ९८. ,, ११. नळ=हा विश्वकर्म्याचा अंश होता.

,, ९१. ,, २२. त्रिदश=तीन आहेत दसक ज्यांच्या संख्येंत ते त्रिदश. या रीतीनें विग्रह केला म्हणजे तीस पासून एकुणचाळीसपर्यंत अंकांचा बोध होतो. परंतु आठ वसु, बारा आदित्य, अकरा रुद्र, दोन आश्विन मिळून तेहतीस देव असल्यामुळें वरच्या विग्रहावरून तेहतीस देव असा अर्थ समजावयाचा:—

अदित्यां जज्ञिरे देवास्त्रयस्त्रिंशदरिंदम ॥ १४ ॥
आदित्या वसवो रुद्रा अश्विनौ च परंतप ॥ १५ ॥

सर्ग १४ अरण्यकांड वाल्मीकिरामायण.

,, १०२ ,, २. सरयु=हिला हल्लीं गोग्रा नदी असें नांव आहे. ही भागीरथीस मिळते.

,, १०४ ,, २२. चित्रकूट=यमुनेचे दक्षिणेस प्रयागापासून दहा कोसांवर हा पर्वत आहे:-

दशक्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन् निवत्स्यसि ।
महर्षिसेवितः पुण्यः पर्वतः शुभदर्शनः ॥ २८ ॥
चित्रकूट इति ख्यातो गंधमादनसंनिभः ॥ २९ ॥

वाल्मीकिरामायण-अयोध्याकांड सर्ग ५४.

,, १०४ ,, २३. घटजप्रमुख=अत्रि, शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्यभ्राता, व अगस्त्य.

,, १०५ ,, ४. पंचवटी=दहा वर्षे वनवासाचीं संपल्यावर राम पंचवटीस गेले.

तत्र संवसतस्तस्य मुनीनामाश्रमेषु वै ॥ २६ ॥
रमतश्चानुकूल्येन ययुः संवत्सरा दश ॥ २७ ॥

सर्ग ११ अरण्यकांड वा० रा०.

तमाश्रमं पंचवटीं जग्मतुः सह सीतया २४.

सर्ग १३ अरण्यकांड. वा० रा०.

पृ० १०६ ओ० १७. जटायु-या गृध्राचे पूर्वज पुढील वंशावळींत दिले आहेत:—




पृ० १०९. ओ० १७. परमायाकाय=परमा या काय=या परमा यश करावया काय धरणें पडे-या उत्तम ईश्वरास यश मिळविण्याकरितां शरीर ( काय ) धरावें लागलें.

,, १०९. ,, ११. नाकीश=नाकि+ईश=देवांचा ( नाकि ) स्वामी इंद्र. टीप ७१ रद्द समजावी.

,, ११२. ,, १२. सावित्री, द्युमत्सेन, व सत्यवान हीं दशरथा पूर्वीचीं असें वाल्मीकि रामायणाच्या पुढील वचनावरून होतें:—

द्युमत्सेनसुतं वीरं सत्यवंतमनुव्रताम् ।
सावित्रीमिव मां विद्धि त्वमात्मवशवर्तिनीम् ॥ ६ ॥
सर्ग ३० अयोध्याकांड.

सावित्री पतिशुश्रूषां कृत्वा स्वर्गे महीयते ॥ १० ॥
सर्ग ११८ अयोध्या कांड.

पृ० ११२. ओ० १०. उजविलें-कन्यकेला कां न उजाविलें=कन्येचें लग्न कां नाहीं केलें.

,, ११६. ,, ११. पुरुष=मनुष्य. पुढील ओळींतील पुरुष शब्दाचा अर्थ आत्मा.

,, ११७, ,, २, मदालसा=या स्त्रीचें आख्यान पंतानीं सविस्तर लिहिलें आहे; हें मूळ आख्यान मार्कंडेय पुराणांत आहे.

पृ० १२२ ओ० ८, श्री=एथें स्त्री असा पाठ असावा.

,, १२५ ,, ७. विश्वे-वि+श्वे -पक्षी व कुतरे.

,, १२६, ,, ११ जडात्मा=जड=जल; म्हणून जडात्मा-जलमय असा ( मेघ ), प्रा-

सयमकादि चमत्काराकरितां ड व ल यांचा अभेद कवि मानितात. पक्षीं जडात्मा=मूर्ख.

पृ० १२६. ओ० ११. पंकहेतु–चिखल उत्पन्न करणारा, पक्षीं पाप उत्पन्न करणारा.

,, १३७. ,, २. अंबरीष–हा दशरथाचे पणज्याचा आजा होता. हा ब्रह्मदेवापासून ३४ वा पुरुष व दशरथ ३९ वा पुरुष होता. सूर्यापासून ३१ वा पुरुष हा होता. वाल्मीकी रामायण बालकांड सर्ग ७० श्लोक १९–४५. पहा.

पृ० १३७. ओ० ११. यमुनातीर्थ=यावरून अंबरीषाची राजधानी यमुनेवर होती असें वाटतें. अथवा सूर्यवंशी राजांची अयोध्या राजधानी ज्या सरयू नदीवर होती त्या नदीच्या एका तीर्थाचें हें नांव असावें.

पृ० १४० ओ० १०. दोहावृत्त=या वृत्ताच्या प्रत्येक अर्धांत २४ मात्रा असतात. पहिल्या व तिसऱ्या चरणांत तेरा आणि दुसऱ्या व चवथ्या चरणांत ११ मात्रा असावयाच्या.

पृ० १४१ ओ० २. पंचाशती=पन्नास पद्यांचा समूह. सप्तशती, पंचवटी वगैरे शब्द असेच झाले आहेत.

पृ० १५१. ,, ११. अस्तू=असो.

,, १५२. ,, ३. गरळा=विड्याचीं पानें चावून त्यांचा जो रस औषधादाखल मुलांस देतात ती गरळा.

,, १५२. ,, २५. पत्र=पंख

,, १५४. ,, ८. कल्प=सदृश.

,, १५६. ,, २. तनु=पातळ, तलम.

,, १५९. ,, २१. शालावृक=कोल्हा; वानर; मांजर; कुत्रा.

पृ० १६५ ओ० ९ मधुप-वनजासम=भ्रमर व कमल ( वनज ) यां सारखा.

,, १६५ ,, १४ लहरी तरला–चंचल ( तरला ) लाटा.

,, १६५ ,, १९ कीरमणी–उत्तम पोपट.

,, १६६ ,, ४ पीडुनि घननादानें=मोठ्या आरोळीनें पीडा देऊन.

,, १६६ ,, १९ नखसंक्रांति=तेजस्वी नखांत प्रतिबिंब पडणें.

,, १६६ ,, २४ दर=भीति.

,, १६७ ,, ६ किशोर–बालक.

,, १६७ ,, २० पलाश–राक्षस.

,, १६७ ,, २७ होलीकालीला=होळीची क्रीडा.

,, १७० ,, २२ मया=मय नामक राक्षसाला.

,, १७३ ,, ११ एणें=येणें करून.

,, १७३ ,, १२ एणें=हरिणानें ( एण=हरिण ).

पृ० १७६ ओ० १६ प्राऱ्हादि=बळी (प्रऱ्हादाचा पुत्र प्राऱ्हाद=विरोचन. प्राऱ्हादाचा पुत्र=प्राऱ्हादि)

पृ० १७८ ओ० २७ करका=पावसाच्या पाण्याच्या गारा.

,, १८१ ,, २७ दाक्षिण्य=कृपा.

,, १९० ,, १८ स्थानस्रस्तोत्तरीयालकमुकुटपटस्रक्कारुण्यसिंधु= स्थान+स्रस्त+उत्तरीय+अलक+मुकुट+पट+स्रक्+कारुण्य+सिंधु=स्थानापासून भ्रष्ट झालीं आहेत उपवस्त्र, केश, मुकुट, वस्त्र, व माळ ज्याचीं असा कृपासागर.

पृ० १९१ ओ० ८ हलभृत्पूजार्ह=बलरामास मिळणाऱ्या मानास योग्य.

,, १९३ ,, ५ वन=उदक.

,, १९३ ,, २८ लोकविडंबन=लोकांचें अनुकरण.

समाप्त.

---

# मोरोपंती कविता भाग-२.

## शुद्धिपत्र.

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | ३ | गीर्देवी | गीर्देवी |
| ,, | २७ | भूसूता | भूसुता |
| २ | ५ | असे | असें |
| ,, | १४ | कौशल्या | कौसल्या. 'जेथें जेथें कौशल्या असेल तेथें तेथें कौसल्या वाचावें) |
| ,, | २० | कसे | कसें |
| ,, | २१ | कसे | कसें |
| ,, | २४ | ४० श्वश्रूतें | ४० श्वश्रूतें |
| ,, | २४ | त्व | तंव |
| ,, | २६ | इद्राजिताचा | इंद्रजिताचा |
| ३ | १० | वासिष्ठें | वसिष्ठें |
| ,, | २२ | त्रिलोकी | त्रिलोकीं |
| ४ | ८ | स्वप्नांत | स्वप्नास |
| ,, | ९ | गुरुपाशीं | गुरूपाशीं |
| ,, | १२ | कोमेलेसें | कोमेलेसे |
| ,, | १४ | मी | मीं |
| ,, | २१ | ७४ ७५ इहामूत्र | ७४ ७५ इहामुत्र |
| ,, | २८ | टीपेचा अंक ४६ | ६४ |
| ५ | ५ | दशनवदनोभ | दशवदनेभ |
| ,, | १५ | केलीगृहांतरीं | केलिगृहांतरीं |
| ,, | २७ | आहृत | आहेत |
| ६ | २ | ९७ सध्वान | ९७ सुध्वान |
| ,, | ३० | वर्ष | वर्षे |
| ७ | ४ | नमुनीं | नमुनी |
| ,, | १३ | म्हणवुानी | म्हणवुनी |
| ,, | १८ | ३० दुरितार्णवीं | ४० दुरितार्णवीं |
| ,, | २१ | भूपविलें | भूपविले |
| ,, | २३ | ५४ तिमिररावे | ५४ तिमिररवे |
| ,, | २८ | दष्टाधरचावीत | दष्टाधर=चावीत |
| ८ | ५ | ७८ मुखें | ८८ मुखें |

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | १७ | चित्तातें | चित्तांतें |
| ,, | २४ | तिघातें | तिघांतें |
| ,, | ३० | आस्मु | आस्य |
| ९ | २४ | कित्येकांही | कित्येकांहीं |
| ,, | ३२ | स्त्री | स्त्री |
| १० | १० | क्लेश मूर्छेसि | क्लेशमूर्छेसि |
| ,, | १४ | पति | पती |
| १० | १६ | हे | ही |
| ,, | २५ | नयनाहीं | नयनांहीं |
| ,, | २८ | शरद्द्तु | शरद्वतु |
| ,, | ३० | लेरवा | लेखा |
| ,, | ३१ | तेत्रकमल | नेत्रकमल |
| ,, | ३२ | लाक | लोक |
| ११ | ९ | पदांबुजाला | ७९ पदांबुजाला |
| ,, | १२ | राक्षसांतदा | राक्षसान्तदा |
| ,, | १७ | जाहालासि | जाहलासि. |
| ,, | १८ | नेतीं | नेत |
| ,, | २० | वृद्धर्थ | वृद्ध्यर्थे |
| ,, | ३२ | द्विरद | द्विरद |
| १२ | ९ | महागमनें | अत्र आगमनें. |
| ,, | १७ | ओष्ट | ओष्ठ |
| ,, | २० | स्वर्णाजलिहीं | स्वर्णाजलिंहीं |
| ,, | ,, | वागस्मृतां | वागमृता |
| ,, | २५ | सोनिया | सोनियाच्या |
| १३ | २९ | नगरांच्या | नगराच्या |
| १५ | ३१ | सारखें | सारखे |
| १६ | ७ | तोषांमृतातें | तोषामृतातें |
| ,, | ११ | लाक्षिजे तो | लाक्षिजेतो |
| ,, | ,, | कौशिकी. | कौशिकीं. |
| ,, | १५ | लक्ष्मी | लक्ष्मीं |
| ,, | १८ | मानी | मानीं |
| १७ | ७ | निघूनियां | जाऊनियां |
| ,, | २६ | ४२ | ४३ |
| १८ | २ | द्विजकर सख्या | द्विजवरसखा |

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | २६ | कल | कलश |
| १९ | १ | ह्योऊनियां | ह्योउनियां |
| ,, | १४ | सरवाजें | सखा जें |
| ,, | २१ | सिचन | सिंचन |
| २० | २० | रघुकुलतिळक | रघुकुलतिलका |
| ,, | २७ | लपनें | लपन |
| ,, | २१ | बम्ह्या | ब्रह्मया |
| २१ | ७ | करूनि | करुनि |
| ,, | २४ | गोक्षूर | गोक्षुर |
| ,, | २५ | शिवति | शिवती |
| ,, | २६ | भ्रूणहत्या | भ्रूणहत्या |
| ,, | ३५ | गोक्षूर | गोक्षुर |
| २३ | १६ | प्रसूति | प्रसूती |
| ,, | ,, | भृतनये | भूतनये |
| ,, | २७ | द्विजवधुसूता | द्विजवधूसुता |
| २४ | ७ | दुःखभीति समयावरि क्षिति क्षितिकन्यके | दुःखभीतिस यावरि क्षितिकन्यके |
| ,, | १० | पावूनि | पावुनि. |
| ,, | १४ | सिंपी | शिंपी. |
| ,, | ,, | तमसा | पयसा |
| २५ | २२ | तनूपासून | तनुपासून |
| ,, | २९ | ( ब्राम्हण ) | ( ब्राह्मण ) |
| २६ | २९ | तनूत्राण | तनुत्राण |
| २७ | १२ | शत्रूघ्न | शत्रुघ्न |
| ,, | १३ | पीनमेरी | पीनभेरी |
| २८ | ६ | मखवाजिहर | मखवाजिहारि |
| ,, | ७ | भसितें बहु. | भसितें चि जो बहु |
| ,, | ९ | बहु | बाहू |
| | | २७ | २८ |
| ,, | १२ | वल्मीक | वल्मीक |
| ,, | २२ | गजघट घंठा | गजघटाघंटा |
| ,, | २२ | न्नूपुरें | नूपुरें |
| ३१ | ७ | करूनि | करुनि |
| ३३ | ९ | परि निषेधासि सोडुनियां. | परि त्यासि सोडूनियां. |
| ,, | १६ | तशी | तशि |
| ,, | ३० | जखभी | जखमी |
| ३४ | ९ | तधीं | कधीं |
| | | ३१ | ३१ |
| ,, | १३ | मृष्ट मल्ली | मृष्ट मल्ली |
| ,, | १७ | १२ | १५ |

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | २२ | हत्करपल्लवें | हृत्करपल्लवें |
| ३५ | ३० | कटाश | कटाक्ष. |
| ३६ | ३० | अगत्राण | अंगत्राण |
| ३७ | १२ | करूनि | करुनि |
| ३८ | ३ | नमुनि म्हणाति | ह्मणति नमूनि |
| ,, | ७ | हृप | हय |
| ,, | १० | जिंकुनिया | जिंकुनियां |
| ,, | १५ | कसें | कसे |
| ,, | २४ | मनोरम ॥ | मनोरम ॥ १३ ॥ |
| ,, | २६ | १३ १४ | ( पुढें अध्यायाचे शेवटपर्यंत श्लोकाचा अंक असाच चढता पाहिजे. ) |
| ,, | ३१ | पम | यम |
| ४० | ३ | काळग्रह | काळगृह |
| ४० | ३० | घनरवह | घनरवहा |
| ४१ | १० | घेऊनि | घेउनि |
| ,, | १३ | माया | माथां |
| ,, | २४ | करुनियां | धरुनियां |
| ,, | २७ | विकरी | चि करी |
| ४२ | ९ | भावे | भोंवे |
| ४५ | १५ | ताडिलें गजकरीं | ताडिले गजकरी |
| ५१ | २ | सप्त सुब्रेंदें | सप्ताशुगांतें |
| ,, | ४ | सहस्रें | सहस्रें |
| ५३ | ३१ | धवलिततांबर | धवलितांबर |
| ५४ | ७ | काळारी | काळारि |
| ५६ | १६ | निर्धन | निर्धन |
| ५९ | २८ | तनुजवचनमनें | तनुवचनमनें |
| ,, | ३३ | मैथील | मैथिल |
| ६० | १८ | अवभृथस्नान | अवभृतस्नात |
| ,, | ३१ | यज्ञसमाप्तिदर्शक | यज्ञसमाप्ति |
| ७४ | ७ | ऐकूनि | ऐकुनि |
| ,, | ९ | माजे | माजें |
| ,, | १२ | क्षपाकरामा | क्षपाकराभा |
| ७५ | १९ | देऊनि | देउनि |
| ७७ | १८ | सेवुनि | सेवुनी |
| ८२ | २५ | शन | शमन |
| ८३ | १९ | करि | कारें |

| ओळ | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|
| २७ | ज्यापासून | जी पासून |
| १६ | अनुष्टुभ् (आर्या) | अनुष्टुभ् |
| १९ | लक्ष्मी | सूरा |
| ,, | नर्दटक | नर्दटक ऊर्फ नर्कुटक |
| २१ | अश्वधाटी व अमृतध्वनी | अश्वधाटी ऊर्फ अमृतध्वनी |
| २४ | एकाचें वृत्त समजत नाहीं | एकाचें सौम्या वृत्त आहे. |
| ११ | लक्ष्मी | सूरा |
| १० | ( कळत नाहीं ) | सौम्या वृत्त |
| ८ | श्रीपद | श्रीप्रद |
| १८ | देवराजनिहतें | देवराजनिहितें |
| १६ | शालद्रु | तालद्रु |
| ३२ | स्वयभूंसूत | स्वयंभूसुत |
| १६ | बरी | वरी |
| ३० | ( सायकाळ ) | ( सायंकाळ ) |
| ३ | हरोनि | हरुनि |
| ३१ | सुतर | सुतरल |
| ३० | मेघध्वान | घनध्वान |
| १४ | हाय | होय |
| ३० | पृत | मृत |
| २ | कटि | कीट |
| २७ | शार्दुल | शार्दूल |
| २३ | पायासून | पायापासून |
| ३ | भीरु वनांत | भीरु मनांत |
| ६ | सांग | सांगे |
| १६ | क्षणमुदित | रणमुदित |
| २५ | अटीस | अरीस |
| ११ | सागोनि | सांगोनि |
| २४ | योग्य सती | योग्य पती |
| २५ | तूं पूर्ण | तूं तूर्ण |
| ३० | तपोधना | तपोधनां |
| ६ | मग न | गमन |
| २३ | भारी | भरी |
| १४ | तैसें | जैसें |
| ३ | हां | हा |
| १५ | याला | यांला |
| २८ | दिसतो | दिसते |
| २१ | कां नरकपथ | कां न नरकपथ |
| २ | काशी तें | काशीतें |

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | १ | विकाशीतें | विकाशी तें |
| ,, | १५ | तर्पा ज्ञान | अर्पा ज्ञान |
| १३२ | १३ | नरा हो | न राहो |
| १३३ | २३ | चांगदेव | चांगदेवें |
| १३३ | ३२ | तापीतीरीं | गोदातीरीं |
| १३४ | २० | तर | तरी |
| १३५ | २६ | म्हणाते | म्हणती |
| १३७ | ७ | द्विदशिया | द्वादशि या |
| ,, | १३ | समयंलघेन | समयलंघनें |
| ,, | ३० | प्रभुच्या | प्रभूच्या |
| १३८ | २४ | वरिती | वरि ती |
| ,, | २६ | शर शरणागतं | शरणागतं |
| १४० | १२ | पुंडरीकाचा | पुंडरिकाचा |
| ,, | १५ | त्यासि | त्यासी |
| ,, | २६ | चाहिलें | वाहिलें |
| ,, | ३१ | ज्याचें | ज्यांचें |
| १४१ | २८ | सवेचे | सवेचें |
| १४२ | ४ | करि | हरि |
| ,, | १३ | विसरें | विसरे |
| ,, | २८ | करि=हत्ती | हरि=इंद्र |
| १४३ | १४ | पावे | पावें |
| १४४ | ११ | प्रेममूर्छि | प्रेममूर्छित |
| ,, | १३ | नखोटा | न खोटा |
| ,, | १४ | दुःख दे | दुःख चि दे |
| १४७ | २८ | बुडी मारा | बुडालेली, निमग्न |
| १४९ | ११ | आहें | आहे |
| ,, | १२ | उद्धरिसि | उद्धरिसी |
| १५३ | ९ | धरुनि | धरूनि |
| १५५ | ७ | हो ॥ | हे ॥ ६८ ॥ |
| ,, | २६ | म्हणूनि | म्हणुनि |
| १५८ | २६ | सुरसा रे | सुर सारे |
| ,, | २७ | सुर सारे | सुरसा रे |
| १५९ | ९ | कोणी | कोणीं |
| ,, | १७ | सुररिपुंसि | सुररिपूंसि |
| १६२ | १ | तातपाद | तातपदा |
| ,, | ४ | पंक्तिस्यदनं | पंक्तिस्यंदन |
| ,, | ३२ | मीति | भीति |
| १६३ | ७ | रावण स्वसा भुलवाया | रावण स्वसा भुल वायां |

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | ८ | गणूनि | गणुनि |
| ,, | १३ | मृषा भिदा[५७] | मृषाभिधा[५७] |
| ,, | २८ | पादर्जे | पादरजें |
| १६४ | २ | लावि | लावी |
| ,, | २७ | का | कां |
| १६५ | ४ | संज्वरतनुच्या | सज्वरतनुच्या |
| ,, | ९ | मधुपवन ज्या | मधुप-वनजा |
| ,, | १० | विपदबाधिला | विपदवाधिला |
| ,, | १२ | दयानदीन पहा | दयानदीनप हा |
| १६६ | १५ | तच्चरणा | तच्चरणां |
| १६७ | २७ | होलाकालीला | होलीकालीला |
| १६८ | ८ | सुगळालाळा | सुगळाला |
| ,, | १८ | कलहा | कलहाला |
| १६९ | २२ | राघव करुणा मेघासि | राघवकरु-णामेघासि |
| १७० | २२ | मया | **मया** |
| १७१ | १८ | होतो | होतों |
| ,, | ,, | हरिल | हरिल |
| १७२ | १३ | महानेत्री | महानेत्रीं |
| १७३ | ११ | सुहुत हुताश न | सुहुतहुताशन |
| १७५ | ११ | प्राणवक | माणवक |
| १७८ | २६ | करकावी | करकावी[९६] |
| ,, | २७ | करका[९६] | करका |
| १८१ | १७ | दुर्लभ यश | दुर्लभ चि यश |

| पृष्ठांक. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | ३२ | मुद्र राशी | मुद्+राशी |
| १८२ | २८ | भक्तवशगातें | भक्तवशगा ते |
| ,, | २९ | गा तें | गाते |
| १८३ | ६ | दासीपद | दासा पद |
| ,, | २५ | अष्ठम | अष्टम |
| १८४ | ४ | न वदना वदना | न वदना व-द ना |
| ,, | २१ | वदिति | वदति |
| १८५ | ९ | यशें ईशाधिक | यशें असतीं ईशाधिक. |
| १८६ | १८ | ज्याच्या | ज्यांच्या |
| १८७ | १३ | दरांच्या | नरांच्या |
| ,, | २२ | तामरसना-[५८]भिचारुचे[५९] | तामरसनाभिचा[५८]रुचे[५९] |
| ,, | ३१ | चारु=सुंदर | रुचे=आवडे. |
| १८८ | ८ | आठवूनि | आठवुनि |
| ,, | १४ | विमळ गुणें | विमळगुणें |
| १८९ | ४ | श्री | तो |
| १९० | ११ | मृष्टांगरागे | मृष्टांगरागें |
| १९१ | ३० | रुक्मिणी | कृष्णाच्या आठ स्त्रियांपैकीं एक. |
| १९४ | २५ | तिणे | तिणें |
| १९८ | ३१ | विणा | वीणा. |

समाप्त.